अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला — ३०

# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

**डॉ. सौ. शैलजा मधुकर रानडे**

**प्रधानसंपादक**
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
**कुलगुरु**

**संपादक**
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
**संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग**



**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
**रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)**
**एवं**
**न्यू भारतीय बुक कॉरपोरेशन, दिल्ली**

| | | |
|---|---|---|
| शीर्षक | – | संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास |
| लेखिका | – | डॉ. सौ. शैलजा मधुकर रानडे |
| प्रधानसंपादक | – | आचार्य श्रीनिवास वरखेडी<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| संपादक | – | आचार्य मधुसूदन पेन्ना<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन | – | प्रो. गौतम पटेल, अध्यक्ष<br>प्रो. सरोजा भाटे, सचिव<br>प्रो. ग. उ. थिटे, उपाध्यक्ष |
| संपादक मंडळ | – | डॉ. दिनकर मराठे, क.का.सं.वि., रामटेक<br>डॉ. वीणा गानु, नागपुर. |
| प्रकाशन वर्ष | – | २०२० |
| आवृत्ती | – | प्रथम |
| मूल्य | – | रू. ३३०/– |
| आय.एस.बी.एन. | – | 978-81-8315-401-7 |
| मुखपृष्ठ | – | श्री. उमेश पाटील |
| प्रकाशक | – | कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक<br>प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.<br>एवं<br>न्यू भारतीय बुक कॉरपोरेशन<br>२०८, द्वितीय तल, प्रकाशदीप बिल्डिंग,<br>४७३५/२२, अंसारी रोड, दरिया गंज,<br>नई दिल्ली – ११०००२<br>फोन नं. : २३२८०२१४, २३२८०२०९ |



एस. के. आफॉसेट, दिल्ली



## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success. My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

सरस्वती श्रुतिमहती महीयताम्

Ramtek
10th January 2020

Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

**Kavikulaguru Kalidas Sanskrit University**
**All India Oriental Conference**

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

**Chief Patron**
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

**Patron**
Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

**AIOC President**
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

**AIOC General Secretary**
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

**AIOC Local Secretary**
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

**Additional Local Secretary**
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

**Organising Committee**
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek
Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Srinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

लेखिका
**डॉ. सौ. शैलजा मधुकर रानडे**
M.A.(राज्यशास्त्र/संस्कृत), B.Ed., Ph.D., NET
राष्ट्रभाषारत्न
यवतमाळ

**संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास**

लेखिका
**डॉ. सौ. शैलजा मधुकर रानडे**
'सुरभी', दहिवलकर प्लॉट्स,
उमरसरा रोड, यवतमाळ – ४४५ ००१

अक्षररचना
**मीरा कॉम्प्युटर सर्व्हिसेस**
टिळकवाडी, यवतमाळ – ४४५ ००१

प्रकाशक
**कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
रामटेक

प्रथमावृत्ती : दि. १० जानेवारी २०२०



मूल्य
रु. १५०/-

## मनोगत

भारतीय साहित्य चिंतनाची परंपरा अत्यंत प्राचीन आहे. साहित्यातील विविध तत्त्वांचे सुयोग्य वर्गीकरण करून काव्यतत्त्वज्ञांनी आलोचनात्मक इतिहासाला समृद्ध केले. सूत्र तसेच भाष्यशैलीच्या माध्यमातून काव्यशास्त्रीय इतिहासाचा विस्तार झाला.

भरतमुनींपासून प्रवाहित झालेली ही विचारधारा आजही लुप्त झालेली नाही.

संस्कृत साहित्यशास्त्रातील मान्यवर विचारवंतांच्या कृतीचा आढावा प्रस्तुत पुस्तकात घेतला आहे. साहित्यशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना तो उपयोगी पडेल अशी आशा आहे. तरीसुद्धा,

**आपरितोषात् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्।**

या उक्तीनुसार वाचकांच्या पसंतीला ही निर्मिती उतरेल अशी अपेक्षा करते.

**डॉ. सौ. शैलजा मधुकर रानडे**

## अनुक्रमणिका

| क्र. | ग्रंथकार | ग्रंथाचे नाव | ग्रंथकाळ |
|---|---|---|---|
| १. | भरतमुनी | नाट्यशास्त्र | इ.स.पू. २०० ते इ.स. २०० |
| २. | भामह | काव्यालंकार | इ.स. ६०० ते ७०० |
| ३. | दण्डी | काव्यादर्श | इ.स. ६०० ते ७०० |
| ४. | उद्भट | काव्यालंकारसारसंग्रह | इ.स. ८०० |
| ५. | वामन | काव्यालंकारसूत्रवृत्ति | इ.स. ८०० |
| ६. | रुद्रट | काव्यालंकार | इ.स. ८५० |
| ७. | आनंदवर्धन | ध्वन्यालोक | इ.स. ८५० |
| ८. | राजशेखर | काव्यमीमांसा | इ.स. ९०० ते ९२५ |
| ९. | मुकुलभट्ट | अभिधावृत्तिमातृका | इ.स. ९०० ते ९२५ |
| १०. | भट्टनायक | हृदयदर्पण | इ.स. ९३५ ते ९८५ |
| ११. | भट्टतौत | काव्यकौतुक | इ.स. ९५० ते ९८० |
| १२. | कुन्तक | वक्रोक्तिजीवित | इ.स. ९२५ ते १०२५ |
| १३. | अभिनवगुप्त | ध्वन्यालोकलोचन | इ.स. ९७० ते १०२५ |
| १४. | भोज | सरस्वतीकण्ठाभरण | इ.स. १०२५ ते १०६० |
| १५. | क्षेमेन्द्र | औचित्यविचारचर्चा | इ.स. १०१५ ते १०६० |
| १६. | महिमभट्ट | व्यक्तिविवेक | इ.स. १०२० ते १०५० |
| १७. | वाग्भट | काव्यानुशासन | इ.स. १०५० उत्तरार्ध |
| १८. | वाग्भट | वाग्भटालंकार | इ.स. ११७९ ते १२१३ |
| १९. | धनंजय | दशरुपक | इ.स. १० चा उत्तरार्ध |
| २०. | मम्मट | काव्यप्रकाश | इ.स. ११०० |
| २१. | हेमचन्द्र | काव्यानुशासन | इ.स. ११५० ते ११७२ |
| २२. | विश्वनाथ | साहित्यदर्पण | इ.स. १३०० ते १३५० |
| २३. | अप्पय दीक्षित | कुवलयानंद | इ.स. १६०० |
| २४. | जगन्नाथ पंडित | रसगंगाधर | इ.स. १६२० ते १६५० |

***

# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

**प्रस्तावना**

**भाषासु मधुरा मुख्या दिव्या गीर्वाणभारती।।**

संस्कृत भाषा जगातील सर्व भाषांमध्ये प्राचीनतम आहे. तसेच जगातील सर्व भाषांमध्ये वैदिक तसेच अन्य साहित्यांमुळे श्रेष्ठतम आहे. म्हणूनच या भाषेला 'देववाणी', 'सुरभारती' म्हटले जाते. हिंदू धर्माचे सर्व ग्रंथ ह्याच भाषेत रचले आहेत आणि त्यांची निर्मिती देव किंवा ऋषींपासून मानली जाते. म्हणूनच हिला 'देववाणी' असे म्हणतात. देवतांचे आह्वान करण्यासाठी मंत्राची रचना सुद्धा ह्याच संस्कृत भाषेत केलेली आहे. म्हणूनच दण्डीने 'काव्यादर्श'मध्ये हिची महती वर्णन केली आहे.

**संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्याता महर्षिभिः।**

जगातील सर्वप्रथम ग्रंथ आणि हिंदू धर्माचे सर्वस्व असणारे ऋग्वेदादी ग्रंथ ह्याच गौरवमयी वाणीत ऋषींद्वारा रचल्या गेले. ह्याच भाषेमध्ये आध्यात्मिक शंकांचे निरसन करणाऱ्या उपनिषदांची रचना झाली. सृष्टीची उत्पत्ती आणि लय वर्णन करणारे इतिहास ग्रंथ, पुराण इ. ची निर्मिती सुद्धा ह्याच भाषेत झाली. आर्यांची श्रेष्ठ संस्कृती, रीतीरिवाज, परंपरा इ. चे अवतरणसुद्धा ह्याच सुरभारतीत झाले. अशाप्रकारे लौकिक अभ्युदय आणि पारलौकिक निःश्रेयस सिद्धीची साधने असणारे ज्ञान-विज्ञान, कर्मकांड, शास्त्रपुराण इ. सर्व ह्याच देववाणीतून प्रगट झाले आहेत.

भाषाविज्ञानाच्या दृष्टीने संस्कृत भाषा आर्य परिवाराची भाषा आहे. ह्यालाच भारत-युरोपीय किंवा भारत-जर्मनीय परिवार पण म्हणतात. आर्य परिवाराच्या दोन शाखा आहेत. पश्चिमी शाखा आणि पूर्वीय शाखा. पूर्वीय शाखेच्या अंतर्गत सुद्धा दोन प्रमुख वर्ग आहेत. भारतीय वर्ग आणि ईराणी वर्ग. भारतीय वर्गाच्या अंतर्गत वैदिक संस्कृत, लौकिक संस्कृताचा अंतर्भाव होतो.



भारतामध्ये परंपरागत मतानुसार सर्व विद्यांची उत्पत्ती वेदांपासून झाली. साहित्यशास्त्राचा वेदांशी प्रत्यक्ष संबंध नाही. परंतु ह्या शास्त्रामध्ये ज्या गुण, रीती, अलंकार, ध्वनी इ. तत्त्वांचे विवेचन केले जाते, त्या सर्वांची मुळे वेदांमध्ये निश्चितच प्राप्त होतात. उपमा इ. अनेक अलंकाराचा प्रयोग वैदिक वाङ्मयात झाला आहे. रीतींची उदाहरणे पण वैदिक मंत्रात उपलब्ध आहेत. म्हणून काव्यशास्त्राचे बीज वेदांमध्येच दिसून येते, ह्यात शंका नाही. काव्याच्या स्वरूपाचा संकेत महर्षी वाल्मीकींच्या रामायण महाकाव्यात प्राप्त होतो. **शोकः श्लोकत्वमागतः।** ह्या चरणात शोक आणि श्लोकाचे समीकरण साधले आहे.

काव्यसौंदर्याची परीक्षा करणाऱ्या शास्त्राला 'काव्यशास्त्र' म्हणतात. आमच्या देशात काव्यशास्त्राची उत्पत्ती अत्यंत प्राचीन काळी झाली होती आणि तिचा विकास अनेक शतकांच्या साहित्यिक प्रयत्नांचे फळ होय.

काव्यशास्त्राच्या प्रारंभिक काळात काव्यशास्त्रासाठी 'काव्यालंकार' शब्दाचा प्रयोग होत होता. आचार्य भामहाने आपल्या ग्रंथाचे नाव 'काव्यालंकार' असेच ठेवले आहे. ह्या नावामध्ये 'अलंकार' शब्द सौंदर्यवाचक आहे. म्हणूनच काव्यसौंदर्याच्या परीक्षेच्या आधारभूत मौलिक सिद्धांताचे प्रतिपादन करणाऱ्या प्राचीन ग्रंथांना 'काव्यालंकार' म्हटले जात होते. त्यानंतर ह्या शास्त्रासाठी 'अलंकारशास्त्र' हे नाव प्रचलित झाले. जरी ह्या शास्त्रामध्ये अलंकाराशिवाय रस, रीती, गुण इत्यादींचे विवेचन केले जात होते तरी सुद्धा सर्वांमध्ये अलंकाराला प्रधान मानून 'अलंकारशास्त्र' हेच नाव पडले किंवा अलंकाराला सौंदर्यवाचक मानून 'काव्यसौंदर्यशास्त्राला' हे नाव दिले गेले.

गूढतत्त्व प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथाला 'शास्त्र' म्हणतात. शास्त्र शब्द 'शंस्' धातूपासून उत्पन्न झाला आहे. काव्यासह 'शास्त्र' शब्दाला जोडल्यामुळे ह्याचे महत्त्व वाढले आहे. भोजराजने ह्या शास्त्राला काव्यशास्त्र नाव दिले कारण, ह्यामध्ये काव्यविषयक गूढ सिद्धांताचे वर्णन केले आहे.

ह्या शास्त्रासाठी एक अन्य नाव सुद्धा साहित्यशास्त्रात वापरले जाते. बहुदा आचार्य विश्वनाथ ह्या नावाचे प्रचारक असावेत. कारण त्यांनी आपल्या ग्रंथाचे नाव 'साहित्यदर्पण' असे केले आहे.

शब्द आणि अर्थाच्या 'साहित्या'चे नाव काव्य आहे. 'सहितयोः शब्दार्थयोः भावः साहित्यम्।' म्हणून काव्यशास्त्रसुद्धा 'साहित्यशास्त्र' नावाने जाणले जाते. ह्यासाठी 'साहित्यविद्या' ह्या नावाचा सुद्धा प्रयोग केलेला दिसून येतो. ह्या नावाशिवाय ह्या शास्त्राचे एक प्राचीनतम नाव 'क्रियाकल्प' सुद्धा आहे. ह्या नावाचा उल्लेख वात्सायनाच्या कामसूत्रात ६४ कलांची गणना करतांना झाला आहे. (काव्यसूत्रे १.३.१६)

क्रिया शब्दाचा अर्थ आहे काव्यग्रंथ आणि कल्प शब्दाचा अर्थ आहे विधान. अशाप्रकारे 'क्रियाकल्प' ही ह्या शास्त्रासाठी प्राचीन संज्ञा आहे पण हे नाव प्रसिद्ध झाले नाही, तर 'अलंकारशास्त्र' हेच नाव प्रसिद्ध झाले. परंतु अलंकाराची कल्पनाही बदलत गेली. वामनांच्या मते अलंकार केवळ शब्द आणि अर्थाला सुशोभित करणारे बाह्य उपकरण नाही तर काव्याला सुशोभित करणारा धर्म आहे. वामन अलंकाराला सौंदर्याचा पर्यायवाची मानतात. 'सौंदर्यमलंकारः।' त्यामुळे अलंकारशास्त्र हे काव्याला सौंदर्यसंपन्न करणारे शास्त्र आहे.

काव्यशास्त्रावर आधारित जितके ग्रंथ लिहिल्या गेले ते सर्व वरील नावांच्या आधारावरच लिहिल्या गेले आणि ग्रंथलेखन करणाऱ्या आचार्यांनी सुद्धा आपल्या ग्रंथाचे नामकरण ह्याच आधारावर केले आहे.

संस्कृत साहित्यामध्ये काव्यशास्त्र एक सुप्रतिष्ठित शास्त्र आहे. या शास्त्राच्या सिद्धांतांचे प्रतिपादन साधारण २००० वर्षांपासून होते आहे. परंतु ह्या शास्त्राचा आरंभ कोणत्या काळात झाला हे निश्चित रुपाने सांगणे कठीण आहे. राजशेखराने त्याचा ग्रंथ 'काव्यमीमांसे'च्या प्रारंभी एक आख्यायिका दिली आहे. ही कथा पौराणिक शैलीमध्ये आहे आणि इतर कोणत्याही शास्त्रात हिचा उल्लेख आलेला नाही.

राजशेखर लिहितात, ''भगवान श्रीकण्ठ शिवाने ह्या काव्यविद्येचा उपदेश परमेष्ठी वैकुण्ठ इत्यादी ६४ शिष्यांना केला. त्यातील प्रथम शिष्य स्वयंभू ब्रह्माने ह्या विद्येचा दुसऱ्यांदा उपदेश आपल्या संकल्पातून उत्पन्न झालेल्या अयोनिज ऋषींना केला. ह्या शिष्यांमध्ये सरस्वतीचा पुत्र 'काव्यपुरूष' पण एक शिष्य होता. देवता सुद्धा त्याला वंदन करीत होत्या. ब्रह्माने प्रजेच्या हिताच्या कामनेने प्रेरित होऊन ह्या काव्यपुरूषाला काव्यविद्येचा प्रचार



करण्याची आज्ञा दिली. काव्यपुरूषाने ह्या विद्येला १८ अधिकरणांमध्ये लिहून १८ शिष्यांना ती शिकवली. ह्या शिष्यांनी काव्यविद्येचा अधिकाधिक प्रचार करण्यासाठी काव्याच्या १९ अंगावर १९ ग्रंथाची निर्मिती केली. सहस्राक्षाने कविरहस्य, उक्तिगर्भाने औक्तिक ह्याप्रमाणे निर्मिती केली व काव्यविद्येचा प्रसार झाला''.

राजशेखराने अलंकारशास्त्राला वेदाचे अंग मानले आहे.

**उपकारत्वादलंकारः सप्तममङ्गमिति यायावरीयः।**

**ऋते च तत्स्वरूपपरिज्ञातादेवार्थनवगतिः।**

त्यांनी साहित्यविद्येला स्वतंत्र विद्या मानले नाही तर तर्क, त्रयी, वेद व दण्डनीती या चार विद्यांचा अर्क मानले आहे.

**पञ्चमी साहित्यविद्या इति यायावरीयः।**

**सा हि चतसृणामपि विद्यानां निष्यन्दः।** (काव्यमीमांसा)

**अलंकार शास्त्राचे संप्रदाय**

अलंकार शास्त्रावरील ग्रंथांचे अनुशीलन केल्याने असे दिसून येते की अलंकार शास्त्राचे अनेक संप्रदाय विद्यमान होते. आलंकारिकांच्या पुढे प्रमुख विषय होता तो म्हणजे 'काव्याचा आत्मा.' अशी कोणती वस्तू आहे की जिच्या सत्तेमुळे काव्यात काव्यत्व विद्यमान राहते? ह्या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी अनेक संप्रदायांची उत्पत्ती झाली. काही विद्वान अलंकारालाच काव्याचा प्राणभूत धर्म मानतात. काही विद्वान रीतीला तर काही ध्वनीला प्राधान्य देतात. अशाप्रकारे काव्याच्या आत्म्याचा विचार करतांना भिन्न भिन्न काळात भिन्न भिन्न संप्रदाय निर्माण झाले.

अलंकारसर्वस्वचे टीकाकार समुद्रबंध ह्याने संप्रदायाच्या उदयाबाबत प्रदर्शित केलेले मत अत्यंत युक्तिपूर्ण आहे. त्यांनी असे विवेचन केले आहे,

''इह विशिष्टौ शब्दार्थौ काव्यम्। तयोश्च वैशिष्ट्यं धर्ममुखेन व्यंग्यमुखेन वेति त्रयः पक्षाः। आद्येऽप्यलङ्कारतो गुणतो वेति द्वैविध्यम्। द्वितीयेऽपि भणितिवैचित्र्येन भोगकृत्त्वेन वेति द्वैविध्यम्। इति पञ्चसु पक्षेष्वाद्य उद्भटादिभिरङ्गीकृतः द्वितीये वामनेन तृतीयो वक्रोक्तिजीवितकारेण, चतुर्थौ भट्ट नायकेन, पञ्चम आनन्दवर्धनेन।''

शब्द आणि अर्थ मिळूनच काव्य होते. शब्द आणि अर्थाची विशिष्टता तीन प्रकारांनी होऊ शकते- धर्ममूलक, व्यापारमूलक आणि व्यङ्ग्यमूलक.

धर्ममूलक वैशिष्ट्य दोन प्रकारचे आहे, नित्य आणि अनित्य.

नित्यधर्माचा तात्पर्यार्थ गुण असा आहे आणि अनित्यधर्माचा तात्पर्यार्थ अलंकार असा आहे.

धर्ममूलक वैशिष्ट्याचे प्रतिपादन करणारे दोन संप्रदाय आहेत, अलंकार संप्रदाय व गुण किंवा रीती संप्रदाय.

व्यापारमूलक वैशिष्ट्य पण दोन प्रकारचे आहे, वक्रोक्ति आणि भोजकत्व.

वक्रोक्तिद्वारा काव्यामध्ये चमत्कृती मानणारे आचार्य कुन्तक आहेत. म्हणूनच त्यांचे मत वक्रोक्ति संप्रदाय नावाने प्रसिद्ध आहे.

भोजकत्व व्यापाराची कल्पना भट्टनायकाने केली आहे. परंतु भोजकत्वाला स्वतंत्र न मानता भरताच्या रसमतामध्येच त्याचा अन्तर्भाव केला आहे. कारण भट्टनायकाने विभाव, अनुभाव व संचारी भावाने रसनिष्पत्ति होते हे सूत्र समजविण्यासाठी भोजकत्व ह्या नवीन व्यापाराची कल्पना केली आहे.

व्यङ्ग्यमूलक वैशिष्ट्य मानणारे आचार्य आनंदवर्धन आहेत. त्यांनी ध्वनीला उत्तम काव्य म्हणून स्वीकारले आहे.

आनंदवर्धनांनी ध्वनीविरोधी तीन मतांचा उल्लेख केला आहे. अभाववादी, भक्तिवादी आणि अनिर्वचनीयतावादी.

अभाववादींचे सुद्धा तीन संप्रदाय आहेत. काहींनी गुण, अलंकार इत्यादींना काव्याचे एकमात्र उपकरण मानून ध्वनीला पूर्णपणे नाकारले आहे. परंतु काही अभाववादी अलंकारामध्येच ध्वनीचा समावेश करतात. भक्तिवादी लक्षणेद्वारा ध्वनीची सिद्धी मानतात.

अनिर्वचनीयवादी ध्वनीचे स्वरूप शब्दाने व्यक्त करता न येणारे मानून अनिर्वचनीय मानतात.

आनंदवर्धनांनी ह्या तीनही मतांचे खंडन करून ध्वनीला स्वतंत्रपणे स्थापित केले आहे.



**अलंकारशास्त्राचे संप्रदाय**

१) रससंप्रदाय - भरतमुनी
२) अलंकार संप्रदाय - भामह, उद्भट, रुद्रट
३) गुण/रीती संप्रदाय - दण्डी, वामन
४) वक्रोक्ती संप्रदाय - कुन्तक
५) ध्वनि संप्रदाय - आनंदवर्धन, अभिनवगुप्त
६) औचित्य संप्रदाय .- क्षेमेन्द्र

**१) रससंप्रदाय**

राजशेखराच्या मतानुसार नंदिकेश्वराने सर्वप्रथम ब्रह्माच्या उपदेशाने रसाचे निरुपण केले. परंतु नंदिकेश्वराचे रसविषयक मत उपलब्ध नाही. उपलब्ध रससिद्धांत भरतमुनींशी संबंधित आहे. भरत हेच रससंप्रदायाचे प्रथम व सर्वश्रेष्ठ आचार्य आहेत.

नाट्यशास्त्राच्या षष्ठ आणि सप्तम अध्यायामध्ये भरतांनी रस आणि भावाचे निरुपण केले आहे. ते साहित्यजगतामध्ये अपूर्व आहे.

रससंप्रदायाचे मूलभूत सूत्र आहे 'विभावानुभाव व्यभिचारि संयोगात् रसनिष्पत्तिः।' विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भावांच्या संयोगानेच रसाची निष्पत्ती होते. हे सूत्र खऱ्या अर्थाने अल्पाक्षरी आणि सारगर्भ आहे. भरताचे ह्या सूत्रावरील भाष्य सुद्धा अत्यंत सुगम आहे. टीकाकारांनी भरताच्या ह्या सूत्रावर भिन्न भिन्न प्रकारे व्याख्या केली आहे. ह्यामध्ये चार टीकाकार प्रधान आहेत, भट्टलोल्लट, शंकुक, भट्टनायक आणि अभिनवगुप्त.

भट्टलोल्लट उत्पत्तिवादी आहेत. ते रसाला विभावादींचे कार्य मानतात.

शंकुक अनुमितीवादी आहेत. ते विभावादिंद्वारा रसाची अनुमिती मानतात. त्यांच्या मते विभावादी आणि रस ह्यामध्ये अनुमापक अनुमाप्य संबंध आहे.

भट्टनायक भुक्तिवादी आहेत. त्यांच्या मते विभावादिंचा रसाशी भोज्य-भोजक संबंध आहे. हे मत सिद्ध करण्यासाठी त्यांनी अभिधेव्यतिरिक्त भावकत्व आणि भोजकत्व ह्या दोन व्यापारांना स्वीकारले आहे.

अभिनवगुप्त व्यक्तिवादी आहेत. त्यांचे मत अत्यंत मनोवैज्ञानिक आहे. म्हणून त्यांचे मत सर्व आलंकारिकांच्या आदराचे व श्रद्धेचे पात्र ठरले

आहे. सर्व स्थायीभाव हे वासनारुपाने सहृदयाच्या हृदयात विद्यमान असतातच. विभावादिंमुळे हे सुप्त स्थायीभाव अभिव्यक्त होऊन आनंदमय रसाचे रुप प्राप्त करतात.

रसाच्या संख्येबाबत अलंकारिकांमध्ये मतभेद दिसून येतात. भरतमुनींनी रससंख्या शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स आणि अद्‌भुत अशी आठ मानली आहे.

भरत आणि धनंजयने नाटकात शांत रस स्वीकारला नाही.

**शममपि केचित् प्राहुः पुष्टिर्नाट्येषु नैतस्या।**(दशरुपक ४।३५)

नाटक अभिनयाद्वारेच प्रदर्शित केले जाते आणि शांत रस सर्व कार्यांचा विरामरुप आहे. अशा स्थितीत शांतरसाचा प्रयोग नाटकात होऊ शकत नाही. काव्य इत्यादिंमध्ये शांत रसाची सत्ता असू शकते.

आनंदवर्धनांच्या मते महाभारताचा मूलरस शांतच आहे.

रुद्रटाने 'प्रेयान्' रसाला सुद्धा मानले आहे. विश्वनाथ 'वात्सल्य' हा सुद्धा रस मानतात.

गौडीय वैष्णवांच्या मते 'मधुररस' सर्वश्रेष्ठ आहे.

साहित्यामध्ये रसतत्त्व महत्त्वपूर्ण आहे. लौकिक साहित्यातील प्रथमश्लोक रसमयच आहे. क्रौञ्च मिथुनातील एकाला व्याधाचा बाण लागतो. त्यामुळे विरहाकूल क्रौञ्ची करुण विलाप करते. ते दृश्य पाहून व्याकूळ झालेल्या महर्षी वाल्मीकिंच्या मुखातून शोकरूपाने श्लोक बाहेर पडतो.

**मा निषाद प्रतिष्ठा त्वमगमः शाश्वतीः समाः**
**यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम्।**

रसतत्त्व हे सर्वच संप्रदायांनी स्वीकारले आहे. पण त्याला त्यांच्या मतानुसार कमीअधिक महत्त्व दिले आहे.

**२) अलंकार संप्रदाय**

अलंकार संप्रदायाचे प्रवर्तक आचार्य भामह आहेत आणि त्यांचे समर्थक आहेत उद्‌भट तसेच रुद्रट, दण्डीने सुद्धा अलंकाराची प्रधानता कोणत्या ना कोणत्या रुपात स्वीकारली आहे. ह्या संप्रदायानुसार अलंकारच काव्याचे जीवन आहे. जसे अग्नीला उष्णतारहित मानणे हास्यास्पद आहे तसेच काव्याला अलंकारहिन मानणे हास्यास्पदच होय.



**अङ्गीकरोति यः काव्यं शब्दार्थवनलङ्कृती।**
**असौ न मन्यते कस्मादनुष्णमनलं कृति।।**(चन्द्रलोक १।८)

अलंकारांचा विकास हळूहळू होत गेला आहे. भरताच्या नाट्यशास्त्रामध्ये फक्त चारच अलंकारांचा नामनिर्देश आहे. अनुप्रास, उपमा, रुपक आणि दीपक. हेच चार मूळ अलंकार आहेत. ह्यातील अनुप्रास हा एकच शब्दालंकार असून इतर तीन अर्थालंकार आहेत ह्याच चार अलंकाराचा विकास होत कुवलयानन्दमध्ये १२५ अलंकार मानले आहेत. अलंकारांच्या ह्या विकासामध्ये वेगवेगळे चिंतन दिसून येते. त्यामुळेच अलंकाराच्या स्वरूपात फरक पडत गेला.

भामहाने ज्याला वक्रोक्ति मानले आहे त्याचेच परिवर्तित रूप वामनाने मान्य केले. अलंकारांच्या विभागासाठीपण काही सिद्धांत निश्चित केले आहेत. रुद्रटाने सर्वप्रथम हा संकेत दिला आणि औपम्य, वास्तव, अतिशय आणि श्लेष ह्यांना अलंकारांचे मूळ मानले. ह्या बाबतीत एकावलीकार विद्याधराचे निरुपण अत्यंत युक्तिसंगत आणि वैज्ञानिक आहे. त्यांनी औपम्य, विरोध, तर्क इत्यादि अलंकारांचे मूळ विभेदक मानून ह्या विषयी अत्यंत सुंदर समीक्षा केली आहे.

अलंकारमत मानणाऱ्या आचार्यांना रसतत्त्व अज्ञात नव्हते. परंतु त्यांनी ह्याला स्वतंत्र स्थान न देता अलंकाराचाच प्रकार मानले. रसवत्, प्रेम, उर्जस्वी आणि समाहित ह्या चार अलंकारांमध्येच रस आणि भावसंबंधी संपूर्ण विषय भामहाने अंतर्भूत केला. दण्डीसुद्धा रसवत् अलंकाराला परिचित होते. त्यांनी आठ रस आणि आठ स्थायीभावांचा निर्देश केला आहे.

अशाप्रकारे अलंकारमताचे हे आचार्य रसतत्त्वाला चांगल्याप्रकारे जाणत होते. परंतु त्यांनी रसाला अलंकाराचाच एक प्रकार मानले. ते प्रतीयमान अर्थाशी सुद्धा परिचित होते. परंतु प्रतीयमान अर्थाला त्यांनी समासोक्ति, आक्षेप इ. अलंकारामध्ये मानले. अलंकारांचे विशिष्ट परीक्षण तसेच व्याख्या करण्याने वक्रोक्ति तसेच ध्वनिच्या कल्पनेचा प्रादुर्भाव झाला. अशाप्रकारे ह्या शास्त्राच्या इतिहासात अलंकारमताची अत्यंत विशेषता आहे.

**३) रीतिसंप्रदाय**

रीतिसंप्रदायाचे प्रधान प्रतिपादक आचार्य वामन आहेत. त्यांच्या मते रीति हाच काव्याचा आत्मा आहे.

**रीतिरात्मा काव्यस्य।**

रीति म्हणजे काय? ह्याचे स्पष्टीकरण ते करतात.

**विशिष्टा पदरचना रीतिः।**

पदांची विशिष्ट रचना म्हणजे रीति. रचनेत ही विशिष्टता गुणांमुळे उत्पन्न होते. म्हणून रीति गुणांवर अवलंबून आहे. म्हणूनच रीतिसंप्रदायालाच गुणसंप्रदाय असेही म्हणतात.

वैदर्भी आणि गौडी या दोन रीतिंमधील फरक स्पष्टरुपाने प्रतिपादन करण्याचे श्रेय आचार्य दण्डीला जाते.

गुण व अलंकारातील भेद सर्वप्रथम वामनांनी स्पष्टरुपाने मांडला. वामनाने गुणांचे शब्दगत व अर्थगत असे प्रत्येकी १० भेद करून गुणांची संख्या द्विगुणित केली आहे. कारण भरताच्या नाट्यशास्त्रामध्ये १० गुणांचा नामनिर्देश आहे. ते १० गुण असे- श्लेष, प्रसाद, समता, समाधी, माधुर्य, ओज, सुकुमारता, अर्थव्यक्ती, उदारता, कान्ती.

दण्डीने सुद्धा यांचा निर्देश केला आहे. त्यांनाच दण्डीने वैदर्भ मार्गाचा प्राण म्हटले आहे. वामनाने सुद्धा वैदर्भी रीतिसाठी १० गुणांची आवश्यकता असते हे मान्य केले आहे.

गौडी रीतिसाठी ओज व कांती या गुणांची तसेच पाश्चाली रीतीसाठी माधुर्य व प्रसाद या गुणांची सत्ता आवश्यक आहे.

रीतिसंप्रदायाने अलंकार व गुणातील भेद स्पष्ट करून साहित्यावर मोठे उपकार केले आहेत.

वामनाच्या मते शोभा निर्माण करणारे धर्म 'गुण' आणि त्यांना अतिशय करणारे धर्म 'अलंकार' होय.

**काव्यशोभायाः कर्तारो धर्माः गुणाः।**

**तदतिशय हेतवोऽलंकाराः।।**

अलंकार संप्रदायाच्या तुलनेत रीतिसंप्रदायाची आलोचक दृष्टी अत्यंत तीक्ष्ण व सखोल आहे. भामह आदिंनी तर रसाला अलंकार मानून त्याला काव्याचे बहिरंग साधन म्हणून स्वीकारले आहे. परंतु वामनाने कान्तिगुणाच्या





अंतर्गत रसाचा समावेश करून काव्यामध्ये रसाच्या महत्तेवर विशेष भर दिला आहे. त्यांनी वक्रोक्तिच्या अंतर्गत ध्वनीचा समावेश केला आहे.

अशाप्रकारे रीति संप्रदायाचे विवेचन अधिक व्यापक आहे.

**४) वक्रोक्ति संप्रदाय**

वक्रोक्तिला काव्यजीवित मानण्याचे श्रेय आचार्य कुंतकांकडे जाते. म्हणूनच त्यांनी आपल्या ग्रंथाचे नाव 'वक्रोक्ति जीवित' असे ठेवले आहे.

'वक्रोक्ति' शब्दाचा अर्थ आहे वक्र उक्ती, म्हणजेच सर्वसाधारण लोकांच्या कथनापेक्षा भिन्न, अलौकिक चमत्काराने युक्त कथन.

कुन्तकाच्या शब्दांमध्ये वक्रोक्ति म्हणजे,

**'वैदग्ध्यभङ्गीभणितिः वक्रोक्तिरेव वैदग्ध्यभङ्गीभणितिरुच्यते।'**

सामान्य लोग आपल्या भावनांच्या अभिव्यक्तिसाठी सामान्य पद्धतीनेच शब्दप्रयोग करतात. परंतु त्यापेक्षा चमत्कारी कथनाचा प्रचार 'वक्रोक्ती'च्या नावाने सांगितला जातो.

**वक्रोक्तिः प्रसिद्धाभिधान व्यतिरेकिणी विचित्रैवाभिधा।**

**वैदग्ध्यं कविकौशलं तस्य भङ्गी विच्छित्तिः।**(व.जी.१।११)

वक्रोक्तीची ही कल्पना करण्यासाठी कुन्तक भामहाचे ऋणी आहेत. भामह अतिशयोक्तीला वक्रोक्ति नावाने संबोधतात आणि तिला अलंकारांचे जीवनाधायक मानतात. त्यांचे असे स्पष्ट मत आहे की,

**सैषा सर्वत्र वक्रोक्तिरनयाऽर्थो विभाव्यते।**

**यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलंकारोऽनया विना।**

भामहाच्या मते वक्र अर्थयुक्त शब्दांचा प्रयोग काव्यात अलंकार निर्माण करतो.

**वाचां वक्रार्थशब्दोक्तिरलङ्काराय कल्पते।**(५।६६)

हेतु अलंकाराला अलंकार न मानण्याचे कारण वक्रोक्तिशून्यता हेच आहे. (२.८६) भामहाच्या या कल्पनेला पूर्ववर्ती आलंकारिकांनी स्वीकारले. लोचनाने भामहाला (१।३६) उद्धृत करून स्पष्टपणे लिहिले आहे.

शब्द आणि अर्थाची वक्रता लोकोत्तर रुपाने त्याची अवस्थितीच होय. **शब्दस्य हि वक्रता अभिधेयस्य च वक्रता लोकोत्तीर्णेन रुपेणावस्थानम्।**

दण्डीने सुद्धा वक्रोक्ती तसेच स्वभावोक्तीवरून वाङ्मयाला दोन प्रकारचे मानले आहे. तसेच वक्रोक्तीमध्ये श्लेषाद्वारा सौंदर्यनिर्मितीला मान्यता दिली आहे.

**श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायोवक्रोक्तिषु श्रियम्।**
**भिन्नं द्विधा समासोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम्।।**

(काव्यादर्श २।३६३)

कुन्तकाने हीच कल्पना स्वीकारून वक्रोक्तीला काव्याचे जीवित मानले आहे. निःसंशय आचार्य कुन्तक हे अत्यंत मौलिक विचारांचे आचार्य आहेत. कुन्तक ध्वनिमताशी सुद्धा परिचित होते. ध्वन्यालोकातील पद्यांचा त्यांनी आपल्या ग्रंथात उल्लेख केला आहे. परंतु वक्रोक्तीची कल्पना इतकी उदात्त, व्यापक तसेच बहुमुखी आहे की त्यामध्ये ध्वनीचा सर्व विस्तार सामावला जातो.

वक्रोक्ति प्रामुख्याने पाच प्रकारांनी होते. १) वर्णवक्रता २) पदवक्रता ३) वाक्यवक्रता ४) अर्थवक्रता ५) प्रबन्धवक्रता.

उपचारवक्रतेच्या अतंर्गत ध्वनीच्या अनेक भेदांचा समावेश केला आहे.

कुन्तकाची विश्लेषण तसेच विवेचक शक्ती अत्यंत मार्मिक आहे. त्यांचा हा ग्रंथ अलंकारशास्त्राच्या मौलिक विचारांचे भांडार आहे. परंतु खेदाची बाब ही आहे की त्यांच्यानंतर कोणत्याही आचार्याने ही भावना पुढे नेली नाही तर लोकांनी सुद्धा रुद्रटाद्वारा प्रदर्शित प्रकारांचा स्वीकार करून वक्रोक्तीला एक सामान्य शब्दालंकारच मानले.

वक्रोक्तीच्या महनीय भावनेला बीजरूपाने सूचित करण्याचे श्रेय आचार्य भामहालाच आहे आणि त्या बीजाला उदात्तरुपाने अंकुरित तसेच पल्लवित करण्याचा सन्मान निश्चितच कुंतकाला प्राप्त होतो.

**५) ध्वनिसंप्रदाय**

ध्वनिमत म्हणजे रसमताचे विस्तृतीकरण होय. रससिद्धांताचे अध्ययन मुख्यतः नाटकाच्या संदर्भात केले गेले. हा 'रस' कधी वाच्य असत नाही. उलट तो व्यङ्ग्यच असतो. ह्या विचारधारेचा पुरस्कार करून आनंदवर्धनाने



व्यङ्ग्यालाच काव्यामध्ये प्रधान मानले. 'ध्वनि' शब्दासाठी आलंकारिक वैयाकरणींचे ऋणी आहेत. कारण वैयाकरणी स्फोटरूप मुख्य अर्थाला अभिव्यक्त करणाऱ्या शब्दासाठी 'ध्वनि' या शब्दाचा प्रयोग करतात. आलंकारिकांनी ह्या साम्यावरून 'ध्वनि' हा शब्द ग्रहण केला आणि त्याचा अर्थ अधिक विस्तृत व व्यापक केला. ह्या मताचे आद्य आचार्य आनंदवर्धनांनी युक्तिवादांच्या द्वारा व्यङ्ग्याची सत्ता वाच्यापेक्षा पृथक सिद्ध केली आहे आणि मम्मटाने तर ह्याची अत्यंत शास्त्रीय व्यवस्था करून ठेवली आहे.

आनंदवर्धनांच्या आधी ध्वनिच्या बाबतीत तीन मते होती, अभाववादी, भक्तिवादी आणि अनिर्वचनीयवादी. ह्या सर्वांचे योग्य खंडन करणे हा आनंदवर्धनांच्या बुद्धीचा चमत्कारच मानावा लागेल. ध्वनीचे मुख्य तीन भेद आहेत. रस, वस्तु आणि अलंकार. आणि त्याचे सुद्धा अनेक प्रभेद आहेत.

अलंकाराच्या इतिहासात ध्वनिची कल्पना अत्यंत सूक्ष्म बुद्धीची परिचायक आहे. ध्वनीच्या चमत्काराला पाश्चात्त्य आलंकारिक पण मानतात. महाकवी ड्राइडनचे मत आहे, More is meant than meets the ear. हे मत म्हणजे एकप्रकारे ध्वनीचीच सूचना आहे. ध्वनिवादी सिद्धांताचे व्यवस्थापक मान्यतेला प्राप्त झाले आहेत, कारण त्यांनी आपल्या पद्धतीने गुणदोष, रस, रीती इ. सर्व काव्यतत्त्वांची सुंदर व्यवस्था केली आहे.

**६) औचित्य संप्रदाय**

औचित्याची भावना रसध्वनी इ. सर्व काव्यतत्त्वांची मूळ भावना आहे. सर्व प्राचीन आलंकारिकांनी 'औचित्य'तत्त्वाचे रक्षण करण्याचा संकेत आपल्या ग्रंथांमधून दिला आहे. क्षेमेन्द्राने 'औचित्य विचार चर्चा' हा ग्रंथ लिहून ह्या काव्यतत्त्वाचे व्यापक रूप स्पष्टपणे दाखवले आहे. त्यांनी औचित्य हाच रसाला जीवनभूत प्राण आहे असे म्हटले आहे.

**औचित्यस्य चमत्कारकारिणश्चारुचर्वणे।**
**रसजीवितभूतस्य विचारं कुरुतेऽधुना।।** (का.३)

जे ज्याच्या समान आहे आणि जे ज्याच्या संगत आहे त्याला 'उचित' असे म्हणतात आणि उचिततेचा भाव म्हणजेच 'औचित्य' होय.

**उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य तत्।**
**उचितस्य च यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते।।** (का.७)

औचित्याला पद, वाक्य, अर्थ, रस, कारक, लिंग, वचन इ. अनेक जागी दाखवून तसेच त्यांच्या अभावाला इतरत्र दाखवून क्षेमेन्द्राने साहित्यरसिकांवर मोठे उपकार केले आहेत. पण म्हणून हे औचित्यतत्त्व क्षेमेन्द्रापासूनच सुरू झाले असे मानणे ही मोठी ऐतिहासिक चूक होईल. औचित्याचे मूलतत्त्व आनंदवर्धनांनीच उद्घाटित केले आहे.

**अनौचित्यादृते नान्यद् रसभङ्गस्य कारणम्।**
**औचित्योपनिबन्धस्तु रसस्योपनिषत् परा।।**

अनौचित्याशिवाय रसभंगाचे दुसरे कारण नाही. रसाचे परम रहस्य, परा उपनिषद म्हणजेच रसाचे औचित्याशी निबंधन होय. परंतु आनंदवर्धनांच्या पूर्वी हे औचित्य काव्याचे मूलतत्त्व मानले गेले. भरताने आपल्या पात्रांसाठी देश आणि अवस्थेला अनुरुप वेषविन्यास करण्यावर भर देऊन औचित्यतत्त्वावरच भर दिला आहे.

**अदेशजो हि वेषस्तु न शोभां जनयिष्यति।**
**मेखलोरसि बन्धे च हास्यायैवोपजायते।** (नाट्यशास्त्र २३।६९)

पूर्वी आलंकारिकांनी सुद्धा ह्या तत्त्वाची महानता मान्य केली होती. ह्या सर्व सूचनांचे विस्तृत विवरण क्षेमेंद्राने आपल्या ग्रंथात केले आहे. क्षेमेंद्राचे हे खालील कथन भरताच्या कारिकेचे भाष्यरुपच आहे.

**कण्ठे मेखल्या नितम्बफलके तारेण हारेण वा।**
**पाणौ नुपूरबन्धनेन, चरणे केयूरपाशेन वा।**
**शौर्येण प्रणते रिपौ करुणया नायान्ति के हास्यतां**
**औचित्येन विना रुचिं प्रतनुते नालंकृतर्नो गुणाः।।**

अलंकारशास्त्राने आलोचनाशास्त्राला तीन काव्यतत्त्वांची देणगी दिली आहे. ही तीन तत्त्वे अशी आहेत, औचित्य, रस आणि ध्वनि.

ह्यामध्ये 'औचित्य' सर्वाधिक व्यापक तत्त्व आहे. ज्याच्याशिवाय 'रसां'मध्ये समरसता येत नाही आणि 'ध्वनि'त महानता येत नाही. औचित्यतत्त्वावरच साहित्याचे सर्व सिद्धांत अवलंबून आहेत. म.म. कप्पुरस्वामी शास्त्री यांनी हे आकृतीद्वारा दाखवून दिले आहे.



**औचितीमनुधावन्ति सर्वेध्वनिरसोन्नयाः।**
**गुणालङ्कृतिरीतीनां नयाश्चानृजुवाङ्मयाः।।**

ह्या आकृतीमध्ये अलंकारशास्त्राच्या पूर्वोक्त सर्व संप्रदायांचा पारस्परिक संबंध व्यवस्थितपणे दाखविला आहे.




साहित्य सिद्धांतांचा इतिहास औचित्यापासून सुरू होऊन अलंकारापर्यंत विकसित होतो. औचित्याच्या अंतर्गतच एक मोठा त्रिकोण आहे. ज्याच्या शीर्षभागी 'रस' आहे. रसाला आनन्दवर्धनांनी काव्याचा आत्मा मानले आहे. तसेच कुन्तक आणि महिमभट्ट सुद्धा काव्यात रसाची सत्ता मान्य करतात. खालच्या रेषेवर ध्वनि तसेच अनुमिति आहे. ही दोन्ही रसाच्या अनुभूतीची भिन्न भिन्न मते आहेत. ध्वनि व्यंजनेद्वारा रसानुभूतिच्या अभिव्यक्तीला मान्य करतो. महिमभट्टाच्या मते अनुमिति म्हणजे रसाच्या अनुभूतीचाच अन्य प्रकार आहे. हे सर्व ध्वनिविरोधी मतांचे उपलक्षणमात्र आहे. ह्या त्रिकोणाद्वारा काव्याच्या अंतरंग-प्राणभूत तत्त्वाची समीक्षा केली आहे. वर्तुळामध्ये काव्याच्या बाह्यरूपाचे विवेचन केले आहे. वर्तुळाची परिधी वक्रोक्ती आहे. वर्तुळाच्या आत छोटा त्रिकोण आहे, ज्याचा शीर्षबिंदू आहे वामनाची रीती आणि खालचा बिंदू आहे दण्डीचा गुण आणि भामहाचा अलंकार. रीति-गुण-अलंकार काव्याचे बहिरंग साधन आहे आणि ते ह्या वक्रोक्तीवर आधारित असणे अत्यंत आवश्यक आहे.

* *

.१.

# भरतमुनी

मनोरंजनाचे एक प्रभावी साधन म्हणजे नाटक. नाटक दृश्य आणि श्राव्य असे द्विविध स्तरांवर मनोरंजन करणारे असल्यामुळे प्राचीन काळापासून लोक नाट्यकलेकडे आकृष्ट झाले आहेत. अनुकरण करणे ही मानवाची सहज प्रवृत्ती आहे. अगदी लहान मूल सुद्धा मोठ्यांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करीत असते तर वृद्ध लहान मुलाशी वागतांना, बोलतांना त्यांच्या भाषेचे, हावभावांचे अनुकरण करीत असतात. निसर्गातील विविध प्राणी, पक्ष्यांचे आवाज, त्यांच्या चेष्टा, क्रीडा मानवाला अनुकरण करण्यासाठी प्रवृत्त करीत असतात. ह्या अनुकरणातून 'नाट्य' जन्मास आले. ह्या नाट्यकलेचा उद्गम केव्हा, कोठे झाला? कोणी केला? ह्या प्रश्नांची उत्तरे अनुत्तरित असली तरी भारतामध्ये ह्या कलेचा उद्भव झाला होता. मध्यप्रदेशात आढळून आलेल्या सीताबेंगा येथील डोंगरगुहांमध्ये उभारलेले विशाल नाट्यगृह ह्याची साक्ष देते. नाट्य केवळ कलाच नव्हे तर 'शास्त्र' विषय सुद्धा झाला होता. त्यामुळेच नाट्याची परिभाषा, प्रयोजन ह्या मूलभूत घटकांपासून तर नाट्यप्रकार, नायक, नायिकाभेद, अभिनय, रसचर्चा इ. विषयांवर सखोल चिंतन केल्या गेले. ज्या ठिकाणी हे नाट्य सादर केले जाणार त्या स्थानाचा, नाट्यमंडपाचा सुद्धा विचार केला आहे. नाट्य हा विचारवंतांच्या लेखनाचा विषय झाला. ह्या विषयावर अनेक आचार्यांनी लेखन केले.

संस्कृत साहित्यशास्त्राच्या इतिहासात भरतमुनीचे नाव अत्यंत आदराने घेतले जाते. त्यांनी रचलेला 'नाट्यशास्त्र' हा ग्रंथ सर्वमान्य ग्रंथ आहे. नाट्यशास्त्रालाच 'पंचमवेद' मानले जाते. हा ग्रंथ प्राचीन व श्रेष्ठ असल्याचे आधार उपलब्ध आहेत. नाट्यशास्त्राच्या प्रारंभी नाटकाच्या उत्पत्तीच्या संबंधाने जी कथा येते त्यामुळे ह्या विधानाची पुष्टी होते. ह्या कथेनुसार इंद्रादी देवांनी प्रार्थना केल्यामुळे ब्रह्माने ऋग्वेदापासून पाठ्य, सामवेदापासून संगीत, यजुर्वेदापासून अभिनय आणि अथर्ववेदापासून रस घेऊन नाट्यवेदाची रचना केली.



नाट्योत्पत्तीसंबंधीची ही कथा नाटकाच्या प्राचीनतेची द्योतक आहे.

**भरतमुनीचा काळ**

भरतमुनींचा काळ निश्चित करणे अत्यंत विवादास्पद आहे. कालिदासाने विक्रमोर्वशीयम् नाटकात भरतमुनींचा उल्लेख केला आहे. त्यामुळे विद्वान लोक भरतमुनींना कालिदासाचे पूर्ववर्ती मानतात. त्यांच्या काळाविषयी एक गोष्ट निर्विवाद सिद्ध होते की त्यांनी वैदिक काळानंतर आणि पौराणिक काळापूर्वी नाट्यशास्त्राची रचना केली होती. तरी सुद्धा त्यांचा काळ आजसुद्धा निश्चित करता येत नाही.

**नाट्यशास्त्राचा काळ**

अधिकांश विद्वानांच्या मते नाट्यशास्त्राचे वर्तमान स्वरूप म्हणजे केवळ एका व्यक्तीची रचना किंवा एका काळातील रचना नाही. नाट्यशास्त्राच्या काळासंबंधी विद्वानांमध्ये मतभेद आहेत. नाट्यशास्त्राच्या काळाविषयी अनेक कालखंडांचा निर्देश केला जातो. अनेक विद्वान नाट्यशास्त्राचा काळ इ.स. पूर्व द्वितीय शतक किंवा ह्यापेक्षाही पूर्वीचा मानतात.

भाषाविज्ञान इ. अनेक तथ्यांच्या आधारे श्री मनमोहन घोष नाट्यशास्त्राचा काळ इ. पू. २०० मानतात. त्यांच्या मते ह्यातील अंश ह्यापेक्षाही प्राचीन आहे. म.म.प. हरप्रसाद शास्त्रींनी नाट्यशास्त्राच्या रचनेचा काळ इ.पू. दुसरे शतक मानला आहे. काही अन्य विद्वान भरताचा काळ इसवी सनाचे तिसरे किंवा चौथे शतक मानतात.

डॉ. एस. के. डे यांच्या मतानुसार नाट्यशास्त्रातील संगीताच्या संबंधीचा अध्याय ४ थ्या शतकातील रचना आहे. परंतु नाट्यशास्त्रात अनेक परिवर्तने होत होत त्याचे उपलब्ध संस्करण ८ व्या शतकाच्या शेवटी पूर्ण झाले असावे.

गौतम धर्मसूत्रात (९.१९) उपवेदांचा उल्लेख येतो. अत्यंत प्राचीन काळापासून चार मुख्य वेदांसह चार उपवेदांचा उल्लेख आढळतो. आयुर्वेद, धनुर्वेद, गान्धर्ववेद, अर्थशास्त्र (स्थापत्य) हे चार उपवेद आहेत.

वनपर्वात (९१.१४-१५) म्हटले आहे की, विश्वावसुचा पुत्र चित्रसेन गांधर्ववेद शिकला. त्यात सामवेद, संगीत, नृत्य व वाद्यांचा समावेश होता.

शांतिपर्वात सुद्धा (१६८-५८) ह्याचेच प्रतिपादन आहे. शांतिपर्वाच्या अध्याय २१०-२१ मध्ये गांधर्ववेदाचे प्रथम प्रवर्तक नारद मानले आहेत. नाट्यवेदापेक्षा गांधर्ववेद भिन्न आहे. गांधर्ववेद सामवेदाचा उपवेद आहे. तर नाट्याला पंचमवेद म्हटले आहे. त्यामुळे ह्याचे क्षेत्र व्यापक आहे. संगीत व नृत्य त्याचाच एक भाग आहे. नाट्यशास्त्राच्या आरंभी ही गोष्ट प्रतिपादन केली आहे की ब्रह्माने नाट्यवेदाची रचना केली जी वेद व उपवेदाशी संबंधित होती.

**वेदापवेदैः सम्बन्धो नाट्यवेदो महात्मना।**

**एवं भगवता सृष्टो ब्रह्मणा ललितात्मकः।।**१.१९ (ना.शा.)

प्रो. सिलबा लेबी नाट्यशास्त्राला शककालीन रचना मानतात. पण हे मत अनेकांना मान्य नाही. डॉ. पी. बी. काणे यांच्या मतानुसार इ.स.च्या तीन शतके आधी भरताच्या नावाने रस आणि नाटकीय तत्त्वांच्या संबंधाने एक रचना विद्यमान होती. प्रो. कीथ सुद्धा नाट्यशास्त्राला ह्याच काळातील रचना मानतात.

नाट्यशास्त्रामध्ये विश्वकर्म्याचा उल्लेख येतो. कामतंत्र तसेच काही पुराणांमध्ये सुद्धा विश्वकर्म्याचा उल्लेख आहे. बृहस्पती, नारद आणि पाशुपताचा सुद्धा उल्लेख मिळतो. जरी ह्या उल्लेखांनी अन्य निष्कर्ष संभवत नसले तरी वर्तमान रूपात प्राप्त नाट्यशास्त्र इ.स. च्या प्रारंभिक शताब्दीपेक्षा पुरातन नाही, असे म्हणणे योग्य होईल. नाट्यशास्त्राचा काळ निश्चित करतांना काही अन्य प्रमाणे सुद्धा विचारात घ्यावी लागतात.

भरताचा प्राचीनतम उल्लेख कालिदासाच्या विक्रमोर्वशीयम् नाटकात मिळतो. त्यात कालिदासाचे असे कथन मिळते की देवतालोक नाट्याचार्य मानत होते. नाटकाचा मुख्य उद्देश अष्टरसांची अभिव्यक्ती हा होता. कालिदासाच्या खालील श्लोकात भरताचा स्पष्ट नामोल्लेख तसेच त्याच्या द्वारा स्वीकृत आठ रसांचा सुद्धा उल्लेख मिळतो.

**मुनिना भरतेन यः प्रयोगो भवतीष्वष्टरसाश्रयः प्रयुक्तः।**

**ललिताभिनयं तमद्य भर्ता मरुतां द्रष्टुमनाः स लोकपालः।।**

(वि.अ.२, श्लो. १०)



रघुवंशामध्ये सुद्धा एका जागी कालिदास नाट्याला 'असंगत्व वचनाश्रयम्।' म्हणतात. मल्लिनाथाच्या अनुसार हे वर्णन भरताच्या कारिकेशी मिळणारे आहे. भरताची कारिका अशी आहे -

**सामान्याभिनयो नाम ज्ञेयो वाग् सत्त्वजाः।**

कालिदास ह्या महाकाव्यात खण्डिता नायिकेचे जे वर्णन करतात ते सुद्धा भरताच्या नाट्यशास्त्राच्या आधारावरच करतात. त्यामुळे भरत कालिदासापेक्षाही प्राचीन ठरतात व त्यांचा काळ इ.स. च्या प्रथम शतकापूर्वीचा असू शकतो. मूळसूत्रांचा काळ ह्यापेक्षाही प्राचीन आहे.

'कुट्टिनीमत'मध्ये सुद्धा नाट्यशास्त्राला 'ब्रह्मोक्त'च म्हटले आहे. हे कथन नाट्यशास्त्रामध्ये वर्णित नाट्योत्पत्तीच्या कथेशी जुळणारे आहे. ह्या ग्रंथातील काही अध्यायांवर सुद्धा नाट्यशास्त्राचा प्रभाव दिसून येतो.

आनंदवर्धन सुद्धा ध्वन्यालोकात भरतमुनींचा उल्लेख करतात. आनंदवर्धन ज्या कैशिकी आदी वृत्तींचा उल्लेख करतात त्या सर्व भरतमुनीनुसारच आहेत. ह्याचा स्पष्ट उल्लेख ते करतात.

**यथा वेणीसंहारे विलासाख्यास्य प्रतिमुखसंध्यस्य प्रकृत रसनिबन्धनानुगुणमपि भरत मतानुसरणमात्रेच्छया घटनम्।**

तसेच,

**काव्यानिबन्धन भरतादावाणि प्रसिद्धम्।**

ह्या उद्धरणांमुळे हे स्पष्ट होते की भरतमुनी आणि वेणीसंहारचा कर्ता भट्टनारायण ह्यांचा आदरपूर्वक उल्लेख आनंदवर्धनाचार्यांनी केला आहे. ह्यावरून असे दिसते की आनंदावर्धनांच्या शेकडो वर्षे पूर्वी नाट्यशास्त्राच्या रस, वृत्ती आणि नायक संबंधी सिद्धांतांची स्थापना झालेली होती आणि नाटककारांनी त्यानुसार आपली साहित्यनिर्मिती केली होती.

मम्मटाचार्य भरताच्या रससूत्राचा स्पष्ट उल्लेख करतात,

**विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः।**

ह्या सूत्राच्या उल्लेखानंतरच भट्टलोल्लट, शंकुक, भट्टनायक आणि अभिनव गुप्ताच्या व्याख्या प्रस्तुत केल्या गेल्या. अभिनवगुप्ताच्या रचनांचा काळ ९८०-१०३० इ.स. पर्यंत मानला जातो. लोल्लटाचा काळ निश्चित

नाही. परंतु विद्वान त्यांचा काळ ह्या सर्वांच्या पूर्वीचा मानतात. म्हणून भरताचा काळ निश्चितपणे ह्या सर्वांच्या पूर्वीचा मानावा लागतो.

भवभूती भरताला 'तौयत्रिक सूत्रः।' नाट्यशास्त्राचा कर्ता मानतात. तसेच त्याला वाल्मीकीचा समकालीन मानतात.

बाणाने आपल्या 'कादंबरी'त चंद्रापीडाने ज्यात नैपुण्य संपादन केले अशा अनेक गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यातच तो भरताच्या 'नृत्यशास्त्रा'चा उल्लेख करतो. हर्षचरितात सुद्धा भरताद्वारा प्रतिपादित गायन सिद्धांतानुसार काही पात्र गायन करतांना दाखविली आहेत.

याज्ञवल्क्य स्मृतीमध्ये सुद्धा सामऋचांचे गायन भरताच्या पद्धतीनुसार केल्याचा उल्लेख मिळतो. भरताच्या नाट्यशास्त्रात सामगायनासंबंधी विस्तृत निर्देश उपलब्ध आहेत. त्याचेच अनुकरण याज्ञवल्क्य स्मृतीत आढळते. 'हाल'च्या गाथासप्तशतीमध्ये सुद्धा नाट्यशास्त्रातील पारिभाषिक शब्दांचा प्रयोग केला आहे. जसे, 'पूर्वरंग'. गाथासप्तशतीचा काळ २०० इ. पासून ४०० इ. पर्यंत मानला जातो.

सर्व प्राचीन आलंकारिक जवळपास ३० अलंकारांचे लक्षण आणि उदाहरण देतात. परंतु नाट्यशास्त्रात केवळ उपमा, दीपक, रुपक आणि यमक ह्या चार अलंकारांचाच उल्लेख येतो. परंतु भरताने छंद आणि प्राकृतांचे विस्तृत विवेचन केले आहे. ही गोष्ट महत्त्वाची आहे.

वरील सर्व बाबी नाट्यशास्त्राचा काळ इ. २०० च्या आसपासचा आहे, ह्याच्या प्रमाण ठरतात. तरी सुद्धा सर्वच विद्वान ह्या मताशी सहमत नाहीत. अनेक विद्वान नाट्यशास्त्रातील काही भाग जसे रससंबंधी भाग, निश्चितपणे वर्तमान रुपात उपलब्ध ग्रंथाच्या पूर्वीचा मानतात. त्यामुळे ते ह्या भागाचा काळ इ. ३०० पूर्व मानतात.

नाट्यशास्त्राचे एक संपादक श्री. मनमोहन घोष, भाषाविज्ञान तसेच अन्य प्रमाणांच्या आधारे नाट्यशास्त्राचा काळ इ.पू. ६०० मानतात. तर डॉ. सुशीलकुमार डे, नाट्यशास्त्राचा काळ इ.स. ४०० मानतात. त्यांच्या मते, ह्या ग्रंथाची कमीत कमी दोन संस्करणे आहेत. एक सूत्ररुपाने आणि दुसरे कारिका किंवा वृत्तीरुपाने.



**'भरत' आणि नाट्यसूत्र**

भरताच्या नावाविषयी सुद्धा विद्वानांत एकमत नाही. भरताच्या परवर्ती ग्रंथांमध्ये भरताचे नाव दोन प्रकारे मिळते. एक 'वृद्ध भरत' किंवा 'आदि भरत' आणि दुसरे केवळ 'भरत'.

नाट्यशास्त्राच्या विषयाबाबत सुद्धा ह्याच प्रकारे दोन ग्रंथाची धारणा प्रचलित आहे. एक नाव 'नाट्यवेद' तर दुसरे 'नाट्यशास्त्र'. पहिला ग्रंथ 'द्वादश साहस्री' व दुसरा ग्रंथ 'षट्साहस्री' नावाने प्रसिद्ध आहे. 'भावप्रकाशा'कर्ता शारदातनयांच्या मतानुसार षट्साहस्री हे पहिल्या द्वादश साहस्री ग्रंथाचेच संक्षिप्त रूप आहे.

**एवं द्वादशसाहस्रैः श्लोकरेकं तद्धतः।**
**षड्भिश्लोकसहस्रैर्यो नाट्यवेदस्य संग्रहः।**

म.म. हरप्रसाद शास्त्रींच्या मते नाट्यशास्त्राचा काळ इ.पू. दुसरे शतक आहे. भट्टलोलट आदि विद्वानांद्वारा रससूत्राची व्याख्या करणे तसेच भवभूतीद्वारा ह्या ग्रंथाचे नाव 'तौयत्रिक सूत्र' करणे हे ह्यासाठी आधार आहेत.

डॉ. डे हे सूत्रसंस्करण इ.पूर्व मानतात. कारण ह्याच काळात ह्या शैलीतील अनेकानेक ग्रंथांची रचना केल्या गेली. त्यांच्या मते, सूत्रसंस्करण उपलब्ध सर्व ग्रंथांपेक्षा सरस आहे.

**रचनाविषयक मते**

नाट्यशास्त्र भरतमुनींची रचना आहे की नाही, ह्याबाबतीत सुद्धा मतमतांतरे आहेत. अनेक विद्वान त्या नाट्यशास्त्रालाच भरताची रचना मानतात, ज्यात जवळपास १२,००० श्लोक होते. ही रचना आज अनुपलब्ध आहे. वर्तमान रचना ही भरत व त्याच्या शिष्यांची रचना आहे. अभिनवगुप्तांच्या मते ह्यामध्ये उपलब्ध अनुवंश्य श्लोक अन्य आचार्यांची रचना वाटतात. ह्यामध्ये गुरुशिष्य परंपरेने येणाऱ्या विचारांचे सार संग्रहित आहे.

म.म. आचार्य काणे ह्यांच्या मते नाट्यशास्त्र ही एका व्यक्तीची रचना नसून 'भरत' नामक नाट्य अभिनेत्याच्या एका पारिवारिक समूहाची रचना होय. एखाद्या नाट्यकुशल व्यक्तीने केवळ कुळाची प्रतिष्ठा वाढावी म्हणून ह्याचे संग्रहण केले असावे.

भावप्रकाश नाट्यवेदाच्या उत्पत्तीबाबत ज्या कथेचे वर्णन करतात ती कथा सुद्धा ह्याच मताची पुष्टी करते की, ही रचना एका व्यक्तीची नसून भरत ह्या व्यावसायिक नाट्यकुशल अभिनेत्याची रचना आहे.

**नाट्यशास्त्राच्या रचनेचा उद्देश**

नाट्यशास्त्राच्या रचनेचा उद्देश नाटककारांसोबतच अभिनेता तसेच दर्शकांना सुद्धा शिक्षित करणे आहे. कारण शास्त्राच्या अध्ययनाचा उद्देश दर्शकांना रसानुभूती करवून देणे हाच असतो. उद्देश्याच्या ह्या व्यापकतेमुळेच नाट्यशास्त्राची रचना सुद्धा अत्यंत व्यापक आधारावर केली आहे. स्वतः भरतमुनींनी म्हटले आहे,

**धर्ममर्थ्यं यशस्यं च सोपदेशं ससंग्रहम्।**
**भविष्यतश्च लोकस्य सर्वकर्मानुदर्शकम्।**
**सर्वशास्त्रार्थ सम्पन्नं सर्वशिल्प प्रवर्तकम्।**
**नाट्याख्यं पंचमं वेदं सेतिहासं करोम्यहम्।।** (१.१४-१५)

मी ह्या नाट्यशास्त्र नामक पंचमवेदाची रचना करतो. ह्यात धर्म, अर्थ, यश आणि शास्त्रातील उपदेश संगृहित आहे. ह्यात लोकमंगलासाठी सर्व भावकर्मांचे पण दिग्दर्शन केले आहे. ह्यात सर्व शास्त्रांच्या अर्थाची अभिव्यक्ती झाली आहे. हे सर्व प्रकारच्या शिल्पांचे प्रवर्तक तसेच इतिहास सुद्धा आहे.

**नाट्यवेदाची उत्पत्ती**

भरताने नाट्यशास्त्रामध्ये नाट्यउत्पत्तीची परंपरा सांगितली आहे.

आत्रेय आणि अन्य ऋषी ब्रह्माला पाच प्रश्न विचारतात-

१) नाट्यवेदाची उत्पत्ती कशी झाली?

२) कोणासाठी झाली?

३) ह्याची अंगे कोणती आहेत?

४) निश्चित निष्कर्षावर पोहचण्याचे उपाय किंवा साधन काय आहे?

आणि ५) मंचावर ह्याचे प्रदर्शन कसे केले जाते?

अभिनव गुप्ताच्या मते ह्या ५ प्रश्नांची उत्तरे ग्रंथात एका जागी नाहीत तर संपूर्ण ग्रंथात विखुरलेली आहेत.



**नाट्यशास्त्राचे स्वरूप**

नाट्यशास्त्र हा एक विशाल ग्रंथ आहे. तो एक प्रकारे विश्वकोशच आहे. रुपक पाहिल्यानंतर जो सात्त्विक आनंद मिळतो त्याचे विस्तृत विश्लेषण यात केले आहे. नाट्यशास्त्र व रंगमंचाच्या निर्मितीवर यात विस्तृत प्रकाश टाकला आहे. रुपकासाठी उपयुक्त छंद, आंगिक, वाचिक, सात्त्विक, आहार्य अभिनय, रुपकाचे प्रकार, त्यांची रचना व शैली, नाट्यवृत्ती इ. विविध विषयांचे विस्तृत विवेचन यात केले आहे. एवढेच नव्हे तर नाटकामध्ये प्रयुक्त होणाऱ्या गीत, वाद्यांच्या विषयी सुद्धा पर्याप्त सूचना दिल्या आहेत. संगीत व छंदांच्या परस्पर संमिश्रणाची पण सूक्ष्म चर्चा यात केली आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे नाटकाच्या उदात्त व उच्चतम लक्ष्यावर भर दिला आहे. अश्लील व्यवहार, दृश्य व भाषेचा निषेध केला आहे. अभिनेत्यांच्या पुढे उच्चतम आध्यात्मिक आदर्श प्रस्थापित केला आहे आणि त्यांना सूचना केली आहे की जर ते स्वतःला भक्तिपूर्वक स्वतःच्या कलेला समर्पित करतील तरच ती मानव समाजाची सर्वश्रेष्ठ सेवा ठरेल व महान पुण्य प्राप्त होईल.

नाट्यशास्त्राच्या अंतिम अध्यायावरून असे दिसून येते की त्या काळी नाट्यविद्या व अभिनेत्यांना सन्मानाच्या दृष्टीने पाहिले जात नव्हते. भरताने ह्या दोहोंची प्रतिष्ठा वाढविण्याचा प्रयत्न केला आहे.

नाट्यविषयक साहित्यामध्ये संपूर्ण जगात या ग्रंथाचे स्थान अद्वितीय आहे. नाट्यशास्त्र जितके सर्वस्पर्शी, गंभीर आणि कलेचे सूक्ष्म व व्यापक विवेचन करणारे आहे तितके सूक्ष्म विवेचन विश्वातील कोणत्याही भाषेतील ग्रंथात नाही.

पाणिनीने त्याच्या अष्टाध्यायीत शिलाली किंवा कृशाश्वद्वारा रचित नटसूत्रांचा उल्लेख केला आहे. नटसूत्रांचा संबंध त्या ग्रंथाशी येतो ज्यात रंगमंचावर नटांचे वावरणे, वस्त्र धारण करणे तसेच अन्य आवश्यक उपकरणांचे वर्णन केले असते. पाणिनीद्वारा निर्दिष्ट नटसूत्र आज उपलब्ध नाहीत. आज नाट्य व अलंकारविषयक उपलब्ध प्राचीनतम ग्रंथांमध्ये भरतरचित नाट्यशास्त्र ग्रंथ आहे. ह्या ग्रंथाला भारतीय ललितकलांचा विश्वकोशच म्हणता येते. कारण, ह्यात नाट्य प्रधान असून सुद्धा त्याला उपकारक अलंकारशास्त्र,

संगीतशास्त्र, छंदशास्त्र इ. शास्त्रांच्या मूलसिद्धांतांचे प्रतिपादन केले आहे. ह्या ग्रंथामध्ये ३६ अध्याय व ५००० श्लोक असून अधिकांश श्लोक अनुष्टुप छंदात लिहिले आहेत. केवळ ६, ७ व २८ व्या अध्यायातील काही भाग गद्यात्मक आहे.

नाट्यशास्त्र ही एकाच काळातील रचना नाही तर अनेक शतकांच्या दीर्घ साहित्यिक प्रयत्नांचे सुंदर फळ आहे.

नाट्यशास्त्रामध्ये सुरवातीलाच आत्रेय व अन्य मुनींनी भरताला काही प्रश्न विचारले आहेत.

१) पूर्वरंगामध्ये कोणत्या देवतांची पूजा केली जाते?

२) नाट्यविद्या स्वर्गातून पृथ्वीवर कशी आली?

३) भरताच्या वंशजांना 'नट' का म्हटले गेले?

भरताने त्यांना उत्तर दिले की त्याच्या वंशजांना त्यांच्या कलेचा अभिमान झाला आणि ते ऋषींची नक्कल करू लागले. उच्छृंखल व अनुचित रुपकाची रचना करू लागले. म्हणून ऋषींनी संतापाने भरत व त्याच्या वंशजांना शाप दिला की त्यांची गणना शूद्रांमध्ये केली जाईल.

भरताने उत्तर दिले की भविष्यात नाट्यविद्येचे शिक्षण उच्च चरित्र असणाऱ्या व्यक्तींनाच दिले जाईल आणि ते आपल्या दोषांसाठी प्रायश्चित्त करतील.

त्याच काळात नहुष राजा स्वर्गाधिपती झाला व त्याने भरताला नाट्यविद्येचा प्रचार पृथ्वीवर करण्यास सांगितले. त्यानंतर भरताने आपल्या संततीला नाट्यविद्येचा उपदेश केला. कोहल, वात्स्य, शांडिल्य व धूर्तिला यांनी त्याचा सर्व विश्वात प्रचार केला. नाट्यशास्त्र पवित्र व मंगल आहे. देवता पुष्प, चंदन इ. उपचारांनी केलेल्या पूजेने जितक्या प्रसन्न होत नाहीत त्याहून अधिक त्या नाटकाच्या अभिनयाने होतात.

**नाट्य उत्पत्तीची परंपरा**

भरताने नाट्यशास्त्रामध्ये 'नाट्यरचनेचा जीवनाशी घनिष्ठ आणि प्रत्यक्ष संबंध आहे', ह्या महत्त्वपूर्ण तत्त्वाची घोषणा केली आहे. ह्यामध्ये सर्व वर्गांचा विचार केला आहे.



**लोकस्वभावं सम्प्रेक्ष्य नराणां च बलाबलम्।**
**सम्भोगं चैव युक्तिं च ततः कार्यं तु नाटकम्।।** (२१/१२८)

मनुष्याचा स्वभाव, त्यांची शक्ती तसेच दुर्बलता, त्याचे सुख तसेच तर्कशक्तीच्या अध्ययनाच्या आधारावरच कुशल लेखकांनी नाटकाच्या रचनेसाठी प्रवृत्त झाले पाहिजे. कारण जोपर्यंत नाटकामध्ये जीवनाच्या मार्मिकतेचे प्रदर्शन होणार नाही तोपर्यंत केवळ कलाकौशल्याच्या आधारे नाटक सज्जनांचे मनोरंजन करण्यास समर्थ होणार नाही.

**उदात्तमपि यत्काव्यं स्यादङ्गै परिवर्जितम्।**
**हीनत्वात्तु प्रयोगस्य न सतां रञ्जयेन्मनः।** (२१/५७)

भरतमुनींनी नाटकाला साधारण लोकांच्या जीवनाजवळ आणण्यासाठी त्यात पात्रानुकूल अनेक प्राकृतांची योजना केली. त्यामुळे नाट्यरचना अधिक लोकप्रिय झाली. रूपकाच्या दशभेदांचे हेच रहस्य आहे की त्यात जीवनाच्या सर्व चांगल्यावाईट भावनांचे चित्रण आले आहे. प्रकरण, भाण, प्रहसन इ. मध्ये जीवनाच्या यथार्थतेची झलक तसेच साधारण किंवा वाईट मनोवृत्तींचे चित्रण दिसून येते.

भरतमुनींनी जीवनाच्या समग्रतेच्या चित्रणावर भर दिला आहे.

**नानाभावोपसंपन्नं नानावस्थान्तरात्मकम्।**
**लोकवृत्तानुकरणं नाट्यमेतन्मया कृतम्।**
**न तज्ज्ञानं न तच्छिल्यं न सा विद्या न सा कला।**
**नासौ योगो न तत्कर्म नाट्येऽस्मिन्यन्न दृश्यते।।** (१।११६)
**सर्व शास्त्राणि शिल्पानि कर्माणि विविधानि च**
**अस्मिन्नाट्ये समेतानि तस्मादेतन्मया कृतम्।।** (१।११७)

रसनिष्पत्तिच्या संबंधामध्ये भरतमुनींनी रससिद्धांताचे मूळ सूत्र प्रस्तुत केले. **विभावानुभावव्यभिचारि संयोगाद्रसनिष्पत्तिः।**

भरतमुनींनी स्थायीभावांना राजाप्रमाणे आणि अन्य भावांना साधारण जनतेप्रमाणे म्हटले आहे. भरतमुनींनी नाटकात आठ रस मानले आहेत.

**श्रृङ्गारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः**
**बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः।** (६.१६)

ह्या रसांच्या निरुपणानंतर शांत रसाची पण चर्चा केली आहे.

**अत शान्तो नाम। मोक्षाध्यात्मसमुत्थ शान्तरसो नाम सम्भवति।**

**एवं नवरसा दृष्टा नाट्यज्ञैर्लक्षणान्विता।**

इतकेच नव्हे तर भरतमुनीने शांतरसापासूनच रति आदि अन्य सर्व भावांची उत्पत्ती आणि शांत रसातच त्या सर्वांचा लयसुद्धा वर्णन केला आहे.

**स्वं स्वं निमित्तमासाद्य शान्ताद्भावः प्रवर्तते।**

**पुनर्निमित्तापाये च शान्त एवोपलीयते।** (६.१०८)

भरतमुनी आनंदानुभूतीला सर्वच रसात मानतात.

**आनन्दामर्षाभ्यां धूमाञ्जननृम्भणाद्भयाच्छोकात्।**

**अनिमेषप्रेक्षणतः शीताद्रोगाद्भवेदास्त्रम्।** (७.१५१)

शोक इ. मुळे दुःख इ. उत्पन्न होतात असे लोकव्यवहारात आढळते. काव्यात नाही. काव्यामध्ये अशा दृश्यांमुळे चित्त द्रवीभूत झाल्यामुळे अश्रुपातादि परणिाम होतात तसेच चित्त द्रवीभूत झाल्यामुळे दुःखोद्रेकाबरोबरोच आनन्द्रोद्रेक पण होतो. आनन्दजनित अश्रुपात होणे पण प्रत्यक्ष सिद्ध आहे.

**विषयवस्तू**

नाट्यशास्त्र या ग्रंथात एकूण ३६ अध्याय असून सुमारे ५००० श्लोक आहेत.

१) प्रथम अध्यायात नाट्योत्पत्तीच्या संबंधात आत्रेयाच्या जिज्ञासेला उत्तर देतांना नाट्याच्या उत्पत्तीचे वर्णन आहे. सर्व वर्णांसाठी ब्रह्माद्वारा पंचमवेदाची रचना करण्याची आज्ञा स्वीकारून भरताने भिन्न भिन्न वेदांतील अंश घेऊन नाट्यवेदाची रचना केली व आपल्या १०० शिष्यांना त्याचा उपदेश केला.

शूद्रांसाठी वेदाध्ययन वर्ज्य असल्यामुळे ब्रह्माने भरताला, जो सर्व वर्णांसाठी उपयुक्त असेल असा पंचमवेद रचण्याची आज्ञा केली.

**न वेद व्यवहारोऽयं संश्राव्यः शूद्रजातिक**

**तस्मात्सृजापरं वेदं पञ्चमं सार्ववर्णिकम्।**

भरताने ऋग्वेदापासून कथा, सामवेदापासून गायन, यजुर्वेदापासून अभिनय आणि अथर्ववेदापासून रस घेऊन नाट्यवेदाची रचना केली व आपल्या शिष्यांना त्याचा उपदेश केला.

२) द्वितीय अध्यायात नाट्यमंडप, प्रेक्षागृह तसेच स्तंभांच्या रचनेसंबंधी विस्तृत



विवेचन केले आहे. नाट्यमंडप दोन भागात विभागलेला असावा आणि तो पर्वतगुहेच्या आकाराचा असावा. भिंतीवर चित्रे असावीत. दर्शकांना बसण्यासाठी आसनव्यवस्था काष्ठ किंवा विटांची बनविलेली असावी.

३) तृतीय अध्यायात महादेव, ब्रह्मा, विष्णु, बृहस्पती आणि ग्रहादि देवांची उपासना तसेच नाटकासाठी त्यांच्या आशीर्वादाची कामना वर्णन केली आहे.

४) चतुर्थ अध्यायात दोन नाटकांच्या प्रयोगाचे वर्णन येते. 'अमृतमंथन' नाटकाचा प्रयोग देवांपुढे आणि त्रिपुरदाहचा प्रयोग महादेवापुढे झाला. तण्डुद्वारा भरताला विविध मुद्रांचे ज्ञान दिल्या गेले. १) अङ्गहार (अङ्ग परिचालन) २) करण (अंगमुद्रा) एकूण १०८ करण आहेत. चिदंबरम् येथील नटराज मंदिराच्या पूर्व आणि पश्चिम गोपुरात प्रत्येक शिळेवर या मुद्रा कोरल्या आहेत. ३) रेचक (भावमुद्रा)

ताण्डव नृत्याची उत्पत्ती व तंत्र वर्णन केले आहे. अभिनयात नर्तनाला विशेष महत्त्व नाही. केवळ सौंदर्यवृद्धिसाठी नृत्य येते.

५) पंचम अध्यायात पूर्वरंग, नांदी, ध्रुवा, प्रस्तावना यांचे वर्णन आहे.

६) सहाव्या अध्यायात ऋषींद्वारा विचारलेल्या पाच प्रश्नांचे वर्णन आहे. रसांच्या नामकरणाचा आधार, भाव, अभिनय, धर्मी, वृत्ती, सिद्धि, स्वर, आतोद्य, गान व रंगाचे वर्णन आहे. कारिकेचा अर्थ, निरुक्त, आठ रस, आठ स्थायी भाव, ३३ व्यभिचारी भाव, आठ सात्त्विक भाव, चार प्रकारचा अभिनय (अंगिक, वाचिक, आहार्य, सात्त्विक) दोन प्रकारचे धर्मी (लोकधर्मी, नाट्यधर्मी) चार प्रकारच्या वृत्ती (भारती, सात्वती, कौशिकी, आरभटी), प्रवृत्ती, आवन्ती, दाक्षिणात्या, ओड्रमागधी, पांचाली, सिद्धी दोन प्रकारच्या (दैवी, मानुषी), सात स्वर (निषाद, मध्याम, षड्ज, पंचम, ऋषभ, गांधार, धैवत), चार प्रकारची वाद्ये (तत, अवनद्ध, घन, सुषिर), पाच प्रकारचे गीत, रंगमंच (वर्गाकार, आयताकार, त्रिभुजाकार), विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भावाद्वारा रसनिष्पत्तीचे प्रकार, रसांचा पारस्पारिक तसेच भावांशी संबंध, रंग आणि रसांची अधिदेवता, रस व त्यांच्या स्थायी भावांचे विस्तृत विवेचन या अध्यायात केले आहे.

७) सप्तम अध्यायात विभाव, अनुभाव, स्थायीभाव तसेच व्यभिचारी भावांचे

तसेच आठ प्रकारच्या सात्त्विक भावांचे वर्णन आहे.
८) अष्टम अध्यायात चार प्रकारचा अभिनय- सात्त्विक (अष्ट सात्त्विक भाव), आंगिक, वाचिक आणि आहार्य यांचे वर्णन आहे.
९) नवव्या अध्यायामध्ये नाट्यामध्ये हातांची विविध प्रकारची स्थिती, वक्ष, कक्षा, उदर, कटी तसेच पायांच्या स्थितीच्या भिन्न भिन्न आकृती यांचे वर्णन आहे. यात हातांच्या २४ मुद्रा, पताका, त्रिपताका आणि बद्ध हाताच्या १३ मुद्रा, अंजली, स्वस्तिक, २७ प्रकारचे नृत्तहस्त, ६४ प्रकारचे अंगसंचालन, हस्तमुद्रांची परिभाषा व त्यांचा प्रयोग, अन्य प्रकारचे अंगसंचालन, हस्तमुद्रांचा प्रयोग यांचे वर्णन आहे.
१०) दहाव्या अध्यायात देशकालानुरुप रस व भाषांची स्थिती यांचे वर्णन आहे. नृत्यामध्ये हस्तमुद्रा, वक्षस्थल, बगल, कटी तसेच शरीराच्या अन्य भागांचे ५ प्रकारे परिचालन, ह्यांचे निरूपण व्याख्या व विभिन्न वेळी त्यांचा प्रयोग यांचे विस्तृत विवेचन केले आहे.
११) अकराव्या अध्यायात चारी (चरणगती) खण्ड, करण आणि मण्डलाचे लक्षण प्रकार व स्वरूप वर्णन केले आहे. ह्यात १६ प्रकारची भौम्य (भूमिकी चारी) व १६ प्रकारची आकाशचारी ह्यांची परिभाषा व प्रयोग, नाटकामध्ये धनुर्विज्ञानाच्या प्रदर्शनाचा प्रचार तसेच ज्या पात्रांना अभिनयात तीव्र गती, चालणे अपेक्षित नाही किंवा अधिक परिश्रम करण्याची गरज नाही त्यांचे वर्णन केले आहे.
१२) बाराव्या अध्यायात मंडलांची संख्या, परिभाषा व लक्षण वर्णिले आहे.
१३) तेराव्या अध्यायात रसानुसार पात्रांची योग्य गती वर्णन केली आहे. रसांनुसार पात्रांच्या चालण्याचा ढंग, तसेच ध्रुवामानाचा प्रारंभ झाल्यानंतर वाद्यांसह पात्रांचा प्रवेश करण्याचे स्थान, देवता, राजा, मध्यवर्गातील पुरुष व स्त्रिया, निम्न वर्गाच्या लोकांना रंगमंच पार करण्यास लागणारा वेळ, रौद्र-बीभत्स-वीर व अन्य रसांना प्रस्तुत करण्याची पद्धत, शीतपीडित व संन्यासी व्यक्ती, मदमत्त व उन्मत्त व्यक्तींच्या अंगपरिचालनाचे प्रकार वर्णन केले आहेत.
१४) चौदाव्या अध्यायात नाट्यमंडपामध्ये संगीत, गृह, उद्यान आदिंसाठी स्थान, विभाग व स्थान निर्णय यांचे वर्णन आहे.



अंकांचे लक्षण आणि व्याख्या, स्थान, भाषा, वेशभूषा तसेच सभ्याचारावर आधारित प्रवृत्ती ज्या आवन्ती, दाक्षिणात्य, पाञ्चाली, औड्र, मागधी आहेत, त्यांचे वर्णन आहे. दशरुपकाचे सुकुमार तसेच आविद्ध श्रेणीमध्ये विभाजन केले आहे. डिम, समवकार, व्यायोग व ईहामृग नामक रुपक आविद्ध आहेत व दशरुपकातील उर्वरित सहा रुपक सुकुमार आहेत. लोकधर्मी व नाट्यधर्मींची परिभाषा व उदाहरणे दिली आहेत.
१५) पंधराव्या अध्यायात स्वरांवर आधारित वाचिक अभिनय व त्यासाठी आवश्यक व्याकरण यासंबंधी विस्तृत उल्लेख व छंदाचे विस्तृत विवेचन केले आहे. स्वर आणि व्यंजनावर आधारित वाचिक अभिनय आणि वाणीच नाट्य व आंगिक अभिनयाचे शरीर आहे. वेशभूषा व अन्य उपकरणांनी सांगितली जाणारी गोष्ट केवळ संकेतमात्र आहे, असे प्रतिपादन केले आहे.

स्वर, व्यंजन, संज्ञा, क्रिया, उपसर्ग, संधी इत्यादिंचे विस्तृत आलोचनात्मक विवेचन केले आहे. नाटकामध्ये संस्कृत किंवा प्राकृतचा प्रयोग असावा किंवा दोहोंचा प्रयोग असावा असे सांगितले आहे.

एकपासून ते २६ मात्रांचे छंद, प्रत्येक छंदाचे अनेक उपभेद ह्यांची विस्तृत संख्या वर्णन केली आहे. आठ गणांची प्रक्रिया (य,र,त,न,भ,ज,स,म) गुरू, लघु व यतीचे अर्थ वर्णन केले आहेत.
१६) सोळाव्या अध्यायात नाट्योपयोगी विभिन्न वृत्त, त्यांचे लक्षण व उदाहरणे वर्णन केली आहेत. यात सम व विषम वृत्त, आर्या इ. छंद वर्णन केले आहेत.
१७) सतराव्या अध्यायात काव्याची ३६ लक्षणे, उपमा, रुपक, दीपक आणि यमक अलंकाराचे लक्षण, त्यांचे उपभेद व उदाहरणे दिली आहेत. काव्याचे १० दोष व १० गुण व त्यांची परिभाषा दिली आहे.
१८) अठराव्या अध्यायात विभिन्न प्राकृतांचे वर्णन तसेच विभिन्न वर्गांची पात्रे त्यांच्या उच्चारणासंबंधी नियम वर्णन केले आहेत.

प्राकृताचे उच्चारण तीन प्रकारे आहे. १) संस्कृतसम २) विभ्रष्ट (ज्यात संस्कृत स्वर आणि व्यंजन बदलले जातात) आणि ३) देशी.

कोणत्या पात्रांनी संस्कृत, कोणत्या पात्रांनी प्राकृत किंवा अन्य बोलीचा प्रयोग केला पाहिजे याचे वर्णन केले आहे.

प्राकृतात शौरसेनी प्राकृत प्रमुख आहे. परंतु अन्य ६ भाषा मागधी, अवन्तिजा, प्राच्या, अर्धमागधी, बाल्हिका, दाक्षिणत्या यांचा प्रयोग अभिनेत्याच्या इच्छेनुसार केला जाऊ शकतो. परंतु त्यांचा प्रयोग कोणी करावा हे कथन केले आहे. शबर, अभीर, चाण्डाल, सचर (शकार), द्रविड, ओड्रो (उश, उडीसा, ओरिया निवासी) तसेच वनवासींच्या बोलीला 'विभाषा' म्हणतात.

१९) एकोणीसाव्या अध्यायात विभिन्न वर्गातील पात्रांना संबोधन करण्यासंबंधी निर्देश दिले आहेत. उच्च, मध्य व निम्न वर्गाच्या पात्रांना संबोधन करण्याच्या विविध पद्धती आहेत. ब्राह्मणाला आर्य, राजाला महाराज, द्विजातीयांच्या नामापुढे क्रमशः शर्मा, वर्मा तसेच दत्त पद लावावे, भद्रवेश्यांच्या नावापुढे दत्ता, मित्रा, सेना पद लावावे.

पाठ्याचे (गद्यभाग) गुण, संगीताचे सप्तस्वर (षड्ज, ऋषभ इ.), उच्चारणाची तीन स्थाने वक्षःस्थळ, कण्ठ, शीर्ष ही प्रमुख आहेत. चार स्वर उदात्त, अनुदात्त, स्वरित, कम्पित हे चार स्वर असून काकू स्वराचे दोन प्रकार आहेत. उच्च, दीप्त, भन्द्र, नीच, द्रुत आणि विलम्बित असे अलंकार वर्णन केले आहेत.

२०) विसाव्या अध्यायात दहा प्रकारच्या रुपक नाटकांचे विस्तृत वर्णन आणि मंचोपयोगी दृश्यासंबंधी निर्देश दिले आहेत.

प्रथम प्रकारच्या रुपकांचे विषय आणि वैशिष्ट्ये सांगितली आहेत. रंगमंचावर कोणत्या घटना सादर कराव्यात आणि कोणत्या सादर करू नयेत हे विधिनिषेध सांगितले आहेत.

प्रवेशक तसेच विष्कम्भकाची प्रणाली वर्णन केली आहे.

प्रकरण तसेच अन्य प्रकारच्या रुपकांची विशेषता व त्यांच्या समान अंगांची परिभाषा वर्णन केली आहे.

२१) एकविसाव्या अध्यायात नाटकाची कथावस्तु व तिचे आधिकारिक व प्रासंगिक हे दोन प्रकार, पाच अवस्था- प्रारंभ, प्रयत्न, प्राप्त्याशा, नियताप्ति, फलागम, पाच अर्थप्रकृति- बीज, बिन्दु, पताका, प्रकरी, कार्य, पाच सन्धि- मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्ष, निर्वहण, त्यांच्या परिभाषा, मध्यन्तर,



पंचसंधीचे ६४ प्रकार, मुख व गर्भसंधीचे १२ प्रकार, प्रतिमुख व विमर्ष संधीचे १३ प्रकार, निर्वहण संधीचे १४ प्रकार व त्यांच्या परिभाषा दिल्या आहेत. पाच अर्थोपक्षेपक- विष्कम्भक, चूलिका, प्रवेशक, अंकावतार व अंकमुख ह्यांचे वर्णन आहे.

२२) बाविसाव्या अध्यायात भारती, सात्वती, आरभटी आणि कौशिकी या वृत्तींची पौराणिक उत्पत्ती वर्णन केली आहे.

भगवान विष्णुंचे मधुकैटभ दैत्यांशी युद्ध झाले. त्यावेळी ह्या चारही वृत्तींचा प्रयोग केला गेला. त्यांची उत्पत्ती चार वेदांपासून झाली. ऋग्वेदापासून भारती, यजुर्वेदापासून सात्वती, सामवेदापासून कौशिकी आणि अथर्ववेदापासून आरभटी वृत्ती उत्पन्न झाली. ह्या चार वृत्तींचे उपभेद व त्यांची व्याख्या, चार वृत्तींचा भिन्न भिन्न रसांमध्ये विनियोग याचे वर्णन केले आहे.

२३) तेविसाव्या अध्यायात आहार्य अभिनयावर आधारित नाट्यप्रस्तुती, चतुर्विध नेपथ्य, त्यांचे लक्षण व व्याख्या वर्णन केल्या आहेत.

नाट्याचे प्रदर्शन आहार्य अभिनयावर अवलंबून आहे आणि आहार्य अभिनय नेपथ्यावर आधारित आहे. वेशभूषा, आभूषण तसेच प्रदर्शनाचे विभिन्न उपाय ह्यात येतात.

नेपथ्य चार प्रकारचे असते. प्रस्तुत, अलंकार, अंगरचना व संगीत यांच्या परिभाषा दिल्या आहेत.

पुस्त म्हणजेत प्रस्तुत. पर्वत, रथ इ. प्रकट करण्यासाठी वस्त्र व चर्मापासून बनविलेल्या आकृतींचा प्रयोग केला जात असे.

अलंकार म्हणजे पुष्पमाला. पायापासून डोक्यापर्यंतचे अलंकार तसेच विभिन्न देश व नगरांच्या स्त्रीपुरुषांची वेशभूषा, तिलक, अंजन, दंतराग, ओष्ठराग इ. चा समावेश अलंकारात होतो.

अंगरचना म्हणजे राजा, धनिक, किरात, आन्ध, शक, यवन, शूद्र इ. वर्ण प्रकट करण्यासाठी शरीराला रंगविणे. तसेच दाढी, मिशा इ. चा वापर करणे. सजीव म्हणजे द्विपद, चतुष्पद, खग, सर्प इ. प्रदर्शित करण्याचा ढंग तसेच नाट्याचे उपकरण व नकली शस्त्रास्त्रांचे वर्णन केले आहे.

२४) चोविसाव्या अध्यायात सामान्याभिनयाचे वर्णन आहे. ज्या अभिनयाचे

वर्णन केले नाही परंतु जो आवश्यक आहे तो सामान्याभिनय होय. सत्त्वगुणाची बाह्य अभिव्यक्ती, तरुणींचे तीन अंगज अलंकार-भाव, हाव आणि हेला. लीला, विश्वा इ. १० प्रकारचे स्वभावज आणि सात प्रकारचे अयत्नज-शोभा, कान्ति, दीप्ती, माधुर्य, धैर्य, प्रागल्भ्य, औदार्य, रस आणि भावाच्या दृष्टीने आंगिक अभिनय, उच्चारणाच्या दृष्टीने द्वादशविध अभिनय, दहा प्रकारच्या स्त्रियांचे वर्णन, आठ प्रकारच्या नायिका तसेच त्यांचे मंचावर सामाजिकांच्या दृष्टीने प्रस्तुतीकरण वर्णन केले आहे.

२५) पंचविसाव्या अध्यायात वैशिक म्हणजे जी व्यक्ती कलांमध्ये निष्णात आहे, त्याचे व त्याच्या ३३ गुणांचे वर्णन आहे. अशा व्यक्तीचे स्वाभाविक गुण, त्यांचे मित्र व दूती, प्रेमविव्हल तसेच पुरुषांची घृणा करणाऱ्या स्त्रियांच्या चेष्टा वर्णन केल्या आहेत.

स्त्रियांच्या यौवनाच्या चार अवस्था, प्रेमीजनांचे पाच प्रकार, स्त्रीला वश करण्याचे ५ उपाय-साम, प्रदान, भेद, दण्ड, उपेक्षा यांचे वर्णन केले आहे.

२६) सव्विसाव्या अध्यायात चित्राभिनय, आंगिक, आहार्य अभिनयाचे असे अंक की जे पहिले वर्णन केल्या गेले नाहीत म्हणून सामान्य अभिनयाच्या अंतर्गत येतात, त्यांचे वर्णन आहे.

आकाश, रात्र, सायंकाळ, अंधार, उष्णता इ. चे प्रदर्शन करण्याचे उपाय. हर्ष, क्रोध, विषाद व शोक प्रकट करण्याचे उपाय

आकाशवचन, आत्मगत, अपवारित व जनान्तिक भाषणांच्या परिभाषा. वृद्ध तसेच बालकाच्या संभाषणाची पद्धती, आसन्नभृत्याच्या प्रदर्शनाचा ढंग इ. चे वर्णन केले आहे आणि जनसाधारणांपासून शिकण्याचे अन्य अभिनय कथन केले आहेत.

२७) सत्ताविसाव्या अध्यायात सिद्धी म्हणजे अभिनयाचे सफल प्रदर्शन वर्णन केले आहे. सिद्धी मानुषी आणि दैवी दोन प्रकारची असते. लोकांद्वारा साधुवाद आणि उपहार देऊन प्रस्तुतीची प्रशंसा केली पाहिजे. दैवी सिद्धी, शांत वातावरण तसेच त्रुटिरहित प्रस्तुती आणि निःशब्द वातावरणाने संभवते.



दर्शकांद्वारा अभिनयाच्या सफलतेवर संतोष प्रकट करण्याचे प्रकार म्हणजे पारितोषिक रुपामध्ये वस्त्र इ. चे दान देणे, विदूषकाच्या चेष्टांवर हसणे, चमत्कारपूर्ण तसेच प्रेमदृश्यांवर अट्टहास करणे, साधुवाद किंवा अहोवाद उच्चारणे, करुण दृश्यांवर कष्टवाद उच्चारणे.

दैवी सिद्धीचा अर्थ असा होतो, कोलाहल, विघ्न तसेच अपशकुन न होणे, दर्शक कक्ष भरलेले असणे. दुर्घटना किंवा अपशकुनांचे स्पष्टीकरण देतांना आग लागणे, वादळ होणे, हत्ती, सर्प इ. प्राण्यांचा उपद्रव होणे त्याचप्रमाणे घृणा करणाऱ्या व्यक्तीकडून टाळ्या वाजविणे, अभिनेत्यांवर शेण, चिखल फेकणे, अभिनेत्याद्वारा संवादाचे विस्मरण होणे, मुकूट किंवा अन्य आभूषण खाली पडणे इ. बाबी सांगितल्या आहेत. नाटकाचे निर्णायक किंवा परीक्षकांची योग्यता सांगितली आहे.

२८) अठ्ठाविसाव्या अध्यायात चार प्रकारच्या वाद्यांचे वर्णन केले आहे.

तत - वीणेसमान तारा असलेली वाद्ये

अवनद्ध - ढोलकीसमान चामड्याने झाकलेली वाद्ये

घन - तालवाद्ये

सुषिर - बासरीसमान आतून पोकळ असलेली वाद्ये

सात स्वर षडज्, ऋषभ, धैवत इ. त्यांचे प्रकार वादी, संवादी, अनुवादी, विवादी व त्यांच्या व्याख्या, ग्राम, मूर्च्छना, २७ श्रुती व जाति यांचे वर्णन केले आहे.

२९) एकोणतिसाव्या अध्यायात कोणत्या रसात कोणत्या जाती व स्वराचा प्रयोग करावा हे सांगितले आहे. तसेच चार वर्ण आरोही, अवरोही, स्थायी व संचारी, त्यांच्यावर आश्रित ३३ अलंकार व त्यांची परिभाषा दिली आहे.

३०) तिसाव्या अध्यायात बासरी वाद्याचे विस्तृत विवेचन दिले आहे.

३१) एकतिसाव्या अध्यायात ताल व लयीचे विवेचन दिले आहे.

३२) बत्तिसाव्या अध्यायात ध्रुवाचे विभिन्न प्रकार व त्यांचे प्रतिपादन केले आहे. नाट्यामधले गायनाचे विविध प्रकार, गायकाची योग्यता वर्णन केली आहे.

अभिनेत्याची रंगमंचावर प्रवेश करण्याची व निर्गमनाची वेळ, अंकाच्या शेवटी किंवा अभिनयाच्या मध्ये किंवा एखादे पात्र पडल्यास, पाठ (संवाद) विसरल्यास किंवा मूर्च्छित झाल्यास गायल्या जाणाऱ्या ध्रुवाची परिभाषा सामान्यतः शौरसेनी असावी असे सांगितले आहे. गायक तसेच वीणा व वंशी वाजविणाऱ्याची योग्यता वर्णन केली आहे. सामान्यपणे स्त्रिया गायन करतात व पुरूष वादनाचे कार्य करतात. संगीताचार्य व संगीत शिकविणाऱ्यांच्या ६ विशेषता सांगितल्या आहेत.

३३) तेहतिसाव्या अध्यायात संगीताचे आचार्य तसेच शिष्याची योग्यता सांगितली आहे. मृदंग, पणन, दर्दुर इ. अवनद्ध वाद्यांचे विवेचन केले आहे. स्वाति तसेच नारदाद्वारा गान्धर्व तसेच वाद्यांचे प्रवर्तन, ज्या प्रसंगी सर्व प्रकारची वाद्ये वाजविली जातात तो प्रसंग, वाद्यांच्या अधिरक्षक देवता वर्णन केल्या आहेत.

३४) चौतिसाव्या अध्यायात पुरूष आणि स्त्रियांच्या उत्तम, मध्यम आणि अधम अशा तीन प्रकृती व त्यांची विशेषता वर्णन केली आहे. पुरूष पात्रांसाठी त्रिविध प्रकारचे प्राकृत सांगितले आहे. नायकाचे चार प्रकार- धीरोद्धत, धीरललीत, धीरोदात्त व धीरप्रशांत व ह्या श्रेणीत येणाऱ्या नेत्यांचे वर्णन केले आहे.

स्त्रियांच्या विभिन्न श्रेणी महादेवी, देवी, नर्तिका, परिचारिका व त्यांचा परिचय दिला आहे. अंतःपुरातील परिचारकांमध्ये कंचुकीय व वर्षवरांचे वर्णन आहे. नृप, सेनापती, पुरोहित, मंत्री, सचिव, प्राड्गविवाक् तसेच कुमारांची विशेषता वर्णन केली आहे.

३५) पस्तिसाव्या अध्यायात नाट्यमंडळीच्या सदस्यांमध्ये पात्रांचे विभाजन तसेच त्याच्यासाठी आवश्यक विशेषता सांगून त्यांचे कर्तव्य निश्चित केले आहे.

माती, काष्ठ तसेच चर्माद्वारा निर्मित कृत्रिम नाट्यसाधनांचे वर्णन केले आहे. उदा. रावणासमान अनेक मस्तके, अनेक हात इ. ची रचना करणे, सिंह-हत्ती इ. पशुंचे प्रदर्शन करणे, पुरूषांद्वारा स्त्रीपात्रांचा अभिनय व स्त्रीद्वारा पुरूषांचा अभिनय करण्यासाठी वेषविन्यास करणे.



सूत्रधार, पारिपार्श्विक, विट, शकार, विदूषक, चेट, गणिका, नट व विभिन्न शिल्पी (माल्यकृत, वेषकर, रजक, कारूक इ.) त्यांची योग्यता वर्णन केली आहे.

३६) छत्तिसाव्या अध्यायात आत्रेय इ. ऋषींद्वारा भरताला पूर्वरंगात देवोपासना इ. विषयी विचारलेल्या प्रश्नांची, भूलोकावर नाट्य येण्यासंबंधी भरताने दिलेली उत्तरे आहेत. कोहल, वात्स्य, शाण्डिल्य, धूर्तिल द्वारा इहलोकात नाटकाचा प्रसार व प्रचार केल्याचे वर्णन आहे.

**नाट्यशास्त्राचे विभाग**

नाट्यशास्त्रामध्ये तीन विभाग आहेत.

१) सूत्रभाष्य - हा गद्यात्मक अंश ग्रंथाचे प्राचीनतम रूप आहे. मूळ ग्रंथात सूत्र व भाष्यच होते. ज्यामध्ये ग्रंथाचा विकास झाल्यावर अन्य अंश संमिलित केल्या गेले.

२) कारिका - मूळ ग्रंथाच्या अभिप्रायाचा विस्तार जाणण्यासाठी ह्या कारिकांची रचना केल्या गेली.

३) अनुवंश्य श्लोक - गुरूशिष्य परंपरेने येणारे प्राचीन श्लोक जे आर्या किंवा अनुष्टुप छंदात निबद्ध आहेत.

अभिनवगुप्ताच्या टीकेनुसार हे पद्य भरतमुनींपेक्षाही प्राचीनतर आचार्यांद्वारा रचल्या गेले आहे. आपल्या सूत्रांची पुष्टी करतांना भरताने त्यांना ह्या ग्रंथात संग्रहित केले आहे.

**ता एता ह्यार्या एक प्रघट्टकतया पूर्वाचार्यैर्लक्षणत्वेन पाठिताः।**
**मुनिना तु सुखसंग्रहाय यथास्थानं निवेशिताः।।**

(अभिनव भारती, अ.६)

भरत रससंप्रदायाचे आचार्य आहेत. त्यांच्या मते नाटकात रसाचीच प्रधानता असते. अलंकारशास्त्राचे विवेचन आनुषंगिक रूपाने ६, ७ व १६ व्या अध्यायात केल्या गेले आहे.

**नाट्यशास्त्राचे टीकाकार**

अभिनवगुप्ताच्या टीकेव्यतिरिक्त नाट्यशास्त्रावर कोणतीही टीका आज उपलब्ध नाही. परंतु अभिनवगुप्त तसेच शाङ्र्गदेव आदि विद्वानांच्या रचनांमध्ये

अनेक टीकाकारांची नावे उपलब्ध आहेत. जसे, १) मातृगुप्ताचार्य २) उद्‌भट ३) लोल्लट ४) शंकुक ५) भट्टनायक ६) हर्ष ७) कीर्तिधर ८) अभिनवगुप्त ९) नान्यदेव.

अभिनवगुप्ताने अनेक आचार्यांचे विचार आपल्या टीकेत उद्‌धृत केले आहेत. यामध्ये सर्वाधिक उद्‌धृत आचार्य आहेत राहूल किंवा राहल. ह्या सर्व टीकाकारांनी संपूर्ण नाट्यशास्त्रावर टीका लिहिल्या की एका भागावर हे ज्ञात नाही. परंतु अनेक आचार्यांच्या टीका केवळ संगीत ह्या भागावर लिहिल्या आहेत. तर काही आचार्यांचे विचार केवळ रससूत्राच्या व्याख्येच्या रूपात उपलब्ध आहेत. भट्टनायकाचा उल्लेख सुद्धा अनेक जागी आला आहे. कदाचित त्याची एक रचना 'हृदय दर्पण' सुद्धा असावी. अभिनवगुप्ताची रचना 'अभिनवभारती' भरताच्या नाट्यशास्त्रावरील सांगोपांग टीका आहे आणि ग्रंथाचा आशय जाणण्यास एक अत्यंत विद्वत्तापूर्ण रचना आहे. टीका असूनसुद्धा तिचे मूल्य स्वतंत्र ग्रंथापेक्षा निश्चितच अधिक आहे. शैली आणि विचारांच्या गंभीरतेमुळे ह्या टीकेला संस्कृत साहित्यात अद्वितीय स्थान प्राप्त झाले आहे.

**नाट्यशास्त्राचे महत्त्व**

भरताचे नाट्यशास्त्र संस्कृत साहित्यामध्ये एक अमूल्य रत्न मानले जाते. केवळ विषयाच्या विशालतेच्या दृष्टीनेच नव्हे तर विचारांच्या गहनतेमुळे आणि सर्वांगीणतेमुळे हा ग्रंथ अमूल्य आहे.

नाट्यविषयक सामग्रीच्या दृष्टीने या ग्रंथाला विश्वकोषाची संज्ञा देता येते. काव्यशास्त्राचे अनेक विषय या ग्रंथात समाविष्ट केले आहेत. रूपकांचे विविध प्रकार, अभिनयाचे भिन्न भिन्न प्रकार, मंचविधान, नाट्यप्रस्तुतीच्या संबंधातील सूक्ष्माहून सूक्ष्मतर विषयांचे सुद्धा विवेचन आहे. नाट्यशास्त्र वाचून असे वाटते की संगीत आणि नाटकाचे कोणतेच क्षेत्र ग्रंथकर्त्याने दृष्टीआड केलेले नाही. काव्यबोध किंवा रसानुभूती सारख्या आन्तरिक प्रश्नांपासून वस्त्रसज्जा, वाद्ययंत्रांचे प्रकार यासारख्या अनेक विषयांपर्यंत ह्यात विवेचन केले आहे. भरताच्या उत्तरवर्ती बहुधा सर्वच आलंकारिक आणि नाट्यलक्षणांसाठी हा ग्रंथ प्रेरणास्त्रोत आहे. लक्ष्यग्रंथांमध्ये सुद्धा ह्याचा प्रभाव स्पष्ट आहे. ग्रंथकार केवळ आपल्या विचारांची मांडणी करत नाही तर ह्या





क्षेत्रातील सर्व महत्त्वपूर्ण चिंतनांना सुद्धा उद्‌धृत करतात. संपूर्ण विश्वसाहित्यामध्ये नाट्यसामग्रीविषयक असा ग्रंथ उपलब्ध नाही. संगीत, नाटक, नृत्य आणि काव्याच्या क्षेत्रातील सर्वच सिद्धांत ह्याच स्त्रोतापासून प्रादूर्भूत झाले आहेत. उपलब्ध साहित्यामध्ये प्राचीनतम असल्यामुळे सुद्धा ह्या रचनेला महत्त्व आहे. पश्चाद्‌वर्ती सर्वच लक्षण ग्रंथकार भरतमुनींचा आदरपूर्वक उल्लेख करतात. कदाचित संस्कृत साहित्याचा इतका उच्च विकास ह्या ग्रंथाच्या अभावी अपूर्ण राहिला असता.

भरताचे काव्यदर्शन भारतीय चिंतनाची श्रेष्ठता दर्शविणारे आहे. नाट्यक्षेत्रातील त्यांच्या ह्या बहुमोल योगदानामुळेच त्यांच्याविषयी कृतज्ञता दाखविण्यासाठी नाटकातील समारोपीय चरणाला 'भरतवाक्य' असे म्हणतात.

✻ ✻

.२.

# भामह

भामह काव्यशास्त्रातील अलंकार संप्रदायाचे प्राचीनतम आचार्य मानले जातात. त्यांच्या वैयक्तिक जीवनाविषयी काहीही माहिती उपलब्ध नाही. ते काश्मिरचे निवासी होते. काव्यालंकाराच्या अंतिम श्लोकात त्यांनी स्वतःला रक्रिलगोमिन्चा पुत्र म्हटले आहे.

**अवलोक्य मतानि सत्कवीनामवगम्य स्वधिया च काव्यलक्ष्या**
**सुजनावगमाय भामहेन ग्रथितं रक्रिलगोमिसुनुनेदम्।**

रक्रिलगोमिन् या नावावरून त्यांना बौद्ध मतानुयायी मानले जाते. कारण राहुल, पोतल, गोमिन ही बुद्धाच्या शिष्यांची नावे आहेत. परंतु काव्यालंकारमध्ये मात्र बौद्ध कथा किंवा बुद्धाच्या जीवनाचा किंचितही उल्लेख नाही. परंतु डॉ.पां.वा.काणे इ. विद्वान हे मत मान्य करीत नाहीत. ह्याचे मुख्य कारण असे की त्यांच्या ग्रंथात भगवान बुद्धाविषयी किंवा बौद्ध धर्माविषयी कोणतेच स्पष्ट प्रमाण उपलब्ध नाही. बौद्ध दर्शनाशी त्यांचा परिचय निश्चित होता, परंतु त्यांनी 'अपोहवादाचे' खंडन केले आहे. त्यामुळे ते बौद्ध नव्हते हे सिद्ध होते. त्यामुळे त्यांना बौद्ध मानता येत नाही.

त्यांचे पहिलेच पद्य भगवान शंकरांची स्तुती करणारे आहे. परंतु काही विद्वान ह्या श्लोकाचा अर्थ बुद्धपर करतात. काही विद्वान असे मानतात की भामह त्या काळातील असावेत जेव्हा बुद्धाला एक अवतार म्हणून हिंदू धर्माने मान्यता दिली होती. ह्याशिवाय भामहाच्या ग्रंथात ब्राह्मणग्रंथ आणि अन्य वैदिक ग्रंथांतील उल्लेख मिळतात. रामायण आणि महाभारताशी ते विशेष रुपाने परिचित होते. त्यांनी स्वतः लिहिले आहे की त्यांनी आपल्या ग्रंथांची रचना करण्यापूर्वी अलंकार ग्रंथांचे अध्ययन केले होते. विशेष रुपाने ते पूर्ववर्ती आचार्य मेधावी किंवा मेधावीन् यांचा उल्लेख करतात.

**भामहाचा काळ**

एके काळी दण्डी व भामहाच्या कालनिर्णयाबाबत विद्वानांमध्ये अत्यंत मतभेद होता. परंतु आता सबळ पुराव्यांनी हे सिद्ध झाले आहे की



भामह दण्डीचा पूर्ववर्ती होय. त्यांनी आपल्या ग्रंथात प्रत्यक्षाचे लक्षण प्रसिद्ध बौद्धाचार्य दिङ् नागानुसार दिले आहे, धर्मकीर्तीनुसार नाही. ह्यावरून त्यांचा काळ ह्या दोन आचार्यांच्या मध्ये ६व्या शतकाचा मध्य मानणे योग्य होते.

भामहाचा काळ निश्चित करण्याबाबत सर्वाधिक विश्वसनीय माहिती ध्वन्यालोकात मिळते. प्रो. पाठक आणि प्रो. त्रिवेदी, भामहाने 'न्यास' शब्दाचा उल्लेख 'शिष्टप्रयोग मात्रेण न्यासकार मात्रेण वा' केल्यामुळे भामहाला न्यासकार जिनेन्द्र बुद्धिंनंतरचा मानतात. परंतु डॉ. काणे इ. अनेक विद्वान ह्या मताचे समर्थन करीत नाहीत. त्यांचा युक्तिवाद असा आहे की संस्कृत साहित्यामध्ये अनेक न्यासकार झाले आहेत. त्यामुळे ह्या शब्दाद्वारे जिनेन्द्र बुद्धिचा संकेत होतो हे मानणे योग्य नाही आणि असे मानले तर जिनेन्द्र बुद्धिचा काळ निश्चितपणे इ.स. ७०० च्या नंतरचा नाही. ह्यानुसार भामहाचा काळ सातव्या शतकाचे अंतिम चरण किंवा आठव्या शतकाचा पूर्वार्ध मानावा लागेल. परंतु ध्वन्यालोकातील उल्लेख ह्यापेक्षा अधिक निर्णायक किंवा विवादरहित आहे.

आनंदवर्धनांनी दोन वेळा भामहाचा नावासह उल्लेख केला आहे. अनेक वेळा भामहाच्या सिद्धातांचा उल्लेख सुद्धा ध्वन्यालोकात मिळतो. ध्वन्यालोकानंतरच्या बहुतेक सर्वच अलंकारशास्त्रींनी भामहाचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे. त्यामुळे हे निश्चितपणे सिद्ध होते की भामहाचा काळ ७व्या शतकाचा उत्तरार्ध किंवा ८व्या शतकाचा पूर्वार्ध आहे.

दीर्घकाळपर्यंत भामहाचे केवळ नाव होते. त्यांच्या साहित्यकृतीची कोणतीच प्रतिलिपी उपलब्ध नव्हती. इ.१९०६ मध्ये पहिल्यांदा त्यांची एक हस्तलिखित प्रतिलिपी मिळाली. त्यानंतर दुसऱ्या ठिकाणांहूनही अशाच काही प्रतिलिपी मिळाल्या. दण्डी आणि भामहामध्ये कोण प्रथम झाला ह्या विषयी आजही वाद आहे. ह्याचे मूळ कारण हे आहे की ह्या दोघांनीही एकमेकांच्या नावाचा उल्लेख केलेला नाही. विभिन्न हस्तलिखित प्रतींचे सिंहावलोकन करून सुद्धा ह्याबाबत काही माहिती मिळत नाही. आचार्य पां.वा. काणे दण्डीला भामहाचा पूर्ववर्ती मानतात. परंतु विद्वानांचा दुसरा गट ज्यामध्ये डॉ. एस. के. डे आणि प्रो. बटुकनाथ इ. दण्डीला परवर्ती व भामहाला पूर्ववर्ती मानतात.

भरतानंतरही अनेक वर्षांपर्यंतच्या काळातील आलंकारिकांची नावे

व कार्याविषयी कोणतीच माहिती उपलब्ध नाही.

भामहाचा 'काव्यालंकार' हा ग्रंथ भरताच्या नंतरच्या काळातील सर्वप्रथम मान्य ग्रंथ आहे. ह्यात अलंकारशास्त्राने नाट्यशास्त्राच्या पारतंत्र्यातून स्वतःला मुक्त करून एका स्वतंत्र शास्त्राची निर्मिती केलेली दिसून येते.

भामहाच्या पूर्ववर्ती आचार्यांमध्ये मेधाविरुद्राच्या नावाचा निर्देश मिळतो. परंतु त्याची रचना अजूनपर्यंत उपलब्ध झालेली नाही. भामहाचा ग्रंथसुद्धा नुकताच प्राप्त झाला आहे.

**भामहाचा काव्यालङ्कार**

भामहाच्या काव्यालंकार ग्रंथामध्ये ६ परिच्छेद असून जवळपास ४०० कारिका आहेत.

प्रथम परिच्छेदात काव्याचे प्रयोजन, कवीची योग्यता, काव्यलक्षण, विभिन्न दृष्टींनी काव्याचे विभाग, सर्गबद्धता, अभिनय तसेच अर्थाचे विवरण, कथा आणि आख्यायिकेतील फरक, वैदर्भी व गौडी रीतीचे विवेचन आहे.

द्वितीय परिच्छेदात माधुर्य, ओज व प्रसाद गुणांची परिभाषा, अलंकारांचा क्रम प्रारंभ होतो.

तृतीय परिच्छेदात अलंकारांचा क्रम समाप्त होतो. ह्या परिच्छेदाची मुख्य विशेषता ही आहे की भामहाच्या मतानुसार कोणताच अलंकार वक्रोक्तिशून्य असू शकत नाही. स्वभावोक्तीला त्यांनी अलंकार म्हणून स्वीकारले नाही. ह्या विषयी विभिन्न मतांना प्रस्तुत करून ते या निश्चयावर येतात की अशा वर्णनाला काव्य ही संज्ञा देता येणार नाही. त्यांना ते केवळ वस्तुचीच संज्ञा देतात.

चौथ्या परिच्छेदात ११ प्रकारच्या काव्यदोषांचे वर्णन केले आहे. ह्यामध्ये प्रथम १० दोषांचे लक्षण व उदाहरण दिले आहे.

पाचव्या परिच्छेदात ११व्या काव्यदोषाचे वर्णन आहे जो प्रतिज्ञा, हेतू आणि दृष्टान्ताच्या अनुचित प्रयोगामुळे होतो. ह्या जागी भामह न्याय वैशेषिक दर्शनाच्या अनेक सिद्धांताच्याद्वारे ह्या प्रश्नाचे समाधान शोधण्याचे प्रयत्न करतात.

सहाव्या परिच्छेदात कवींच्या सौशब्द्य प्राप्तीसाठी काही व्यावहारिक निर्देश दिले आहेत.





अशाप्रकारे सहा परिच्छेदात तसेच ४०० श्लोकांमध्ये अलंकारशास्त्राच्या सर्व महत्त्वपूर्ण तथ्यांचा समावेश केला आहे.

भामहाचे सिद्धांत सर्व आलंकारिकांना मान्य आहेत. त्यांचे काही विशिष्ट सिद्धांत आहेत.

१) शब्द आणि अर्थांमुळेच काव्य होते, 'शब्दार्थौ काव्यम्।'

२) भरत प्रतिपादित १० गुणांचा ओज, माधुर्य आणि प्रसाद ह्या तीन गुणांत समावेश.

३) वक्रोक्तिच सर्व अलंकारांचे मूळ व तिचाच परमोच्च विकास कुन्तकाच्या वक्रोक्ति जीवितमध्ये दिसून येतो.

४) दहा प्रकारच्या दोषांचे सुंदर विवेचन.

भरतमुनींनंतर भामहाला अलंकार संप्रदायाचा प्राचीनतम आचार्य मानले जाते. जरी संशोधकांनी भट्टीला भामहाचा पूर्ववर्ती मानले आहे तरी सुद्धा भट्टीचा स्वतंत्र अलंकारग्रंथ नसल्यामुळे भामहालाच प्राचीनतम मानावे लागते. भामहाच्या पूर्वी संस्कृत अलंकारशास्त्र केवळ नाट्यशास्त्राची एक शाखा मानले जात होते. नाट्यशास्त्रापेक्षा स्वतंत्ररूपाने त्याची स्थापना करण्याचे श्रेय भामहाकडेच जाते.

**भामहाचे स्थान आणि योगदान**

भामहाच्या ग्रंथामुळे काव्यशास्त्राच्या इतिहासाच्या अनुमानमूलक तसेच अनिश्चयात्मक व अन्धकारमय युगाचा शेवट होतो. काव्यसिद्धांतांना शास्त्रीय व व्यवस्थित रूप देण्याच्या धारणेचा सूत्रपात भामहने केला आहे. जरी भामह किंवा त्याच्या मतानुयायी असलेल्या उद्भटाच्या ग्रंथात शास्त्राचे तत्त्वस्पर्शी विवेचन नाही तरीसुद्धा काही स्थूल निष्कर्ष काढता येतात. ह्यामुळेच पुढे जाऊन अनेक नवीन सिद्धांत प्रचलित करण्याची प्रेरणा अनेकांना मिळाली.

काव्यालंकार हा व्यावहारिक आणि आदर्श ग्रंथ असल्यामुळे केवळ सिद्धांत पक्षाचेच विवेचन यात नाही, कारण ह्या युगात अशाप्रकारच्या विवेचनाची आशा करणे सुद्धा शक्य नव्हते. म्हणूनच भामहाने कोठेही काव्याची व्यवस्थित परिभाषा देण्याचा किंवा वक्रोक्ती तसेच अलंकारांच्या सिद्धांतांना

स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला नाही. काव्य परिभाषेचे मूळ घटक शब्द आणि अर्थ दोन्हीला मान्यता देण्याचा भामहाचा विचार चिरंतन काळापर्यंत स्वीकार्य राहीला. 'शब्दार्थौ सहितौ काव्यम्।' ही काव्याची परिभाषा कोणत्या ना कोणत्या रूपात परिवर्धित व संशोधित होत राहिली. काव्यहेतू व काव्यउत्पत्तीला महत्त्व देणाऱ्या परंपरेचा सूत्रपात सुद्धा भामह करतात. रीतिमार्गाची ते उपेक्षा करतात. म्हणूनच ते सूक्ष्म काव्यतत्त्व जसे रस, ध्वनि इ. पर्यंत पोहोचत नाहीत. तरी सुद्धा काव्यशास्त्राला सुव्यवस्थित रूप देण्यामध्ये भामहाचे स्थान महत्त्वपूर्ण आहे.

* *



.३.

# दण्डी

भावयित्री आणि कारयित्री प्रतिभासंपन्न आचार्य दण्डी अलंकारवादी आचार्य म्हणून प्रसिद्ध आहेत तसेच गद्य लेखकांमध्ये अग्रस्थानी आहेत.

**काळ**

दण्डीच्या काळाचा निर्णय अनेक आधारांद्वारे योग्यप्रकारे करता येतो. सिंहली भाषेतील अलंकार ग्रंथ 'सिय वस लकर'(स्वभाषालङ्कार) काव्यादर्शाच्या आधारे लिहिला गेला आहे. ह्याचे रचयिता राजासेन प्रथम महावंशाच्या अनुसार ८४६–८६६ इ. पर्यंत लंकेत राज्य करीत होते. ह्यापूर्वी कन्नड भाषेतील अलंकार ग्रंथ 'कविराज मार्ग' मध्ये काव्यादर्शाचा प्रभाव दिसून येतो. ग्रंथाचे लेखक राजा अमोघवर्षाचा काळ ८१५ इ. च्या आसपास मानला जातो. म्हणून काव्यादर्शाची रचना ९व्या शतकाच्या पूर्वी झाली.

**जीवनवृत्त**

महाकवी दण्डीचे जीवनचरित्र पूर्णपणे ज्ञात नाही. परंतु अवन्तिसुन्दरी कथेच्या सुरुवातीला दण्डीने आपल्या जीवनचरित्राची थोडी माहिती दिली आहे. २२व्या श्लोकात ग्रंथकाराने स्वतःला दामोदराचा वंशज सांगितले आहे. त्यानंतरचे चार श्लोक स्पष्ट नाहीत. शेवटच्या श्लोकात सरस्वती व कविसमाजाची स्तुती केली आहे. त्यानंतर गद्यात कथा प्रारंभ होते.

राजनगर कांचीत सिंहविष्णु नावाचा राजा रहात होता. कोणत्यातरी गंधर्वाने त्याच्या समोर एका आर्येचे पठण केले. दण्डी परिवाराने आनंदपूर (गुजरात) पासून प्रस्थान केले व अचलपुरात (वर्तमान एलिचपूर) निवास केला. त्याचे पूर्वज कौशिक गोत्रीय दामोदरस्वामीने भारवीच्या सांगण्यावरून राजा विष्णुवर्धनसह मित्रता जोडली. दामोदराची गाङ्गेय वंशज दुर्विनितसह भेट झाली, जो त्याच्या यात्रांसाठी प्रसिद्ध होता. गंधर्वाने पल्लववंशीय सिंहविष्णुला जी आर्या ऐकवली होती ती दामोदराने रचली होती. सिंहविष्णुने दामोदराला आपल्या सभेत आमंत्रित केले, त्याचा विवाह करून दिला व भूमी प्रदान केली. दामोदराचे तीन पुत्र होते. मध्यम पुत्राचे नाव मनोरथ होते.

त्याचे चार पुत्र होते. वरिष्ठ पुत्र वीरदत्त होता. त्याचा विवाह गौरीसह झाला होता. त्याचा दण्डी हा एकुलता एक पुत्र होता. बालपणीच त्याच्या मातेचा मृत्यू झाला आणि उपनयन झाल्यानंतर पित्याचा मृत्यू झाला. काही काळाने परकीय आक्रमण झाले व कांची उद्ध्वस्त झाली. तेव्हा दण्डीने कांची सोडली. काही वर्षांनी दण्डी पल्लवांच्या राजसभेत परतला. स्वप्नात त्याला सरस्वतीचे दर्शन झाले आणि आशीर्वाद प्राप्त झाला. सरस्वतीने त्याला विद्याधर नरेश राजवाहनाची कथा लिहिण्याचा आदेश दिला. दुसऱ्या दिवशी तिने अवन्तिसुन्दरी कथा ऐकविली. ती संपूर्ण कथेचा प्रथम भाग आहे. उपलब्ध दशकुमार चरित त्या कथेचा मध्यभाग आहे.

**जीवनकाळ**

संस्कृत काव्यशास्त्राच्या प्रारंभिक आचार्यांमध्ये दण्डी यांचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. परंतु ही दुर्दैवाची गोष्ट आहे की दण्डीचा कालनिर्णय ही एक समस्या झाली आहे. दण्डीच्या ग्रंथामध्ये सुद्धा असे संकेत मिळत नाहीत की ज्यामुळे त्याचा काळ ठरविता येईल. त्यांनी 'भूतभाषेत' (पैशाची) लिहिलेला 'बृहत्कथा' आणि महाराष्ट्री प्राकृतात लिहिलो 'सेतुबन्ध' ह्यांचा जो उल्लेख केला आहे त्यामुळे सुद्धा त्याच्या काळनिश्चितीवर काही प्रकाश टाकता येत नाही. दण्डीच्या नावाचा प्राचीनतम उल्लेख 'प्रतिहारेन्दुराज'मध्ये मिळतो. परंतु त्याचा काळ निश्चित करण्यामध्ये दक्षिण भारतीय भाषांमध्ये प्राप्त अलंकार ग्रंथांचा विशेष उपयोग होतो. हे ग्रंथ ९व्या शतकात लिहिल्या गेले आणि त्यात दण्डीचा प्रतिष्ठित व प्रामाणिक आचार्य म्हणून उल्लेख मिळतो. 'सिय बिस लकट' नावाच्या सिंहली ग्रंथलेखकाने दण्डीला आदर्श आचार्य मानले आहे. हा सिंहली ग्रंथ ९व्या शतकातील आहे. ह्याचे रचयिता राजासेन प्रथम महावंशाच्या अनुसार ८४६-८६६ पर्यंत लंकेत राज्य करीत होते. 'कविराज मार्ग' ह्या कन्नड ग्रंथामध्ये सुद्धा दण्डीच्या सहा श्लोकांचा अक्षरशः अनुवाद प्राप्त होतो. ह्या ग्रंथाचा लेखक राजा अमोघवर्षाचा काळ ८१५ इ. च्या आसपास मानला जातो. ह्याशिवाय ग्रंथाच्या काही भागांवर दण्डीचा प्रभाव दिसून येतो. आणखी काही गोष्टींवरून दण्डी वामनाचार्यांच्या आधी होऊन गेला हे सिद्ध होते. ह्यावरून त्यांचा काळ ८व्या शतकाचा उत्तरार्ध



किंवा ९व्या शतकाचा प्रारंभ हा निश्चित होतो. ह्याची पुष्टि त्याच्या दशकुमारचरितामध्ये वर्णित सामाजिक चित्रणावरून होते. काही विद्वान त्यांना दाक्षिणात्य, त्यातही पल्लव नरेश सिंहविष्णु (७वे शतक)चे सभापंडित मानतात.

दण्डी यांनी आपल्या ग्रंथात महाराष्ट्री प्राकृताची स्तुती केली आहे. वैदर्भी रीतीला श्रेष्ठ मानले आहे आणि आंध्र, चोल, कलिंग, विदर्भ या दक्षिणेतील देशांचे विपुल वर्णन केले आहे. त्याच्या काव्यात कावेरी नदीचा व दक्षिणी चालीरीतींचाही अनेकवार उल्लेख येतो. यावरून विद्वानांनी असा निष्कर्ष काढला आहे की दण्डी हे दाक्षिणात्य असावेत.

**रचना**

दण्डीच्या नावावर अनेक ग्रंथ आहेत. परंतु त्यातील 'काव्यादर्श' व 'दशकुमारचरित' हे दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत.

राजशेखराच्या 'त्रयो दण्डिप्रबन्धाश्च त्रिषु लोकेषु विश्रुताः।' या उक्तीनुसार दण्डीच्या तीन रचना आहेत.

काव्यादर्श ही निश्चितपणे दण्डीची रचना आहे. दशकुमार चरित हा त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ आहे. पण तिसरी रचना कोणती? ह्याचा निर्णय अजूनपर्यंत झाला नाही. काहीजण 'छन्दोविचिति' हा त्यांचा तिसरा ग्रंथ मानतात. परंतु 'सा विद्या नौविवूक्षूणाम्' ह्यात ह्या रचनेला विद्या मानले आहे, ग्रंथ नाही. म्हणून हा ग्रंथ नसून छंदशास्त्राचे द्योतक आहे. त्यामुळे 'अवन्तिसुन्दरी' कथेला त्यांची तिसरी रचना मानावे लागते.

दण्डी काव्यादर्शात कालिदासाचा प्रसिद्ध श्लोकांश 'मलिनमपि हिमांशोर्लक्ष्मलक्ष्मीं तनोति।' उद्धृत करतो.

**लक्ष्म लक्ष्मीं तनोतीति प्रतीतिसुभगं वचः।**

दण्डीचा खालील श्लोक बाणरचित शुकनासोपदेशावर आधारित आहे.

**अरत्नालोकसंहार्यमवार्यं सूर्यरश्मिभिः।**
**दृष्टिरोधकरं यूनां यौवनप्रभवं तमः।।**

दण्डीने आलंकारिक भामहाच्या काव्यालंकारात उल्लिखित सिद्धांतांचे खंडन आपल्या अलंकार ग्रंथात केले आहे. भामह दिङ्नागाच्या पश्चादवर्ती

तसेच धर्मकीर्ती (ई. ६३०) च्या पूर्ववर्ती झाले. काव्यादर्शामध्ये राजवर्मा नामक पल्लव नरेशाचा उल्लेख आहे. ह्यावरून जर 'राजवर्मा' बिरुद धारण करणाऱ्या नरसिंह वर्मा द्वितीय (६९०-७१५) चा संकेत मानला तर दण्डीचा काळ ७व्या शतकाचा उत्तरार्ध मानावा लागतो. ह्याच काळात दण्डीचा आविर्भाव मानणे युक्त आहे.

**काव्यादर्श**

'काव्यादर्श' हा काव्यशास्त्रविषयक ग्रंथ आहे. हा ग्रंथ स्वतंत्र काव्यचर्चेच्या सुरुवातीच्या काळातला आहे. त्यामुळे तो संस्कृत साहित्यशास्त्राच्या इतिहासात महत्त्वाचे स्थान पावलेला व विद्वानांच्या आदराला प्राप्त झालेला ग्रंथ आहे.

दण्डीने काव्यपुरुषाच्या शरीराची कल्पना करून त्याचे एक रुपक रचले आहे. ह्याच दृष्टीने त्यांनी काव्याकडे पाहिले. काव्याचे हे शरीर 'इष्टार्थ व्यवच्छिन्ना पदावली' होय. जे अलंकारशास्त्री शब्द व अर्थाला काव्यशरीराचे मूळ घटक मानून विशिष्ट अर्थप्राप्तीसाठी विशेष प्रयत्न करण्यावर भर देतात, त्यांच्या श्रेणीत दण्डीचा समावेश होतो. त्यातच दण्डी पुढे असेही म्हणतात की ही 'इष्टार्थ व्यवच्छिन्ना पदावली' अलंकारयुक्त असली पाहिजे. अलंकार शब्द दण्डी सीमित अर्थाने योजत नाहीत. त्यांच्या मते काव्यशरीराला सजविणाऱ्या किंवा शोभा वाढविणाऱ्या प्रत्येक वस्तुला अलंकार म्हणता येते. ह्या दृष्टीने दण्डीच्या मते काव्यगुण सुद्धा अलंकाराच्या सामान्य अर्थात समाविष्ट होतात. काव्यासंबंधी हा विचार दण्डीच्या ग्रंथातील प्रथम परिच्छेदात आला आहे. ह्याशिवाय जे इतर विषय ह्या परिच्छेदात येतात ते असे आहेत.

प्रथम परिच्छेदात काव्याची व्याख्या करून काव्याचे तीन प्रकार केले आहेत. गद्य, पद्य आणि चम्पू. पद्यात्मक काव्य अनेक प्रकारचे असू शकते. जसे महाकाव्य, मुक्तक काव्य इ. महाकाव्य सर्गबद्ध असते. त्यात एक रस प्रधान असावा. सर्गान्ती छन्दपरिवर्तन असावे. प्रकृतिवर्णन तसेच सामान्य आकर्षक वस्तुंचे वर्णन असावे. महाकाव्याचे कथानक इतिहास किंवा लोकप्रसिद्ध नायकाशी संबंधित असावे. आख्यायिका व कथा हे गद्यकाव्याचे दोन भेद असून त्याचे प्रभेद नाहीत असे सांगितले आहे.



काव्याचे दुसरे रुप म्हणजे मुक्तक काव्य होय. हे एकांकीपद्य असू शकते. १ ते ५ पर्यंतच्या पद्यसंग्रहाला 'कोश' म्हणतात. एकाच कवीच्या मुक्तक पद्यांना दण्डी 'संघात' ही संज्ञा देतात.

गद्यकाव्याचे दण्डीने तीन भेद केले आहेत, कथा, आख्यायिका आणि चम्पू. काव्यरचनेसाठी दण्डीच्या मते तीन भाषांचा प्रयोग केला जातो. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश. दण्डीच्या मते महाकाव्यासाठी केवळ संस्कृत भाषेचा प्रयोग केला जावा. स्कन्द छन्दामध्ये रचित काव्यात प्राकृतचा प्रयोग असावा. आसार नामक काव्यामध्ये अपभ्रंशाचा प्रयोग होतो. तीनही भाषांचा मिश्रित प्रयोग नाटकामध्ये होतो.

दण्डी काव्याचे आणखी दोन भेद स्वीकारतात. दृश्यकाव्य आणि श्रव्यकाव्य. दृश्यकाव्याच्या बाबतीत दण्डी भरतमुनींच्या नाट्यशास्त्राकडे संकेत करतात. श्रव्यकाव्याच्या अंतर्गत उपर्युक्त सर्व विवरण येते.

दुसऱ्या परिच्छेदात अलंकाराची व्याख्या करून ३५ अलंकारांची सोदाहरण उदाहरणे दिली आहे.

दण्डी १० काव्यगुणांना मान्यता देतात. अनेक काव्यरीतींचे अस्तित्व स्वीकारतात. तरी पण केवळ वैदर्भ आणि गौडी ह्या दोन रीतींचेच विवेचन केले आहे. दण्डीच्या मते वैदर्भ रीती म्हणजे दाक्षिणात्य शैली, जिच्यात १० गुणांचा समावेश होतो. गौड रीतीला ते प्राच्य रीती मानतात, जिच्यात १० गुणांचा अभाव असतो.

काव्यरचनेसाठी जी तत्त्वे आवश्यक आहेत ती म्हणजे संस्कार, प्रतिभा आणि अभ्यास. तृतीय परिच्छेदात यमकाचे विस्तृत वर्णन आहे. त्याचबरोबर चित्रालंकार, १६ प्रकारच्या प्रहेलिका आणि दहा प्रकारचे काव्यदोष सुद्धा वर्णन केले आहेत. भामहांनी स्वभावोक्तीला अलंकार म्हणून स्वीकारले नाही तर दण्डींनी स्वभावोक्तीला अलंकारात प्रथम स्थान दिले आहे.

काव्यादर्शाच्या काही हस्तलिखित प्रतिलिपींमध्ये १० प्रकारच्या काव्यदोषांना तृतीय परिच्छेदातून वगळून त्यांचा चौथा परिच्छेद केला आहे. दण्डीने अलंकारांचे कोणतेही वर्गीकरण केले नाही किंवा वर्गीकरणाचा काही आधार त्यांच्याजवळ दिसत नाही. काव्यादर्श अंशतः रीतीमार्गाचे व अंशतः

अलंकारमार्गाचे अनुसरण करते. दण्डीने गुण आणि अलंकारांचे इतके विस्तृत विवेचन केले आहे की त्यांना कोणत्याही एका अलंकार संप्रदायाशी बांधणे योग्य नाही.

ग्रंथारंभी दण्डीने वाणीचा महिमा गायिला आहे तो असा.

**इदमन्धतमःकृत्स्नं जायेत भुवनत्रयम्**

**यदि शब्दाह्वयं ज्योतिरासंसारं न दीप्यते।।** (काव्यादर्श १.४)

जर शब्द नामक ज्योती संपूर्ण जागताला व्यापून तेवत राहिली नसती तर हे त्रैलोक्य पूर्णपणे अंधःकारमय झाले असते.

अशा वाणीतून जन्माला येणाऱ्या काव्याचे अंतिम प्रयोजन उच्च आनंदाची प्राप्ती हेच होय, असे दण्डी म्हणतो. काव्यरचनेसाठी कवीला जशी साधना आवश्यक आहे, त्याचप्रमाणे काव्याचा आस्वाद घेण्यासाठी रसिकानेही वाणीची विदग्धता संपादन करायला हवी, हे त्याने आवर्जून सांगितले आहे. त्याच्या मते विदग्ध अशा सहृदयांचे सुसंस्कृत व अभिरुचिसंपन्न मत हेच काव्याच्या खरेखोटेपणाचा निवाडा करण्याचे न्यायालय आहे. काव्याकडे केवळ काव्यदृष्टीने पहावे. शास्त्रीय दृष्टीने पाहू नये यावर दण्डीचा कटाक्ष आहे. जितक्या व्यक्ती तितक्या रीती, हे त्याचे रीतिविषयक मत शैलीविषयीच्या नवसिद्धांताशी जुळणारेच आहे.

काव्यादर्शाची भाषा सरळ व बोधगम्य आहे. काही अपवादात्मक उदाहरणे वगळता उर्वरित उदाहरणे दण्डीने स्वतः रचली आहेत. ज्या अन्य ग्रंथातील उदाहरणे दिली आहेत ते आज उपलब्ध नाहीत. दण्डी व भामह दोघांनी गुण व अलंकारात काही फरक स्पष्ट केला नाही. दण्डीच्या मते गुण सुद्धा अलंकाराच्या सामान्य अर्थांमध्येच येतात. परवर्ती काव्यशास्त्रज्ञांनी दण्डीच्या ह्या सिद्धांताची टीका केली आहे. अनेक प्रारंभिक काव्यशास्त्रज्ञांप्रमाणे दण्डी व्यंग्य किंवा प्रतीयमान अर्थाशी परिचित असून सुद्धा त्याला काव्याचा आत्मा म्हणून स्थान देत नाहीत. तसेच रसाला सुद्धा त्यांनी काव्याचा आत्मा म्हणून स्थापित करण्याचा प्रयत्न केला नाही. कदाचित ह्या दोन्ही तत्त्वांना जाणण्यासाठी आवश्यक सूक्ष्मतेपर्यंत ते पोहचले नसावेत. भामहांप्रमाणेच दण्डीने सुद्धा अलंकाराला काव्यस्वरुपात प्रधानता दिली आहे. दण्डी रीती



शब्दाचा उल्लेख करत नाहीत. तर वामनांनी रीतीला काव्याचा आत्मा म्हणून स्वीकारले आहे. रीतीच्या जागी दण्डी 'मार्ग' शब्दाचा प्रयोग करतात. त्यांच्या मते 'काव्यशोभाकरान् धर्मान् अलंकारान् प्रचक्षते।'

गुण आणि अलंकार इतर कोणत्याही स्थानी उपलब्ध नसतात तर केवळ वैदर्भ मार्गातच असतात.

आचार्य पां. वा. काणे यांच्या मते दण्डीने भामह आणि वामन यांच्यातील मध्यम मार्ग स्वीकारला आहे. अलंकार मार्गाच्या अन्य सैद्धांतिकांपेक्षा केवळ गुणांवरच त्यांनी भर दिला आहे. परंतु त्यांचा मुख्य भर अर्थालंकारावरच आहे. दोष केवळ गुणांचा अभाव आहे की दोषांची स्वतंत्र सत्ता पण आहे, त्याबाबतीत त्यांचे मत स्पष्ट नाही. दण्डी त्या प्रारंभिक आचार्यातील एक आहेत, ज्यांनी प्रारंभिक सिद्धांतांना विकासाच्या एका अवस्थेपर्यंत पोहोचवले. परंतु काव्याचे मुख्य तत्त्व मूळ तत्त्वांपासून दूरच ठेवले. अधिकांश अलंकारांना त्यांनी वक्रोक्तीने अनुप्राणित मानले आहेत तर दोषांना स्वभावोक्तीने अनुप्राणित मानले आहे.

काव्यशास्त्राच्या प्रारंभिक अवस्थेच्या अध्ययनासाठी दण्डीचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. काव्यविषयक परिशुद्ध भूमिका व्यक्त करणारा दण्डीचा हा काव्यादर्श खरोखर काव्याचा आदर्श आहे, यात संशय नाही.

**ग्रंथस्वरूप**

काव्यादर्शाची शैली सरळ व सारगर्भित आहे. कवित्वाचा निकष लावला तर भामहाच्या तुलनेत दण्डीचे स्थान वरचे आहे. परंतु स्पष्ट आणि तर्कसंगत विवेचनाच्या बाबतीत भामह दण्डीच्या वरचढ ठरतो. दण्डीने दिलेली उदाहरणे मौलिक आहेत व ती त्यांनी कोठूनही उद्धृत केलेली नाहीत.

काव्यादर्शाची शैली निर्दोष, कोमल, अर्थगंभीर व परिपक्व आहे तर दशकुमार चरितची शैली दीर्घ समासांनी परिपूर्ण आहे. काव्यादर्श श्लोकबद्ध असल्यामुळे ह्यात दीर्घ समास अपेक्षित नाही. तरी सुद्धा अर्धश्लोकापर्यंत समास अभिप्रेत आहे.

**दशकुमारचरित**

संस्कृत गद्यात लिहिलेल्या या ग्रंथात दहा कुमारांच्या साहसी जीवनाची

अद्भुत कथा गुंफलेली आहे. या ग्रंथाचे दोन भाग आहेत. दोन्ही भाग मिळून २१ उच्छ्वास आहेत. पैकी पहिल्या भागातील प्रारंभीची ५ उच्छ्वासांची पूर्वपीठिका व दुसऱ्या भागातील अखेरची ८ उच्छ्वासांची उत्तरपीठिका मागून कोणीतरी या ग्रंथाला जोडलेली आहे, हे आता सर्वमान्य झाले आहे. म्हणजे मधले केवळ ८ उच्छ्वासच दण्डीने रचलेले आहेत असे ठरते.

दशकुमारचरित या नावावरूनच कळते की दण्डीला दहा कुमारांची कथा सांगायची होती. परंतु सध्याच्या आठ उच्छ्वासांत आठच कुमारांची कथा आहे. म्हणजे दण्डीच्या हातून हा ग्रंथ अपुरा राहिलेला दिसतो. दशकुमारचरिताची कथा संक्षेपाने सांगता येईल, ती अशी.

*मालव देशाचा राजा मानसार याने मगधावर स्वारी करून मगधाधिपती राजहंस याचा पराभव केला व स्वतः मगधाचा राजा झाला. राजहंस राजाचा सारथी मारला गेला व राजा रथातच मूर्च्छित पडला असता रथाचे घोडे उधळले व रथासह विंध्यारण्यात शिरले. राजहंसाची गर्भवती राणी वसुमती आधीच त्या अरण्यात गुप्तपणे जाऊन राहिली होती. तिथे त्या दोघांची भेट झाली. यथावकाश राणीने एका पुत्राला जन्म दिला. त्याचे नाव राजवाहन असे ठेवले गेले.*

*त्याचवेळेस राजहंसाच्या चौघा मंत्र्यांनाही पुत्र झाले. त्यांची नावे प्रमती, मित्रगुप्त, मंत्रगुप्त व विश्रुत अशी होती. हे सर्व कुमार अरण्यातच राजवाहनाबरोबर वाढू लागले. त्यांच्याच वयाचे आणखी पाच कुमारही योगायोगाने तिथे आले व त्यांचे मित्र बनले.*

*या दहा कुमारांचे सर्व शिक्षण राजाने फार काळजीपूर्नक पूर्ण केले आणि ते वयात आल्यावर त्याने त्यांना दिग्विजयार्थ पाठविले. ते विंध्यारण्याच्या मध्यभागी पोहोचले तेव्हा त्यांना मातंग नावाचा एक ब्राह्मण भेटला. त्याने इतर कुमारांच्या नकळत राजवाहनाला एका गुप्तद्वाराने पाताळात नेले.*

*इकडे ते नऊ कुमार राजवाहनाच्या शोधासाठी विभिन्न दिशांना गेले. सर्वांनी शेवटी कोठे जमायचे ते ठरवले होते.*

*काही काळानंतर मातंगाचा निरोप घेऊन राजवाहन भूलोकी परत*





*आला व आपल्या मित्रांच्या शोधार्थ हिंडू लागला. अखेरीस त्या सर्वांची संकेतस्थळी भेट झाली. त्यानंतर त्यांनी दिग्विजय करून सर्व शत्रूंना जिंकले. मालवाधिपती मानसार याचाही पराभव करून त्यांनी त्याला ठार मारले. त्यांच्या दिग्विजयामुळे आनंदित झालेल्या राजहंस राजाने त्या सर्वांना एकेक देश वाटून दिला. पुष्पपूर (मगध) व उज्जयिनी (माळवा) ही राज्ये राजवाहनाला दिली आणि स्वतः वानप्रस्थाश्रम स्वीकारला.*

एक धूर्ताख्यान म्हणून दशकुमारचरिताची ख्याती आहे. त्या दहा साहसी कुमारांना देशाटनात आलेले विचित्र अनुभव सांगण्याच्या निमित्ताने दण्डीने कपट, साहस, चोरी, जादू, चमत्कार, द्युत, मद्य, युद्ध, खून, प्रणय वगैरे गोष्टींची प्रत्ययकारी चित्रणे प्रस्तुत ग्रंथात केली आहेत.

दण्डीची दृष्टी वास्तववादी असून त्याने समाजाच्या सर्व थरांचे बारकाईने निरीक्षण केले होते असे त्याच्या विविध प्रसंगांच्या वर्णनांवरून स्पष्ट कळते. दण्डीने हा ग्रंथ वैदर्भी शैलीत लिहिलेला असून त्यातील पदलालित्य रसिकांना मुग्ध करणारे आहे. म्हणूनच 'दण्डिनः पदलालित्यम्' असा त्याच्या शैलीचा गौरव संस्कृत रसिकांनी केला आहे.

पाश्चात्त्य विद्वानांचा एक वर्ग काव्यादर्शकार दण्डी आणि दशकुमारचरिताचे रचयिता दण्डी एकच आहेत हे मानत नाहीत. तर दुसरे काही विद्वान असे म्हणतात की जेव्हा एखादी व्यक्ती सिद्धांतांची निर्मिती करते तेव्हा ती वेगळ्याच प्रतिभेने प्रेरित झाली असते आणि जेव्हा काव्यरचना करते तेव्हा तिचा प्रेरणास्रोत वेगळा असतो. असे बहुधा दिसून येते की काव्यसिद्धांताचे निर्माते काव्यनिर्मितीच्या वेळी त्या नियमांचे दास असत नाहीत कारण,

**अपारे काव्यसंसारे कविरेकः प्रजापतिः।**
**यथास्मै रोचते विश्वं तथा वै परिवर्तते।।**

दण्डीचे स्थान गद्याच्या इतिहासात त्याच्या विशिष्टतेमुळे आहे. कथानकांमध्ये कौतुक तसेच विस्मयकारक घटनांचे पुट दिल्यामुळे अद्भुत रसाचे आधिक्य दिसून येते. कथानक अत्यंत सजीव आहे. त्यातून तत्कालीन समाज पाठकांना मनोज्ञ दर्शन घडवितो. कथानकांची गुंफण करण्याची कला

अत्यंत सुंदर आहे. दण्डी अनेक अप्रसिद्ध विद्यांमध्ये पारंगत पंडित भासतात. राजनीतीचे प्रचुर वर्णन, कामशास्त्राच्या गूढ तत्त्वांचे प्रकटीकरण तसेच चौरशास्त्रातील अद्‌भुत, विचित्र गोष्टी लेखकाच्या पांडित्याच्या परिचायक आहेत.

दण्डी लोककवी आहेत. त्यामुळे त्यांच्या काव्यात लोकांची सुखदुःख, वेदना आणि आनंदाचे परिस्फुरण पर्याप्त प्रमाणात आहे. त्यांच्या सरळ सुबोध गद्यशैलीने त्यांच्या काव्याला अत्यंत रुचिर केले आहे. त्यांचे गद्य श्लेषाच्या भाराखाली दबलेले नाही किंवा समासाच्या प्रहारांनी प्रताडित झालेले नाही. त्यांचे गद्य दैनंदिन व्यवहारयोग्य सजीव व योग्य आहे. त्याची प्रासादिकता पण असामान्य आहे. ह्याच कारणांमुळे काही आलोचक वाल्मिकी आणि व्यासांनंतर दण्डीलाच तिसरा कवी मानतात.

**जाते जगति वाल्मीकौ कविरित्याभिधाऽभवत्।**
**कवीति ततो व्यासे कवयस्त्वयि दण्डिनि।**

महाकवि बाणभट्टाने गद्यकाव्य लेखनासाठी जी पद्धती वापरली तिचेच अनुकरण परवर्ती कवींनी अत्यंत अभिनिवेशाने केले. धनपाल (इ. १०वे शतक) 'तिलकमञ्जरी'त असेच अनुकरण करतो.

अपार काव्यसंसारात कवी हा प्रजापती असतो. त्यामुळे अशी शक्यता आहे की दण्डीने 'दशकुमारचरित' तारुण्यावस्थेत व 'काव्यादर्श' प्रौढावस्थेत लिहिले असावे.

भामहाप्रमाणेच दण्डीने सुद्धा स्वतःच्या व्यक्तिगत जीवनाविषयी काहीच लिहिले नाही. 'दशकुमार चरिता'च्या आधारावर अनेक विद्वान त्यांना दाक्षिणात्य मानतात. भामहाप्रमाणेच दण्डीने सुद्धा आपल्या पूर्ववर्ती अनेक अलंकारशास्त्रींचा व त्यांच्या ग्रंथांचा उल्लेख केला आहे. परंतु ह्या सर्व रचना बहुधा अनुपलब्ध आहेत.

'गद्यं कवीनां निकषं वदन्ति।' या उक्तीच्या कसोटीवर दण्डीचे साहित्य यशस्वी ठरले आहे. म्हणूनच 'कविर्दण्डी न संशयः।' असे म्हटले जाते.

* *



.४.

# उद्‌भट

### काळ

अलंकार संप्रदायाच्या प्रख्यात प्रतिष्ठापक आचार्यांमध्ये उद्‌भटांचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. त्यांनी भामहाच्या ग्रंथावर 'भामह विवरण' ही टीका लिहिली आहे. त्यामुळे ते भामहांनंतर झाले हे निश्चित. भामहांचा काळ साधारण ७वे शतक आहे. म्हणून उद्‌भटांचा काळ इ. ७५० नंतरचाच निश्चितपणे मानावा लागतो. आनंदवर्धन उद्‌भटांचा उल्लेख अनेकवेळा करतात. त्यामुळे त्यांचा काळ इ.स. ८५० नंतरचा असू शकत नाही. म्हणून उद्‌भटांचा काळ भामह व आनंदवर्धन यांच्या मधला निश्चित होतो.

काश्मिरी परंपरा, त्यांना काश्मिर नरेश जयापीड (इ.स. ७७९–८१३) च्या सभेचा सेनापती मानतात. कल्हण राजतरंगिणीमध्ये त्याचा उल्लेख असा करतात –

**विद्वानीनारलक्षेण प्रत्यहं कृतवेतनः।**
**भट्टोदभट्टस्तस्य भूमिभर्तुः सभापतिः।।**

प्रतीहारेन्दु, रुय्यक तसेच अन्य विद्वान उद्‌भटांना आनंदवर्धनापेक्षा प्राचीन मानतात. वामन आणि उद्‌भट ह्या दोघांना सुद्धा एकाच राजदरबारातील समकालीन मानतात. परंतु ह्या दोघांनी परस्परांचा उल्लेख केला नाही.

### रचना

उद्‌भटाच्या दोन रचना उपलब्ध आहेत. 'काव्यालंकार सारसंग्रह' आणि 'कुमारसंभव काव्य'. प्रतिहारेन्दुराजने ह्या व्यतिरिक्त आणखी एका ग्रंथाचा निर्देश केला आहे. भामहाच्या साहित्यकृतीवर असलेली टीका भामह विवरण. त्यांनी भरताच्या नाट्यशास्त्रावर सुद्धा टीका लिहिली होती. उद्‌भटाचे यासंबंधी विचार अन्य लेखकांनी उद्‌धृत केले आहेत.

### काव्यालंकार सारसंग्रह

अलंकारशास्त्रामध्ये उद्‌भटाची कीर्ती होण्याचा मुख्य आधार म्हणजे त्यांचा काव्यालंकार सारसंग्रह हा ग्रंथ होय. हा ग्रंथ ६ वर्गात (अध्याय)

विभागलेला आहे. ह्यात एकूण ७९ कारिका आहेत. ४९ अलंकारांचे लक्षण व जवळपास ९० पद्य उदाहरणे म्हणून दिली आहेत.

प्रथम वर्गात पुनरुक्तवदाभास, छेकानुप्रास, अनुप्रास, तीन प्रकारची परूषा, उपनागरिका व ग्राम्या या कोमल वृत्तींच्या आधारावर लाटानुप्रासु, ४ प्रकारचे रुपक, उपमा, दीपक-आदी, मध्य व अन्त व प्रतिवस्तूपमा या अलंकारांचे वर्णन आहे.

द्वितीय वर्गात आक्षेप, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, विभावना, समासोक्ती, अतिशयोक्ती ह्या अलंकारांचे वर्णन आहे.

तृतीय वर्गात केवळ तीन अलंकार वर्णन केले आहेत. यथासंख्या, उत्प्रेक्षा व स्वभावोक्ती.

चतुर्थ वर्गात सात अलंकार आहेत. प्रेय, रसवत्, उर्जस्वि, पर्यायोक्त, उदात्त (दोन प्रकार), श्लिष्ट (दोन प्रकार).

पंचम वर्गात ११ अलंकारांचे वर्णन आहे. अपह्नुती, विशेषोक्ति, विरोध, तुल्ययोगिता, अप्रस्तुत प्रशंसा, व्याजस्तुति, निदर्शना, उपमेयोमपा, सहोक्ति, संकर (चार प्रकार), परिवृत्ती.

सहाव्या वर्गात अनन्वय, ससन्देह, संसृष्टि, भाविक, काव्यलिङ्ग व दृष्टांत अलंकारांचे वर्णन आहे.

**मूल्यांकन**

उद्भटांची काही अलंकार लक्षणे भामहांचीच आहेत. परंतु अनेक जागी त्यांनी आपल्या स्वतःच्या मताची स्थापना केली आहे. त्यांचे काही विशिष्ट सिद्धांत ह्याप्रमाणे आहेत.

१) अर्थभेदावरून शब्दभेदाची कल्पना करणे शक्य आहे असे त्यांचे मत आहे. '**अर्थभेदेन तावच्छब्दा भिद्यन्ते।**'

२) श्लेष अलंकाराचे ते दोन प्रकार मानतात, शब्दश्लेष व अर्थश्लेष. परंतु ह्या दोन्ही भेदांचा समावेश ते अर्थालंकारातच करतात. मम्मटाने ह्या मतावर नवम उल्लासात कडवी टीका केली आहे. ते म्हणतात,

'**शब्दश्लेष इति चोच्यते, अर्थालंकारमध्ये च लक्ष्यते इति कोऽयं नयः।**'



३) श्लेष दुसऱ्या अलंकारांच्या तुलनेत प्रबळ आहे. जेथे कुठे दुसऱ्या अलंकारांसह श्लेष येतो तेथे अन्य अलंकार निस्तेज होतात व श्लेष प्रबळ ठरतो. मम्मटाने ह्या मतावर सुद्धा टीका केली आहे.

४) उद्भट वाक्यामध्ये तीन प्रकारचा अभिधा व्यापार मानतात.

५) अर्थाची कल्पना दोन प्रकारे केली आहे. विचरित सुस्थ तसेच अविचरित रमणीय.

६) काव्यगुणांना संघटनेचा धर्म मानले आहे.

७) व्याकरणावर आधारित उपमेच्या प्रकारांचे सर्वप्रथम प्रतिपादन उद्भटच करतात.

८) उद्भटांचे असे मत आहे की रस व्यंजनेने व्यक्त होतो तसाच साक्षात संज्ञेने सुद्धा व्यक्त होऊ शकतो. मम्मट ह्यालाच रसदोष मानतात.

उद्भटांचा अलंकारशास्त्रावर विशेष प्रभाव आहे. उत्तरकालीन सर्व आचार्य त्यांच्या रचनेतून उद्धरणे देतात. डॉ. पां. बा. काणे ह्यांच्या मते उद्भटाच्या प्रभावातिशयामुळेच भामहाची कृती मागे पडली. काही काळ तर भामहाची रचना केवळ नाममात्र होती. त्यांनी काव्यामध्ये अनेक सिद्धांताची स्थापना केली. अलंकारक्षेत्रामध्ये उद्भटाने रसाची व्याख्या करून रसाला अधिक महत्त्वपूर्ण स्थान दिले. सामान्य काव्यामध्ये ते रसाला अधिक महत्त्व देत नाहीत. त्यांनी शास्त्रीय शब्द, भाव, अनुभावाचा प्रयोग केला आहे. तसा भामहाने केला नाही.

उद्भटाने काही विशिष्ट अलंकाराचे सुद्धा असे भेद केले आहेत जे भामहाच्या ग्रंथात नाहीत. अतिशयोक्तीचे उद्भटाने चार भेद केले तर भामहाने एकच भेद केला आहे. अनुप्रासाचे भेद ते वृत्तीच्या आधारे मानतात. ते वृत्तीचे पाच भेद मानतात व ते भेद रसाच्या दृष्टिकोनातून केले आहेत. त्याला मम्मट आणि रुय्यकाने सुद्धा स्वीकारले आहे. जरी स्वतंत्र अध्यायात त्यांनी शब्दशुद्धतेचे विवेचन केले नाही तरी सुद्धा उपमेच्या संदर्भात त्यांनी या विषयावर पर्याप्त प्रकाश टाकला आहे.

प्रतिहारेन्दुराज, जे मुकुल भट्टाचे शिष्य होते, त्यांनी उद्भटाच्या कृतीवर टीका लिहून त्यांच्या कृतीला अधिक प्रसिद्ध व स्पष्ट केले आहे.

काश्मिरी राजानक तिलकाने सुद्धा ह्या ग्रंथावर 'विवृति' नावाची टीका लिहिली आहे.

उद्भट वामनाचे समकालीन होते. राजा जयापीडच्या सभेत ते सभापती होते. कल्हणाचे तर असे म्हणणे आहे की त्यांचे प्रतिदिन वेतन एक करोड दीनार (स्वर्णमुद्रा) होते. इतके त्यांचे मानाचे स्थान होते.

**दीनार शतलक्षेण प्रत्यहं कृतवेतनः।**

**भट्टोभूत् उद्भटः तस्य भूमिभर्तुः सभापतिः।** (राजतरंगिणी ४।४९५)

जर हे वर्णन खरे असेल तर उद्भट खरोखरच अत्यंत धनाढ्य व भाग्यशाली व्यक्ती असावेत. एकाच राजाच्या आश्रयाला असूनसुद्धा वामन आणि उद्भट साहित्याच्या क्षेत्रात प्रतिस्पर्धी होते. वामन रीतीसंप्रदायाचे संस्थापक होते तर उद्भट अलंकारसंप्रदायाचे समर्थक होते. दोघेही आपल्या विषयांच्या मौलिक सिद्धांतांचा पुरस्कार करणारे आचार्य होते. उद्भटाने भामहाच्या ग्रंथावर 'भामह विवरण' नावाचा व्याख्या ग्रंथ लिहिला. ह्याचा निर्देश लोचन आदी प्रमाणिक ग्रंथांमध्ये उपलब्ध होतो. परंतु हा महत्त्वपूर्ण ग्रंथ आजपर्यंत उपलब्ध झाला नाही.

उद्भटाची कीर्ती 'काव्यालंकार सारसंग्रह' नामक ग्रंथावरच अवलंबून आहे. ह्या ग्रंथात सहा वर्ग आहेत. ज्यात ७९ कारिकांमध्ये ४१ अलंकारांचे वर्णन आहे. ग्रंथाचा विषय अलंकारच आहे. ह्याची टीका मुकुलभट्टाचे शिष्य प्रतिहारेन्दुराजने (९५० ई.) केली आहे. भामहाप्रमाणे अलंकारसंप्रदायाचे अनुयायी असून सुद्धा भामहाच्या अनेक सिद्धांताशी भिन्नता आहे.

मम्मटाचार्य, अभिनवगुप्त यांनी उद्भटाच्या काही विचारांचे खंडन केले असले तरी सुद्धा पंडितराज जगन्नाथाने अलंकार प्रकरणात त्यांचा आदराने उल्लेख केला आहे. तो असा, 'अत्राहुरुद्भटाचार्यः' (रसगंगाधर). अशा प्रकारचे उद्भटांचे ऋण परवर्ती आचार्यांवर दिसून येते.

* *



.५.

# वामन

## वामनांचा काळ

९व्या शतकातील प्रमुख अलंकारशास्त्रींमध्ये वामनाचार्यांचा समावेश होतो. त्यांनी संस्कृत साहित्यशास्त्रामध्ये अनेक विचारधारांचा सूत्रपात केला आहे. सुदैवाने वामनांचा काल निश्चित करण्यात कोणतीही विशेष अडचण येत नाही. वामनाच्या काळाची सीमा त्यांच्याच उद्धरणांमुळे प्राप्त होते. जी उद्धरणे त्यांनी भवभूतिरचित उत्तररामचरित व महावीर चरितातून घेतली आहेत. भवभूति कन्नौजचा राजा यशोवर्माच्या अधिपत्त्यकाळात ८व्या शतकातील मानले जातात. राजशेखर वामनाचा उल्लेख करतात आणि वामनाच्या रचनांचे उदाहरण देतात. ह्यावरून त्यांचा काळ १०व्या शताब्दीचा उत्तरार्ध आहे हे सिद्ध होते, कारण ९व्या शतकापर्यंत वामन प्रसिद्ध झाले होते. अभिनवगुप्त लोचन टीकेत हे स्पष्ट करतात की ९व्या शतकाच्या मध्यात आनंदवर्धन वामनाला जाणत होते. जरी त्यांनी प्रत्यक्षपणे वामनांचा उल्लेख केला नसला तरी सुद्धा तृतीय उद्योतातील वृत्तीमध्ये ते स्पष्टपणे वामनाच्या रीतीसंप्रदायाचा संकेत देतात. प्रतिहारेन्दुराज सुद्धा वामनाचे मोठे भक्त होते. त्यांनी वामनाचा उल्लेख अनेकवेळा केला आहे. त्यांनी अलंकारध्वनीच्या विषयी स्पष्टपणे सांगितले आहे की अशाच स्थळांना वामनाने 'वक्रोक्ती' म्हटले आहे. ह्यावरून वामनाचा काळ ९व्या शतकाचा पूर्वार्ध मानला जातो. कल्हणाच्या राजतरंगिणीत वर्णित काश्मीर नरेश जयपीडाचा मंत्री वामन आणि आलंकारिक वामन वेगळे नाहीत, असे मत डॉ. बूहलर, सुशीलकुमार डे व डॉ. काणे यांचे आहे. डॉ. काणे यांच्या मते वामनाचार्य आणि उद्भट समकालीन असावेत किंवा प्रतिस्पर्धी असावेत. परंतु दोघांनीही परस्परांचा उल्लेख केलेला नाही.

प्रतीहारेन्दुराजने सुद्धा वामनाचा अनेक वेळा उल्लेख केला आहे. त्यावरून वामनाचा काळ ९व्या शताब्दीचा पूर्वकाळ मानला जातो. कल्हणाच्या राजतरंङ्गिणीनुसार वामन हे काश्मिरचा राजा जयापीडचे मंत्री होते.

**मनोरथः शंखदत्तश्चटकः सन्धिमांस्तथा**

**बभूवुः कवयस्तस्य वामनाद्याश्च मन्त्रिणः।**

**ग्रंथरचना**

वामनांचा काव्यालंकारसूत्र हा ग्रंथ आज उपलब्ध आहे. काव्यालंकार सूत्राचे प्राचीन टीकाकार 'सहदेवा'चे असे कथन आहे की वामनाचा हा ग्रंथ काही कारणाने नष्ट झाला होता. त्याचे संशोधन मुकुलभट्टाने दशम शतकाच्या आरंभी केले.

**ग्रंथस्वरूप**

काव्यालंकारसूत्र ग्रंथ तीन भागांमध्ये विभागलेला आहे- सूत्र, स्वोपज्ञवृत्ति आणि उदाहरण. वामनाने स्वतः म्हटले आहे,

**प्रणम्य परमं ज्योतिर्वामनेन कविप्रिया**

**काव्यालंकारसूत्राणां स्वेषां वृत्तिर्विधीयते।**

वामनाच्या वृत्तीमध्ये जवळपास २५० श्लोक किंवा श्लोकांश उद्धृत केले आहेत. वामनाने आपला ग्रंथ पाच अधिकरणांमध्ये विभाजित केला आहे व त्यात केवळ सूत्रशैलीचे अनुकरणच नाही तर त्याच्या अनेक शब्दांचा प्रयोगपण केला आहे. प्रत्येक अधिकरण दोन किंवा तीन अध्यायात विभक्त आहे. पूर्ण पुस्तकात १२ अध्याय आहेत प्रथम व चतुर्थ अधिकरणात तीन व उर्वरित अधिकरणात दोन अध्याय आहेत. एकूण ३१९ सूत्रे आहेत. कौटिल्याच्या अर्थशास्त्राचे व वात्स्यायनाच्या कामसूत्रांचे अनुकरण त्याने केले आहे. बहुतेक प्राचीन सूत्रकारांनी आपले ग्रंथ अध्यायात विभक्त केले व अध्यायांना अधिकरणामध्ये विभक्त केले आहे.

प्रथम शारीर नामक अधिकरणात खालील विषयांचे निरूपण आहे.

काव्यप्रयोजन, काव्यशिक्षेचे अधिकारी, काव्याचा आत्मा, तीन रीति-वैदर्भी, गौडी, पाञ्चाली, काव्याचे हेतू व प्रकार. द्वितीय दोषदर्शन नामक अधिकरणामध्ये पद, वाक्य तसेच वाक्यार्थांच्या दोषांचे निरूपण आहे. तृतीय गुणविवेचन नामक अधिकरणात गुण व अलंकारांमध्ये परस्पर भेद, शब्दार्थ विषयक दहा गुणांचे लक्षण व उदाहरणांचे प्रतिपादन आहे. चतुर्थ अलंकारिक नामक अधिकरणात यमक, अनुप्रास तसेच उपमा अलंकार व



त्यांचे सहा दोष तसेच न्यूनताधिकरुपेण उपमेवर आधारित अन्य अलंकारांचे निरूपण केले आहे. पंचम प्रायोगिक नामक अधिकरणात कविपरंपरेचे प्रतिपादन केले आहे. जसे, कोणत्याही शब्दाला पुनरूक्त न करणे. पूर्वार्धाच्या अतिरिक्त श्लोकपादांमध्ये संधि नियमांचे पालन, पादाच्या प्रारंभी 'खलु' आदि शब्दांचा अप्रयोग तसेच व्याकरणाची शुद्धी कशाप्रकारे शक्य होते हे सांगितले आहे. प्राचीन कवींद्वारा प्रयुक्त अशुद्ध पदांचा संग्रह करून त्यांना व्याकरणद्वारा सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. शब्दशुद्धी विषयक अंतिम अध्याय भामहाच्या षष्ठ परिच्छेदासमान आहे. *परंतु भामहाने (६.३२.६०) पाणिनीच्या सूत्रांच्या आधारे काही प्रयोगांची उदाहरणे दिली आहेत. तसेच कवींनी कोणता प्रयोग करावा व कोणता करू नये हे सांगितले आहे. त्याने सामान्यपणे अष्टाध्यायीच्या अध्याय व पाठांचे अनुसरण केले आहे.*

परंतु वामनाने अष्टाध्यायीच्या क्रमाचे अनुसरण केले नाही. त्यांनी सरळ शब्दांचे प्रयुक्त व अप्रयुक्त होणे सांगितले आहे. प्रयोगविशेष अशुद्ध का आहे व त्याला शुद्ध कसे केले जाऊ शकते हे पण सांगितले आहे. पाणिनीच्या १.२.६७ तसेच ४.१.४८ ह्या सूत्रांनुसार 'रूद्रश्च रूद्राणी च' ह्या अर्थामध्ये एकशेष द्वंद्व होऊन रूद्रौ असा शब्दप्रयोग करू नये. ५.२.१ च्या वृत्तीमध्ये त्याने कथन केले आहे की इन्द्रौ, भवौ, शर्वौ आदि शब्दांचा प्रयोग करू नये. असे दिसते की ह्यामध्ये भामहाचा निम्नलिखित श्लोक अपेक्षित आहे.

**सरूपशेषं तु पुमान् स्त्रिया यत्र च शिष्यते।**

**यथाह वरुणानिन्द्रौ भवौ शर्वौ मृडाविति।**

**वामनाची विशेषता**

वामनाच्या काही विशेषता खालीलप्रमाणे आहेत.

१. गुण व अलंकारामध्ये परस्पर भेदाचे प्रतिपादन.

   **काव्यशोभायाः कर्तारो धर्मा गुणाः।**

   **तदतिशय हेत्त्वस्त्वलंकाराः।** (३.२ १-२)

२. तीन रीति - वैदर्भी, गौडी व पांचाली

३. वक्रोक्तीचा अर्थालंकरणात समावेश तसेच 'सादृश्याल्लक्षणा' रूपात तिचा स्वीकार.

'सादृश्यात् लक्षणा वक्रोक्तिः।'

**उन्मिमील कमलं सरसीनां कैरवं च निमिमीय मुहूर्तात्।**

**भत्र नेत्र धर्मापुन्मीलननिमील ने सादृश्याद्विकाससंकोचौ लक्षयतः।**

(४.३.८)

४. विशेषोक्तिचे विचित्र लक्षण–

**एक गुणहानिकल्पनायां साम्यदाढ्‍र्यं विशेषोक्तिः।** (४.३.२३)

जगन्नाथ आदि आलंकारिकांच्या मते रूपक (दृढाशेष) आहे.

५. आक्षेप नामक अलंकारांचे दोन अर्थ–

**उपमानस्य आक्षेपः प्रतिषेधः तुल्यकार्यार्थस्य नैरर्थक्य विवक्षायामाक्षेपः,**

**उपमानस्याक्षेपतः प्रतिपत्तिरित्यपि सूत्रार्थः।**

मम्मट व अन्य दुसऱ्या अलंकारिकांच्या मते दोन स्वतंत्र अलंकार आहेत. प्रतीप आणि समासोक्ति.

६. सर्व अर्थालंकारांना उपमेचा विस्तार मानणे.

**वामनाचार्यांचा रीतिसंप्रदाय**

साहित्यशास्त्रातील एक संप्रदाय म्हणजे रीतिसंप्रदाय. काव्यालंकारसूत्राचा कर्ता वामन हा या संप्रदायाचा पुरस्कर्ता आहे. त्याच्याही पूर्वी रीती हा शब्द अस्तित्वात होता. पण त्याचे विवेचन फारसे झाले नव्हते. दंडीने रीति विवेचनावर भर दिलेला असला तरी गुण व अलंकार यांना एकत्र धरून रीतिचे विवेचन केले होते. वामनाचा विशेष हा की त्याने गुण व अलंकार यांची पृथक् सत्ता मानून रीतीचे विवेचन केले. गुण व अलंकार यातील भेद सांगतांना ते आपल्या ग्रंथात लिहितात,

**काव्यशोभायाः कर्तारो धर्मः गुणाः। तदतिशय हेतवस्त्वलङ्कारा:।**

**पूर्वे नित्याः। तैर्विना काव्याशोभानुपपत्तेः।**

(काव्यालंकारसूत्र ३.१.१–३)

त्यांच्या ह्या मतावर मम्मटांनी काव्यप्रकाशाच्या आठव्या उल्लासात कठोर टीका केली आहे. तरीसुद्धा दोन्ही तत्त्वांच्या कार्यक्षेत्रात वेगळेपणा मानण्याचा सिद्धांत सर्वप्रथम वामनांनी प्रस्तुत केला. वामन वक्रोक्तिला



अर्थालंकारात समाविष्ट करतात आणि हिचे लक्षण सुद्धा असेच काहीसे अग्राह्य आहे. 'एकगुणहानिकल्पना या साम्यदार्ढ्य विशेषोक्तिः।' ह्या लक्षणाला पण्डितराज जगन्नाथ रुपकाचे लक्षण मानतात. तसेच वामनांच्या 'आक्षेपा'चे लक्षणसुद्धा मम्मट तसेच अन्य आलंकारिकांच्या प्रतीप व समासोक्तीच्या लक्षणाशी अधिक साम्य राखते.

काव्याची शोभा उत्पन्न करणारे ते गुण व त्या शोभेची वाढ करणारे ते अलंकार होत. यातील गुण हे नित्य आहेत. कारण त्यांच्यावाचून काव्यामध्ये शोभा उत्पन्न होणारच नाही.

**वामनांचे वैशिष्ट्य**

वामन रीती संप्रदायाचे प्रवर्तक मानले जातात. वामनांनी स्पष्टपणे या गोष्टीची उद्घोषणा केली आहे की रीती हाच काव्याचा आत्मा आहे. 'रीतिरात्मा काव्यस्य विशिष्टपदरचना रीतिः।' वामन हे पहिले आचार्य आहेत ज्यांनी गुण व अलंकारांमध्ये स्पष्ट भेद मानला आहे. त्यांचे असे मत आहे, 'काव्यशोभायाः कर्तारो धर्माः गुणाः तदतिशयहेतवस्त्वलंकाराः।'

वामनांना काव्यविद्येचे प्रथम आचार्य मानतात. त्यांनी ध्वनिकार आनंदवर्धनाच्या आधी काव्याच्या सुस्पष्ट व व्यवस्थित सिद्धांताचे प्रतिपादन केले. काव्याचा आत्मा काय आहे? ह्या प्रश्नावर सर्वप्रथम व्यवस्थित विवेचन वामनाचार्यांनीच केले आहे. त्यांच्या पूर्वी कोणत्याच आचार्याने काव्याच्या आत्म्याकडे लक्ष दिले नव्हते. वामनांनी स्पष्टपणे सांगितले आहे की शब्द तसेच अर्थ काव्याचे शरीर व रीती आत्मा आहे. रीती तीन प्रकारच्या आहेत– वैदर्भी, गौडी, पाञ्चाली.

जिच्यात समास कमी ती वैदर्भी

जिच्यात समासांचे आधिक्य ती गौडी

जिच्यात मध्यम मार्ग अनुसरला आहे ती पांचाली.

वामनाने ओज, प्रसाद, श्लेष, समता, समाधी, माधुर्य, सौकुमार्य, उदारता, अर्थव्यक्ती आणि कांती असे १० गुण सांगितले आहेत.

वर उल्लेखलेले दहाही गुण वैदर्भी रीतीत असतात. कालिदासाचे काव्य हे वैदर्भी रीतीचे समजले जाते. गौडी रीतीत ओज गुण विशेषत्वाने आढळतो.

भवभूतीची नाटके गौडीरीतीची समजली जातात. पांचाली रीतीत माधुर्य व सौकुमार्य या गुणांचे आधिक्य असते.

अमरशतक हे पांचाली वृत्तीचे उदाहरण होय. रुद्रटाने लाटी ही एक चौथी रीती सांगितली आहे. तर भोजदेवाने सरस्वतीकंठाभरणात आवंती व मागधी अशा अन्य दोन रीतींचा निर्देश केला आहे.

या सर्व मिळून सहा रीती होतात. वामनांच्या मते विशिष्ट पदरचना म्हणजे रीती होय.

ही विशिष्ट पदरचना प्रबंधाच्या विशिष्ट गुणांत आश्रित असते. वैदर्भी रीतीच्या वैशिष्ट्यांचे प्रतिपादन सुद्धा वामनच करतात. कारण वैदर्भीत १० गुण असतात. वामनांच्या मतानुसार ह्या रीतींची नावे विशेष प्रदेशांच्या कवींच्या रचनातील विशेष काव्यगुणांच्या प्रचलनामुळेच दिली आहेत.

भरतापासून ते दंडीपर्यंतच्या आचार्यांनी काव्य गुणांची संख्या १० मानली होती. वामनांनी सुद्धा ही संख्या मान्य केली आहे. वामनाने १० गुण सांगितले आहेत. परंतु ते १० गुण शब्दगुणात व अर्थगुणात विभाजित करतात. ह्या मौलिक विभाजनाचे श्रेय सुद्धा वामनांकडेच जाते. जरी त्यांच्यानंतरच्या आचार्यांनी ह्याचे अनेकवेळा खंडन केले आहे तरी सुद्धा विचारांच्या मौलिकतेचे श्रेय निश्चितच वामनांचे आहे. गुणांच्या लक्षणाबाबतसुद्धा दंडी व वामनामध्ये मतभेद आहे.

गुणविवेचनानंतर काव्याचे कमी महत्त्वाचे तत्त्व म्हणून अलंकारांची रचना केली आहे. भामहांनी गुण आणि अलंकारात फरक करण्याकडे लक्ष केंद्रित केले नाही. दंडी ह्यात भेद मानतच नाहीत. उद्भट सुद्धा ह्याच मताचे समर्थक आहेत. ह्या दोन्ही तत्त्वांमध्ये स्वरूपभेद निश्चितपणे स्वीकारणारे वामन हे पहिले आचार्य आहेत. वामनांनी सुद्धा काव्यात अलंकाराचे महत्त्व स्वीकारले आहे. परंतु त्यांचे अलंकारांशी तात्पर्य केवळ काव्याश्रित अलंकारांशी नाही तर प्रामुख्याने काव्यगत सौंदर्याशी आहे.

'काव्यं ग्राह्यमलंकारात् सौंदर्यमलंकारः।' ही अलंकाराची व्युत्पत्ती वामनांनी हाच भाव ठेवून केली आहे. त्यांच्या मते अलंकरणाचे कारणच उपमादी अलंकारामध्ये सामावले असते.



'अलंकृतिरलंकारः करणव्युत्पत्या पुनरलंकार शब्दोऽयमुपमादिषु वर्तते।' वामनाच्या मतानुसार सौंदर्याच्या कारणामुळेच काव्य ग्राह्य होते. रीती तसेच रीतीचे अंश अर्थात गुण ह्या काव्यसौंदर्याच्या निष्पत्तीमध्ये अनिवार्य असतात. काव्याश्रित अलंकार गौण सहायक रूपाने सौंदर्याला वृद्धिंगत करतात.

अलंकारांचे सामान्य लक्षण आणि विशिष्ट अलंकारांची परिभाषासुद्धा वामन नावीन्याने करतात. शब्दालंकारामध्ये त्यांनी केवळ अनुप्रास व यमकाचाच स्वीकार केला आहे. अर्थालंकारांच्या बाबतीत त्यांचे सामान्य कथन आहे की सर्वच अलंकार उपमागर्भित असतात. उपमा सापेक्ष असल्यामुळे त्यांना उपमाप्रपंच नाव दिले आहे.

अशाप्रकारे अनेक क्षेत्रांमध्ये वामनांनी रूढमार्गाचा आश्रय न घेता आपल्या विचारांमध्ये नावीन्य आणण्याचा सफल प्रयत्न केला आहे. ह्या दृष्टीने त्यांचे स्थान काव्यशास्त्रात महत्त्वपूर्ण आहे.

* *

.६.

# रुद्रट

संस्कृत साहित्याकारांमध्ये रुद्राचे नाव आदराने घेतले जाते. यांच्या जीवनवृत्ताविषयी अत्यंत अल्प माहिती उपलब्ध आहेत. त्यांच्या नावावरून हे काश्मिरनिवासी असावेत असा अंदाज केला जातो. परंतु केवळ नावाच्या शेवटी 'ट' येतो म्हणून त्यांना काश्मिरी मानता येत नाही. कारण कनौजच्या गुर्जर प्रतीहार राजा भोजदेवाच्या दानपत्रात रुद्रट नावाच्या राज्याधिकाऱ्याचे नाव येते.

**रुद्रटेन प्रयुक्तस्य आसनस्य स्थिरायतेः।**
**दूतको बालादित्योत्र राजभट्टारिकासुतः।।**

रुद्रटाने ग्रंथारंभी गणेश व गौरीवंदना केली आहे व शेवटी भवानी, मुरारी व गजाननाची स्तुती केली आहे. ५व्या अध्यायातील १२ ते १४ श्लोकांवरील टीकेत नामिसाधुचे असे शब्द आहेत.

**अत्र च चक्रे स्वनामांक भूतोऽयं श्लोकः कविनान्तर्भवितो यथा।**
**शतानन्दा पराख्येन भट्ट वामुक सूनुना**
**साधितं रुद्रटेनेदं सामाजाधीमता हितम्।**

ह्यावरून निष्कर्ष निघतो की रुद्रटाचे एक नाव शतानंद सुद्धा होते. त्याच्या पित्याचे नाव वामुक होते व ते वेदाच्या सामशाखेचे अध्येता होते.

**रुद्रटाचा काळ**

रुद्रटाचा काळ निश्चित करण्यात विशेष अडचण येत नाही. कारण भामह, दण्डी आणि उद्भटापेक्षा अधिक अलंकारांची लक्षणे व उदाहरणे त्यांनी दिली आहेत आणि त्यांनी दिलेली उदाहरणे अधिक वैज्ञानिक व संक्षिप्त आहे. ह्यावरून रुद्रट ह्या सर्व आचार्यांच्या नंतर झाले असावेत.

१० व्या शतकानंतरच्या अनेक लेखकांनी आपल्या रचनांमध्ये रुद्रटाचा उल्लेख केला आहे. राजशेखराने त्याच्या काव्यमीमांसा ग्रंथामध्ये रुद्रटाच्या 'वक्रोक्ती' नामक शब्दालंकाराचा उल्लेख असा केला आहे,



**काकुवक्रोक्तिर्नाम शब्दालंकारोऽयमिति रुद्रटः।**

शिशुपालवधाचे टीकाकार काश्मिरी वल्लभदेवाने (दशम शतकाचा पूर्वार्ध) त्यांच्या अलंकारग्रंथाचा निर्देश आपल्या टीकेत केला आहे. प्रतिहारेन्द्रराज रुद्रटाच्या अनेक श्लोकांचा उल्लेख त्यांच्या नावाचा उल्लेख न करता करतात. दशरुपकाच्या चतुर्थ उल्लासावरील आपल्या 'अवलोक' नामक टीकेत धनिकाने रुद्रटाचा उल्लेख केला आहे. मम्मटाचार्यांनी रुद्रटाचा नावासह उल्लेख केला आहे आणि त्याच्या हेतू, समुच्चय व व्यतिरेक अलंकारांवर आलोचना केली आहे.

काश्मिरमधील वल्लभदेवाचा काळ इ.स. ९०० नंतरचा मानला जातो. म्हणून रुद्रटाला त्याच्या पूर्वी म्हणजे इ.स. ८५०च्या जवळपासचा मानले जाते.

**ग्रंथरचना**

रुद्रटाचा प्रसिद्ध ग्रंथ 'काव्यालंकार' हा आहे, ज्यामध्ये साहित्यशास्त्राच्या सर्व अंगांचे विवेचन केले आहे. ह्या ग्रंथामध्ये ७३४ श्लोक असून ते 'आर्या' वृत्तात रचले आहेत.

काव्यप्रकाशावरील टीकेत गोपालने रुद्रटाचे हे आर्या प्रेम श्लेषाद्वारे प्रकट केले आहे.

**अतिलोकमलङ्कारमाबिभ्रदमृतस्रुतम्।**
**आर्यानुरागीं सर्वज्ञः सत्यं रुद्रः सरुद्रटः।**

येथे 'सर्वज्ञ' शब्द 'शिव' या अर्थाने व 'आर्या' हा शब्द 'पार्वती' या अर्थाने आला आहे.

काव्यालंकारमध्ये ७३४ श्लोक असून ह्यामध्ये १२व्या अध्यायातील १४ श्लोकांचा समावेश केला नाही. ह्या १४ श्लोकांमध्ये ८ प्रकारच्या नायिका व त्यांच्या उपभेदांचे वर्णन केले आहे. हे श्लोक प्रक्षिप्त मानले आहेत.

हे ७३४ श्लोक १६ अध्यायात विभागले आहेत. १३वा अध्याय हा सर्वात लहान असून त्यात केवळ १७ श्लोक आहेत. अध्याय ७ आणि ८ सर्वात मोठे असून त्यात अनुक्रमे १११ व ११० श्लोक आहेत.

ह्या ग्रंथातील सर्व उदाहरणे स्वतः रुद्रटानेच रचली आहेत. रुद्रटाने

आपल्या ग्रंथात कोणत्याही ग्रंथकाराचा स्पष्ट उल्लेख केला नाही. पण भरताचे नाट्यशास्त्र व मयूरकवीचे सूर्यशतक यांचा उल्लेख अनुक्रमे 'आचार्यैः' (१२.४) व 'रोगविमुक्तिः' (१.९) ह्या शब्दांनी केला आहे.

१६ अध्यायात विभक्त असलेल्या ह्या ग्रंथाचा विषयानुक्रम ह्याप्रमाणे आहे.

प्रथम अध्यायात गणेश आणि गौरीची स्तुती केल्यानंतर काव्यप्रयोजन, कवीशक्तीचे आवश्यक तत्त्व, शक्ती, व्युत्पत्ती व अभ्यास आणि त्यांची लक्षणे यांचे वर्णन केले आहे.

द्वितीय अध्यायात काव्य लक्षण सांगितले आहे. वक्रोक्ति, अनुप्रास, यमक, श्लेष व चित्र हे पाच शब्दालंकार, वैदर्भी, पांचाली, लाटी व गौडी ह्या चार रीतींचे लक्षण, काव्यामध्ये प्रयुक्त प्राकृत, संस्कृत, मागध, शौरसेनी, पैशाची आणि अपभ्रंश ह्या सहा भाषांचे उल्लेख, वक्रोक्ती व अनुप्रासाचे लक्षण व उदाहरण, अनुप्रासाच्या मधुरा, ललिता, प्रौढा, परुषा व भद्रा ह्या पाच वृत्तींचे लक्षण दिले आहे.

तृतीय अध्यायात यमकाचे ५८ श्लोकांमध्ये विस्तृत विवेचन केले आहे.

चतुर्थ अध्यायात श्लेष व त्याचे आठ प्रकार, वर्ण, पद, लिङ्ग, भाषा, प्रकृति, प्रयत्न, विभक्ती आणि वचन यांचे वर्णन केले आहे. भाषा श्लेषाचे उदाहरण म्हणजेच संस्कृत, प्राकृत, पैशाची, शौरसेनी इ. भाषांमध्ये आढळणारे समान शब्द.

पंचम अध्यायात चित्रकाव्याचे चक्रबन्ध, मुरजबन्ध, अर्धभ्रम, सर्वतोभद्र, मात्राच्युतक, प्रहेलिका इत्यादिंचे निरुपण केले आहे.

षष्ठ अध्यायात पद तसेच वाक्यदोषांचे वर्णन केले आहे.

सप्तम अध्यायात अर्थालंकाराचे चार आधार वास्तव, औपम, अतिशय तसेच श्लेष यांचे वर्णन आहे आणि वास्तवावर आधारित २३ अलंकारांचे लक्षण दिले आहे.

अष्टम अध्यायात औपम्यावर आधारित २१ अलंकारांचे वर्णन आहे.

नवम अध्यायात अतिशयावर आधारित १२ अलंकारांचे वर्णन आहे.

दशम अध्यायात शुद्ध श्लेषाचे १० व संकराचे २ भेद वर्णन केले आहेत.



एकादश अध्यायात अर्थाचे ९ दोष व उपमेचे ४ दोष वर्णन केले आहेत.

द्वादश अध्यायात १० रसांचे निरुपण, शृंगाराचे लक्षण आणि त्याचे संभोग आणि विप्रलंभ नावाचे दोन प्रकार, नाटकाचे गुण व त्याच्या सहायकांचे वर्णन, तसेच नायक-नायिका भेद सांगितले आहेत.

त्रयोदश अध्यायात संभोग शृंगार तसेच नायिकांचे हावभाव वर्णन केले आहेत.

चतुर्दश अध्यायात विप्रलंभ शृंगार व त्याच्या १० दशांचे वर्णन तसेच रुष्ट नायिकेला समजवण्याचे ६ प्रकार वर्णन केले आहेत. ते असे, सभ्य, दान, भेद, प्रणति, उपेक्षा आणि प्रसंगभंग.

पंचदश अध्यायात वीर व अन्य रसांची विशेषता वर्णन केली आहे.

षोडश अध्यायात काव्याचे विविध प्रकार कथा, आख्यायिका इत्यादींचे वर्णन आहे.

**काव्यालंकाराची विशेषता**

या विषयानुक्रमावरून असे दिसते की ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात काव्याचे प्रयोजन, काव्य कारण व कवीला आवश्यक असणारे गुण हे विषय आहेत. अखेरचा अध्याय काव्यप्रकारांचे वर्णन करणारा आहे. उरलेल्या १४ अध्यायांचे तीन विभाग पडतात. त्यापैकी २ ते ६ अध्यायात शब्द, शब्दालंकार, शब्ददोष इ. विषय आहेत.

अध्याय ७ ते ११ मध्ये अर्थ, अर्थालकार, अर्थदोष इ. चे विवेचन आहे. अध्याय १२ ते १५ मध्ये शृंगार आणि इतर रस व नायक-नायिका भेद यांचे निरुपण आहे.

रुद्रटाने प्रथमच काही तत्त्वांच्या आधारावर वास्तव, औपम्य, अतिशय व श्लेष या चार वर्गात अलंकाराचे वर्गीकरण केले आहे. या पद्धतीमुळे काही अलंकार द्विरूक्त झाले आहेत. त्यांच्या अलंकार विवेचनात काही अलंकाराची नावे बदलल्या गेली आहेत आणि काही नावे जुनी असली तरी त्याची स्वरूपे बदलली आहेत. रुद्रटाचा 'व्याजश्लेष' अलंकार भामहाची 'व्याजस्तुती' आहे. 'जाति' हा अलंकार मम्मटाचा 'स्वभावोक्ति' आहे. 'पूर्व' अलंकार अतिशयोक्तीचा चतुर्थ प्रकार आहे.

अलंकाराच्या ग्रंथात रसाचे सविस्तर वर्णन करणारा रुद्रट हाच पहिला आहे, असे म्हटले जाते. त्याने शांत व प्रेयान् यासह दहा रस मानले आहेत. यापुढे जाऊन तो म्हणतो की आस्वाद्यतेच्या अवस्थेला जाऊन पोहचवणारा कोणताही भाव रस होऊ शकतो. या विवेचनामुळे रसांची संख्या कमीत कमी १४१ पर्यंत जाते.

रसनिर्मिती करतांना कवीने जगाकडे पाठ फिरवू नये अशी महत्त्वाची सूचना त्याने दिली आहे.

रुद्रटाने वैदर्भी, गौडी, पांचाली व लाटी अशा चार रीती सांगितल्या आहेत. परंतु त्यांचे लक्षण व उदाहरणे दिली नाहीत. पहिल्या तीन रीतींचे वामनाच्या रीतींशी नावापलीकडे कोणतेही साम्य नाही. समासांची दीर्घता एवढेच रुद्रटाच्या रीतीचे स्वरूप आहे. रुद्रटाने त्याच्या ग्रंथात काव्यगुणांचे विवेचन केले नाही. भावनामक अलंकाराच्या प्रतिपादनात रुद्रट व्यंग्यार्थाच्या सिद्धांताच्या अतिसमीप जातात. कारण काव्यामध्ये व्यंग्यार्थ प्रमुख तत्त्व आहे, हे त्यांना मान्य होते.

रुद्रट अलंकार संप्रदायाचे प्रतिनिधी आचार्य आहेत. ते भरताद्वारा प्रस्तुत रससिद्धांताशी परिचित आहेत आणि काव्यात रसाच्या स्थितीवर भर देतात.

**'तस्मात्कर्तव्यं यत्नेन महीयसा रसैर्युक्तम्।'** (काव्य. १२.२)

तरीसुद्धा त्यांनी अलंकाराला अत्यंत महत्त्व दिले आहे.

अलंकारांचे वैज्ञानिक वर्गीकरण करण्याचे सर्वप्रथम श्रेय रुद्रटालाच आहे. रसतत्त्वाने प्रभावित असूनसुद्धा रुद्रट वास्तवात अलंकार सिद्धांताचेच समर्थक होते. त्यांनी रसाला केवळ बाह्य महत्त्व दिले आहे. कारण रुद्रट आपल्या ग्रंथातील १६ अध्यायांतील १० अध्यायांमध्ये अलंकाराचेच वर्णन करतात. अलंकारवादी आचार्यांच्या परंपरेचे अनुसरण करीत त्यांनी रीती व गुणाला विशेष महत्त्व दिले नाही. रुद्रटाच्या मतानुसार रीती पूर्णपणे शब्दविन्यासाच्या निश्चित नियमांवर आणि समासांवर आधारित असते. हिलाच ते शब्दाची 'समासवती वृत्ती' म्हणतात. ते ध्वनिशी परिचित नाहीत. त्यांनी केवळ लक्ष्यार्थ स्वीकारला आहे.



रुद्रटाने अलंकारांचे विवेचन आपल्या सर्व पूर्ववर्ती आचार्यांपेक्षा अधिक विस्ताराने केले आहे. उद्‌भटापेक्षा अधिक म्हणजे तीस अलंकारांचे त्यांनी वर्णन केले आहे. चित्रालंकारासाठी पूर्ण एक अध्यायच वापरला आहे. मम्मटांसारख्या परवर्ती आचार्यांनी रुद्रटाचे अलंकारविषयक विश्लेषण व परिभाषांना अप्रत्यक्षपणे स्वीकारले आहे.

रुद्रटांच्या ग्रंथामध्ये अलंकारांचे व्यापक संख्येत सूक्ष्म विश्लेषण आहे. त्यांनी त्यांचे व्यवस्थित सोदाहरण विवेचन केले आहे. तरी सुद्धा काव्यशास्त्रामध्ये त्यांच्या योगदानाला अधिक महत्त्व दिले जात नाही, कारण त्यांचा ग्रंथ व्यावहारिक आहे पण आदर्श नाही. म्हणून सैद्धान्तिकरूपात रुद्रटाचे अनुसरण करतांना कोणी दिसत नाही. कारण त्यांनी कोणत्याही विशिष्ट सिद्धांतांची प्रतिष्ठापना केली नाही.

डॉ.एस.के. डे यांनी रुद्रटांना 'अलंकार मताचे अंतिम महान व्याख्याता' म्हटले आहे.

**अन्य रचना**

'शृंगारतिलक'कर्ता रुद्रभट्ट तसेच रुद्रट एकच व्यक्ती आहे की ह्या दोन वेगळ्या व्यक्ती आहेत, ह्याविषयी विद्वानांमध्ये एकमत नाही.

रुद्रटकृत 'शृंगारतिलक' नावाची एक रचना उपलब्ध आहे. ह्यात तीन परिच्छेद आहेत. प्रथम परिच्छेदात रसभाव तसेच नायक-नायिकांचे निरुपण केले आहे.

द्वितीय परिच्छेदात विप्रलंभ शृंगार, वियोगाच्या १० दशा तसेच खण्डिता नायिकेच्या अनुनयाचे ६ प्रकार वर्णन केले आहेत.

तृतीय परिच्छेदात शृंगार व्यतिरिक्त अन्य रस व चार वृत्ती– कैशिकी, सात्वती, आरभटी व भारती वृत्तींचे निरुपण आहे.

रुद्रटाचे कथन असे आहे की, त्याने काव्यसंबंधी रसाचे निरुपण केले आहे, तर भरताने नाट्यसंबंधी रसांचे प्रतिपादन केले आहे.

**प्रायो नाट्यं प्रति प्रोक्ता भरतायां रसस्थितिः।**
**यथामति मयाप्येषा काव्यं प्रति निगद्यते।।**

शृंगारतिलकचा अंतिम श्लोक असा आहे –

**कान्या काव्यकथा कीदृग् वैदग्धी को रसायनः।**
**किं गोष्टीमण्डनं हन्त श्रृंगारतिलकं विना।।**

काही हस्तलिखित प्रतींमध्ये हा श्लोक नाही. परंतु श्लोकाच्या व्याख्येवरून हे ज्ञान होते की रुद्रभट्टाने त्रिपुरवध नामक एक ग्रंथसुद्धा रचला होता. ह्यात संशय नाही की त्रिपुरवध, शृंगारतिलक आणि रुद्र (भगवान शिव तसेच ग्रंथकार रुद्र) शब्दांमध्ये श्लेष आहे. ह्याची अशी पण व्याख्या होऊ शकते की 'त्रिपुरवध' ही ग्रंथकाराची स्वतःची रचना नाही परंतु 'त्रिपुरदाह' नामक रूपक (डिम) भगवान शंकर तसेच त्यांच्या परिचर वर्गांसमक्ष भरतद्वारा अभिनीत झाले होते.

दशरुपकात धनिकाचे असे उद्धरण येते,

**इदं त्रिपुरदाहे तु लक्षणं ब्रह्मणोदितम्**
**ततस्त्रिपुरदाहश्च डिमसञ्ज्ञः प्रयोजितः।।**

(दशरुपक ४.५७-६०)

श्रृंगारतिलकाच्या हस्तलिखित ग्रंथामध्ये कुठे कुठे रुद्राचे नाव आढळते. सुभाषित संग्रहात काव्यालंकारातील श्लोक रुद्रट, रुद्र, रुद्रभट ह्या तिन्ही नावांनी उद्धृत केले आहेत.

काव्यालंकार व श्रृंगारतिलक ह्या ग्रंथांमध्ये काही अध्यायात समानता आहे तर काही ठिकाणी भिन्नता आहे.

रुद्रटकृत काव्यालंकाराचे १२ ते १४ अध्याय श्रृंगारतिलकाच्या समान आहेत. शब्दांचे पण अत्यंत साम्य आहे. श्रृंगारतिलकामध्ये काही ठिकाणी विस्तार केला आहे. उदा. चार वृत्ती, कामभावनेच्या दहा दशा तसेच नायिकेचे उपभेद व लक्षणे.

श्रृंगारतिलकामध्ये काव्याच्या ९ रसांचे वर्णन आहे. तर रुद्रटाने काव्यालंकारात रसांची संख्या १० सांगितली आहे.

श्रृंगारतिलकामध्ये चार वृत्तींचे वर्णन आहे. तर रुद्रटाने पाच वृत्ती सांगितल्या आहेत. (मधुरा, प्रौढा इ. काव्यालंकार, २.१९) त्यांनी कैशिकी वृत्तीविषयी काही लिहिले नाही.

रुद्रटाने प्रथम नायिकांचे तीन भेद केले- स्वीया, परकीया, वेश्या. पुनः त्यांचे खंडिता व अभिसारिका हे दोन भेद केले. स्वीया नायिकेचे स्वाधीनपतिका आणि प्रोषितभर्तृका असे दोन भेद केले.

ह्याउलट श्रृंगारतिलकमध्ये नायिकेचे आठ भेद सांगितले आहेत. (श्रृंगारतिलक १, ७२-७३)

रुद्रटाने काव्यालंकारमध्ये (१२, ३९-४०) वेश्यांसाठी एकही चांगला शब्द वापरला नाही. तर श्रृंगारतिलकमध्ये त्यांच्या विषयी सांगितले जाणारे दोष स्वीकार करूनसुद्धा त्यांचे समर्थन केले आहे.

**सर्वाङ्गना तु वेश्या सम्यगसौ लिप्यते धनं कामान्।**
**निर्गुण गुणिनोस्तस्या न द्वेष्यो न प्रियः क्वचित्।।**

(काव्यालंकार १२,३९)

**सामान्य वनिता वेश्या सा वित्तं परमिच्छति।**
**निर्गुणेऽपि न विद्वेषो न रागोऽस्या गुणिन्यपि।**
**तत्स्वरुपमिदं प्रोक्तं कैश्चिद् ब्रूमो वयं पुनः।।**

(श्रृंगारतिलक १.६२-६३)

श्रृंगारतिलकाच्या उपसंहारात वेश्यांच्या विषयी म्हटले आहे,

**सर्वस्वमेतास्तदहो स्मरस्य।** (श्रृंगारतिलक १.६९)

श्रृंगारतिलकातील 'कैश्चित्' पद संदेहोत्पादक आहे. कदाचित श्रृंगारतिलकाचा संकेत रुद्रटाकडे असावा.

**साक्षाच्चित्रे स्वप्ने स्याद् दर्शनमेवामिन्द्रजाले वा।**
**देशे काले भंग्या साधु तदाकर्णनं च स्यात्।।**

(काव्यालंकार १२.३१)

**साक्षाच्चित्रे तथा स्वप्ने तस्य स्याद् दर्शनं त्रिधा**
**देशे काले भंग्या च श्रवणं चास्य तद् यथा।।**

(श्रृंगारतिलक १.११)

ह्या दोन श्लोकात बरेच साम्य आहे.

९ व्या शतकानंतरच्या सर्व आचार्यांनी काव्यालंकाराच्या निर्मात्याचा उल्लेख रुद्रट नावानेच केला आहे.

**साधारण स्त्री गणिका सा वित्तं गुणिन्यपि।**
**श्रृंगारभास एव स्यान्नश्रृंगारः कदाचन।।** (रुद्रट)
**इति द्विषन्तमुद्दिश्य प्राह श्रीरुद्रटः कविः।** (भावप्रकाश पृ.९५)

तिलकमञ्जरीमध्ये असा श्लोक येतो,

**स मदान्धकविध्वंसी रुद्रः कैर्नाभिनन्द्यते।**
**सु श्लिष्ट ललिता यस्य कथा त्रैलोक्यसुन्दरी।।**
(श्रृंगारतिलक श्लो.३५)

रुद्रटांनी रस आणि अलंकारांचे योग्य विवेचन करून दोहोंमध्ये समन्वय स्थापित करण्याचा प्रयत्न केला. म्हणूनच त्यांचे रस आणि अलंकारविषयक चिंतन पुढील आचार्यांसाठी पथदर्शक ठरले.

* *



.७.

# आनंदवर्धन

**परिचय**

ध्वनिसिद्धांताचा उद्भावक (प्रवर्तक) म्हणून आनंदवर्धनांचे नाव अलंकारशास्त्राच्या इतिहासात सदैव अजरामर राहील. व्याकरणशास्त्राच्या इतिहासात जे स्थान पाणिनीला आहे तेच स्थान अलंकारशास्त्राच्या इतिहासात आनंदवर्धनांना प्राप्त आहे. आलोचनाशास्त्राला एका नवीन दिशेने नेण्याचे श्रेय आनंदवर्धनाचार्यांनाच आहे.

एक संस्कृत कवी आणि ध्वन्यालोक या ग्रंथाचा कर्ता म्हणून आनंदवर्धन प्रसिद्ध आहेत. यांच्या पित्याचे नाव शोण होते, असा देवीशतकात उल्लेख आहे. काश्मिरच्या अवंतिवर्मा राजाच्या (इ.स. ८५५-८९३) दरबारात हा सभापंडित होता असे कल्हण सांगतो.

**मुक्ताकणः शिवस्वामी कविरानन्दवर्धनः।**
**प्रभां रत्नाकरश्चागात् साम्राज्येऽवन्तिवर्मणः।**
(राजतरंगिणी ५.३४)

मुक्ताकण, शिवस्वामी, आनंदवर्धन व रत्नाकर हे अवंतिवर्म्याच्या कारकीर्दीत प्रसिद्ध पावले.

**आनंदवर्धनाचा काळ**

आनंदवर्धनांच्या देश व काळाविषयी पुरेशी माहिती उपलब्ध आहे. ते काश्मिरनिवासी होते. काश्मिर नरेश राजा अवन्तिवर्माच्या सभापंडितांमध्ये ते अग्रमान्य होते. कल्हणाच्या राजतरंगिणीत हा निर्देश सर्वथा मान्य आहे. कल्हणाच्या ह्या मताची पुष्टी अन्य प्रमाणांद्वारे सुद्धा करता येते. आनंदवर्धनांचे टीकाकार अभिनवगुप्ताने त्यांच्या स्तोत्रांची रचना इ. ९९१ मध्ये केली. आनंदवर्धनांचा एक दुसरा ग्रंथ 'देवीशतका'वर कैय्यटाने इ. ९९७ च्या जवळपास व्याख्या लिहिली. इतकेच काय तर राजशेखराने, ज्याचा काळ ९व्या शतकाचा शेवट व १०व्या शतकाचा आरंभ आहे, आनंदवर्धनांच्या नावाचा व मतांचा स्पष्ट उल्लेख केला आहे.

**आनंदवर्धनाच्या रचना**

आनंदवर्धनाचे खालील चार ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

१) देवीशतक - त्रिपुरसुंदरीवरील स्तुतिपर काव्य

२) अर्जुनचरित - अर्जुनाच्या शौर्याचे वर्णन करणारे महाकाव्य

३) विषमबाणलीला - मदनाच्या लीला वर्णन करणारे प्राकृत काव्य

४) ध्वन्यालोक - ध्वनिसिद्धांतावरील ग्रंथ

**ध्वन्यालोक-ग्रंथस्वरुप**

ध्वन्यालोक ग्रंथामुळे आनंदवर्धनांची कीर्ती अजरामार झाली. काव्यशास्त्राच्या इतिहासात हा ग्रंथ युगप्रवर्तक सिद्ध झाला आहे. काव्यशास्त्रात त्याचे तेच स्थान आहे जे व्याकरणामध्ये पाणिनीच्या सूत्रांना किंवा वेदान्तामध्ये ब्रह्मसूत्रांना आहे. ह्या ग्रंथातून ग्रंथकाराचे प्रौढ पांडित्य व सूक्ष्म दृष्टी प्रकट होते. त्यांची शैली प्राञ्जल तशीच भावपूर्ण आहे. प्रत्येक पानापानातून श्रेष्ठता प्रकट होते.

ध्वन्यालोक ग्रंथाला काव्याशास्त्रीय सिद्धांतांचा प्रतिष्ठापक ग्रंथ म्हणता येते. जसे पं. जगन्नाथाचे रसगंगाधरमध्ये म्हटले आहे,

**ध्वनिकृतामालङ्कारिकसरणि व्यवस्थापकत्वात्।**

ह्या ग्रंथाचे तीन भाग आहेत.

प्रथम भागात कारिका आहे. त्यांची संख्या १२९ आहे. द्वितीय भागात वृत्ती आहे, तिच्यात कारिकांवर विस्तृत व्याख्या केली आहे. तृतीय भागात उदाहरणे येतात, जे अधिकांश प्राचीन कवींच्या काव्यातून घेतले आहेत.

ध्वन्यालोक चार उद्योतांमध्ये विभागला आहे. प्रथम श्लोक शार्दूलविक्रीडित आहे. चतुर्थ व षष्ठ उपजाति तसेच १३वा आर्या वृत्तात आहे. तृतीय उद्योतात चार आर्या आहेत. ह्याशिवाय प्रथम तीन उद्योतातील सर्व श्लोक अनुष्टुप आहेत. चतुर्थ उद्योतात फक्त १७ कारिका आहेत. शेवटच्या कारिकेतील श्लोक क्रमशः रसोद्धता मालिनी व शिखरिणी छंदात आहेत.

ध्वन्यालोकाच्या प्रथम उद्योतामध्ये ध्वनिसंबंधी विविध मतांचा परिचय दिला आहे.

कोणाचे मत असे की ध्वनि नामक कोणती वस्तू नाहीच.

अन्य विद्वानांनी ध्वनिचा लक्षणेत अंतर्भाव केला.



काहींच्या मते ध्वनिचे लक्षण शब्दांनी करता येत नाही, तो केवळ रसिकांचा आस्वाद विषय आहे.

काव्याचे दोन अर्थ होतात, वाच्य व प्रतीयमान.

वाच्यार्थ आलंकारिक भाषेत प्रकट केला जातो व सर्वगम्य असतो. प्रतीयमान अर्थ एखाद्या लावण्यवतीच्या लावण्याप्रमाणे असतो जो शरीर तसेच आभूषणांपेक्षा पूर्णपणे भिन्न असतो.

प्रतीयमान अर्थाचे तीन भेद आहेत. वस्तू, अलंकार आणि रस. ह्या तिघांचे पुन्हा अनेक भेद आहेत. ह्या प्रतीयमान अर्थाला केवळ व्याकरण किंवा कोषाचे ज्ञान असणारे जाणू शकत नाही, तर त्याला काव्यमर्मज्ञच जाणू शकतात. प्रतीयमान अर्थच काव्यात प्रधान असतो. ज्या काव्यात व्यंग्य अर्थ प्रधान असतो त्याला ध्वनिकाव्य म्हणतात.

समासोक्ति, आक्षेप, पर्यायोक्त इ. अलंकारात व्यंग्य अर्थाचे अस्तित्व असून सुद्धा वाच्य अर्थ प्रधान असतो. म्हणून त्यांना ध्वनिकाव्य म्हणता येत नाही.

ध्वन्यालोकाचे तीन भाग आहेत, कारिका, वृत्ती आणि उदाहरणे. ह्यातील उदाहरणे संस्कृतच्या प्रथितयश कवींच्या प्रसिद्ध ग्रंथांतून घेतली आहेत. परंतु कारिका आणि वृत्तीचे लेखन एकाच कवीच्या लेखणीतून उतरले आहे की ह्याचे लेखन दोन भिन्न भिन्न व्यक्तींनी केले आहे, हा मोठा विवादाचा विषय आहे.

आलंकारिकांची परंपरा आनंदवर्धनांनाच कारिका व वृत्तीचे रचयिता मानते. परंतु ध्वन्यालोकाची टीका 'लोचन'मध्ये असे काही निर्देश निश्चित प्राप्त होतात ज्यामुळे कारिकाकार व वृत्तीकार यांच्यात पृथकतेचा आभास होतो. अभिनवगुप्ताने वृत्तीग्रंथाला कारिका ग्रंथापेक्षा वेगळा मानला आहे आणि वृत्तिकारासाठी ग्रंथ आणि कारिकाकारासाठी मूळ 'ग्रंथकृत' शब्दाचा प्रयोग केला आहे. ह्याच आधारावर डॉ. काणे आणि डॉ. एस. के. डे ह्यांनी कारिकाकार आणि वृत्तिकाराला भिन्न व्यक्ती मानले आहे. परंतु कारिकाकाराचे नाव अज्ञात आहे. डॉ. काणे ह्यांनी कारिकाकाराचे नाव 'सहृदय' सांगितले आहे. परंतु पूर्वीच्या आलंकारिकांनी कारिका आणि वृत्तीच्या रचयितांमध्ये कोणत्याही

प्रकारे भेद न मानता आनंदवर्धनांनाच दोन्ही कारिका आणि वृत्तीचा निर्माता मानले आहे.

राजशेखराने आनंदवर्धनांच्या मताचा उल्लेख करतेवेळी एक श्लोक उद्धृत केला आहे, जो ध्वन्यालोकाच्या वृत्तीमध्ये उपलब्ध होतो. राजशेखराने आनंदवर्धनांनाच ध्वनिचा प्रतिष्ठाता मानले आहे. त्याचा परिचय या श्लोकात मिळतो.

**ध्वनिनातिगम्भीरेण काव्यतत्त्वनिवेषिणा**
**आनन्दवर्धनः कस्य नासीदानन्दवर्धनः।**

कुन्तकाने सुद्धा वृत्तिकाराला ध्वनिकार नावानेच निर्देशिले आहे. त्यांनी आनंदवर्धनाचे एक पद्य रूढी शब्दवक्रतेचे उदाहरण देऊन स्पष्ट केले आहे.

**ध्वनिकारेण व्यंग्यव्यञ्जकभावोऽत्र सनुरां**
**समर्थितः किम् पौनरुकत्येन।।**

म्हणून कुंतकाच्या मतानुसार आनंदवर्धनच ध्वनिकार सिद्ध होतात.

माहिमभट्टाची मान्यता सुद्धा ह्याच मताला पुष्टी देते. त्यांनी 'व्यक्तिविवेका'त ध्वन्यालंकाराच्या कारिकांचा तसेच वृत्तिभागांना अनेक ठिकाणी उद्धृत केले आहे आणि त्यांचे रचयिता म्हणून सर्वत्र ध्वनिकाराच्या नावाचाच निर्देश केला आहे.

क्षेमेन्द्र, जे अभिनवगुप्ताचे साहित्यशास्त्राचे साक्षात शिष्य होते तसेच काश्मीरी पंडितांच्या परंपरेला अवगत होते, ते सुद्धा औचित्य विचार चर्चेत ध्वन्यालोकाच्या कारिकांना आनंदवर्धनाच्या नावानेच उद्धृत करतात.

हेमचन्द्र सुद्धा ध्वन्यालोकाच्या कारिकांना आनंदवर्धनाचीच रचना मानतात. तसेच विश्वनाथ कविराजाने सुद्धा वृत्तिलेखकाचा ध्वनिकार नावानेच उल्लेख केला आहे.

इतकी प्रौढ परंपरा असल्यामुळे कारिका तसेच वृत्ती लेखकांमध्ये भेद मानणे न्यायसंगत होणार नाही.

**ध्वन्यालोकाचा काळ**

आनंदवर्धनाचा तिथीनिर्णय करणे संशयग्रस्त नाही. राजशेखराने (इ. ५३४) म्हटले आहे,



**मुक्ताकरणः सिवस्वामी कविरानन्दवर्धनः।**
**प्रथां रत्नाकरश्चागात्साम्राज्येवन्तिवर्मः।।**

ह्यावरून असे लक्षात येते की आनंदवर्धनाने कविच्या रुपाने काश्मिर नरेश अवन्तिवर्मन (८५५-८८३ इ.) च्या राज्यात प्रसिद्धी मिळविली होती. अन्य प्रमाणांनी सुद्धा ह्यात तिथीचे समर्थन होते. त्याने उद्भटाचा निर्देश केला आहे. म्हणून त्याला ८व्या शतकानंतर मानावे लागते तर राजशेखराने (९००-९२५ इ.) त्याचा निर्देश केला आहे. म्हणून आनंदवर्धनाचा काळ ८६०-८९० चा मध्य मानावा लागेल.

ध्वनि दोन प्रकारचा असतो.

**अविवक्षितवाच्य** - जेथे वाच्य अर्थाचा बोध अभिप्रेत नाही किंवा जेथे शाब्दिक अर्थाची अपेक्षा असत नाही.

**विवक्षितान्यपरवाच्य** - जेथे वाच्य अर्थ प्रतीत असूनसुद्धा कोणत्या तरी अन्य अर्थाचा बोध करतो. ध्वनिचा भक्तीत (लक्षणेत) समावेश होऊ शकत नाही आणि ध्वनिचे लक्षणासुद्धा करता येत नाही.

द्वितीय उद्योतामध्ये अविवक्षितवाच्याचे दोन भेद केले आहेत. एक, अर्थान्तरसंक्रमित वाच्य व दुसरा, अत्यंत तिरस्कृत वाच्य.

त्यांची उदाहरणे दिली आहेत.

**तदा जायते गुणा यदा ते सहृदयैर्गृह्यन्ते**
**रविकिरणानुग्रहीतानि भवन्ति कमलानि कमलानि।**

'कमलानि' अर्थान्तरसंक्रमितवाच्य आहे.

**रविसंक्रान्तसौभाग्यस्तुषारावृत्तमण्डलः**
**निःश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते।**

इथे 'अन्ध' अत्यंत तिरस्कृत वाच्य आहे.

ह्याप्रकारे विवक्षितान्यपरवाच्याचे दोन भेद होतात-

असंलक्ष्यक्रमव्यंग्य व संलक्ष्यक्रमव्यंग्य.

रस, भाव, रसाभास, भावाभास तसेच भावप्रशमच्या प्रधानतेमुळे असंलक्ष्यक्रमव्यंग्यांचे अनेक प्रकार होतात. जेथे रस, भाव इ. प्रधान आहेत आणि वाच्य अर्थ मुख्य आहे तेथे रसवर इ. अलंकार होतात.

ह्यानंतर गुण व अलंकारातील परस्पर भेदाचे निरुपण आहे. माधुर्य, ओज व प्रसाद ह्या तीन गुणांचे विवेचन केले आहे.

असंलक्ष्यक्रम व्यंग्याची अभिव्यक्ति वर्ण, पद, वाच्य, संघटना तसेच प्रबन्धाद्वारा होते. तीन प्रकारची संघटना- असमासा, मध्यमसमासा, दीर्घसमासा.

संघटनेचा आधार वक्ता, अर्थ, विषय तसेच रसाची अनुरूपता आहे. रसाची अभिव्यक्ती तसेच चर्वणेचे प्रकार.

विभिन्नरसांचे सहायक अलंकार, कथावस्तु तसेच तिचा रसाशी संबंध.

असंलक्ष्यक्रमाची विभक्ती, क्रियापद, कृत, तद्धिम तसेच समास द्वारा अभिव्यक्ति व त्यांचे उदाहरण.

रसाभिव्यक्तिच्या विरोधी तत्त्व.

काव्यामध्ये एक रस प्रधान असावा, दुसरे त्याचे सहायक.

वाच्य आणि गम्य अर्थामध्ये परस्परभेदाचे विवेचन.

गुणवृत्ती आणि व्यङ्ग्यामध्ये भेद.

व्यंग्यव्यञ्जकभाव आणि अनुमानामध्ये भेद.

गुणीभूतव्यङ्ग्यनामक काव्याच्या द्वितीय प्रकाराचे निरुपण. ह्यामध्ये व्यंग्य असूनही वाच्यअर्थ अधिक चमत्कृतिपूर्ण असतो. गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण.

चित्रनामक काव्याच्या तृतीय भेदाचे निरुपण त्याचे दोन भेद आहेत. शब्दचित्र (यमक आदि), वाच्यचित्र (उत्प्रेक्षा आदि)

जेथे कवीचा उद्देश्य व्यंग्य अर्थ किंवा अलंकार आदि प्रकट होत नाही तेथे चित्रकाव्य होते.

काव्याच्या ह्या तीन भेदांच्या मिश्रणाने अनेक प्रभेद होतात.

**कैशिकी आदि रीति तसेच उपनागरिक आदि वृत्तिंचे निरुपण**

ध्वनि तसेच गुणीभूतकाव्यामध्ये कवीची प्रतिभा सदैव नूतन चमत्कार प्रकट करीत असते. साधारण वस्तू सुद्धा कवीच्या कल्पनेच्या चमत्कारामुळे नवीन भासते. कवीने त्याच्या रचनेत प्रामुख्याने एकाच रसावर केंद्रित व्हावे.





रामायणात प्रधानरस करुण आहे. महाभारत शास्त्र आणि काव्य दोन्ही आहे. त्याचा प्रधान रस शांत आहे. अनेक शतकांपासून हजारो कवी काव्यरचना करतात तरीसुद्धा कवितेचे क्षेत्र असीम आहे. प्रतिभाशाली कवींच्या रचनांमध्ये साम्य दिसून येते. हे साम्य तीन प्रकारचे असते.

१) बिम्ब-प्रतिबिम्ब समान

२) वस्तु व वस्तुच्या चित्रासमान

३) परस्पर दोन मनुष्यांच्या समान

प्रथम दोन प्रकारचे साम्य हेय आहे परंतु तृतीय प्रकारात आकर्षण असते.

ध्वन्यालोकात संस्कृत व स्वरचित प्राकृत श्लोक प्रचुर स्वरुपात उदाहरणरुपात उद्धृत केले आहेत. काही ठिकाणी परिकर श्लोक पण दिले आहेत.

**परिकरार्थं कारिकार्थस्याधिकावाणं कर्तुं श्लोकः परिकरश्लोकः।**

वृत्तिच्या अन्तर्गत मूळाची व्याख्या किंवा विस्तार करणारा श्लोक म्हणजे परिकर श्लोक.

**व्याकरणस्य शरीरं परिनिष्ठितशास्त्रकार्यमेतावत्**

**शिष्टः परिकरबन्धः क्रियतेऽस्य ग्रन्थकारेण।**

जल्हणाच्या सूक्तिमुक्तावलिमध्ये राजशेखराच्या नावाने एक श्लोक उद्धृत केला आहे. त्यात म्हटले आहे की, आनन्दवर्धनाने ध्वनि नामक ग्रंथाद्वारा काव्याच्या मूलतत्त्वांची स्थापना केली. तो श्लोक असा,

**ध्वनिनातिगभीरेण् काव्यतत्त्वनिवेशिना।**

**आनन्दवर्धनः कस्य नासीदानन्दवर्धनः।।**

ध्वनिसिद्धांताची सर्वांगीण शास्त्रीय चर्चा सर्वप्रथम आनंदवर्धनाने ध्वन्यालोक ग्रंथात केली आहे. भरत-भामहापासून रुद्रटापर्यंतच्या काळात हळूहळू मार्ग क्रमित असलेल्या काव्यमीमांसेला त्याने विद्युत्वेगाने प्रगतिशिखरावर नेऊन पोचविले. त्यामुळे संस्कृत काव्यसास्त्राच्या इतिहासात आनंदवर्धन हा महान युगप्रवर्तक समजला जातो. त्याने वाच्य व लक्ष्य या पूर्वप्रसिद्ध अर्थांहून भिन्न असा व्यंगार्थाची अथवा ध्वन्यर्थाची प्रतिष्ठापना

अनेक प्रमाणांनी केली आणि या ध्वनीच्या निकषांवर सर्व काव्यांगांचा पुनर्विचार केला आहे.

'काव्यस्यात्मा ध्वनिः।' काव्याचा आत्मा ध्वनि होय, असे सांगून त्याने काव्यातील त्याच्या श्रेष्ठ, कनिष्ठ स्थानानुसार काव्याचा श्रेष्ठ-कनिष्ठ क्रम दाखवून दिला. काव्यमीमांसेच्या क्षेत्रातील त्याचे हे स्थान लाखमोलाचे समजले जाते. वेदान्तशास्त्रात जे स्थान शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्र भाष्याला आहे, तेच स्थान काव्यमीमांसाशास्त्रात ध्वन्यालोकाला आहे असे या क्षेत्रातील जाणकारांचे म्हणणे आहे.

प्रा. अर्जुनवाडकर आणि प्रा. मंगरूळकर यांनी काव्यप्रकाशाच्या उपन्यासात आनंदवर्धनाच्या ध्वन्यालंकाराचे स्वरूप विशद केले आहे, ते असे. (हा परिच्छेद येथे अप्रस्तुत वाटतो)

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या उद्योतात ग्रंथकाराने आपले विवेचन 'काव्यस्यात्मा ध्वनिः।' या प्रतिज्ञेने आरंभिले असून, ध्वनी अर्थात व्यंगार्थ या तत्त्वाविषयीच्या विविध आक्षेपांचा सविस्तर परामर्श घेतला आहे आणि ध्वनीचे स्वतंत्र अस्तित्व आणि विवेचनक्षमत्व प्रस्थापित केले आहे.

दुसऱ्या उद्योतात ध्वनीच्या अर्थात व्यंगप्रधान काव्याच्या प्रकारांचे निरूपण केले आहे. हे प्रकार वाच्यार्थ-व्यंगार्थ संबंधाच्या दृष्टीने केलेले आहेत.

तिसऱ्या उद्योतात प्रथम ध्वनिप्रकारांचेच निरूपण आहे. पण हे प्रकार व्यंजकाच्या अर्थात पदवाक्यादिकांच्या दृष्टीने केले आहेत. यापुढे ध्वनीच्या अस्तित्वाचा सविस्तर उहापोह केला असून या बाबतीत उद्भवणाऱ्या आक्षेपांचे युक्तिवादपूर्वक निराकरण केले आहे. ध्वनिकाव्याचे हे सर्व प्रकार आणि त्यांच्या अनुषंगाने आलेली चर्चा संपल्यावर गुणीभूत व्यंग्य आणि चित्र हे काव्याचे विशिष्ट मुख्य भेद निरूपिले आहेत आणि प्रस्तुत व्यवस्थेत रीतीवृत्तीचे स्थान काय, हे विशद केले आहे.

चौथ्या उद्योतात विषय जुनेच असले तरी कविप्रतिभेच्या आणि काव्यविषयांच्या अनंततेमुळेच काव्याला नित्यनवीनता कशी येते, एका काव्याचे दुसऱ्या काव्याशी कशा प्रकारचे सादृश्य असावे, नसावे याचा विचार करून ग्रंथाचा उपसंहार केला आहे.



ध्वन्यालोकाचे हे स्वरूप पाहिल्यावर एक गोष्ट स्पष्ट होते की काव्याच्या सर्व अंगांना एकत्र बांधणारे आणि त्याचबरोबर काव्याचे मूल्य निर्धारित करणारे असे एक व्यापक तत्त्व प्रतिपादन करण्यासाठी हा ग्रंथ जन्माला आला आहे.

आनंदवर्धनाचे नाव साहित्यशास्त्राच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिण्याच्या योग्यतेचे आहे. त्यांनी ध्वन्यालोक लिहून ह्या शास्त्राच्या सिद्धांतांना सदैव प्रकाशित केले आहे. ध्वन्यालोक नवीन युगाचा उत्पादक ग्रंथ आहे. अलंकारशास्त्रात त्यांचे तेच स्थान आहे जे वेदांतामध्ये वेदान्तसूत्राचे आहे. त्याच्या प्रत्येक पानावर ग्रंथकाराची श्रेष्ठता, सूक्ष्म विवेचनशक्ती व गूढ विषय ग्रहणक्षमता यांची ओळख होते. रसगंगाधराचे विधान अत्यंत उचित आहे की ध्वनिकाराने साहित्यशास्त्राचा मार्ग परिष्कृत केला.

**ध्वनिकृताम् आलंकारिकसरणि व्यवस्थापकत्वात्।**

आनंदवर्धनांची लेखनशैली अत्यंत प्रौढ, विद्वत्तापूर्ण व रोचक आहे. ते स्वतः कवी पण होते. त्यांनी अर्जुनचरित, विषमबाणलीला तसेच देवीशतक यांसारख्या सरस काव्यांची रचनापण केली आहे, परंतु आनंदवर्धनांची कीर्ती ध्वन्यालोकावरच अवलंबून आहे.

राजशेखराचे हे विधान योग्यच आहे की,

**ध्वनिनातिगभीरेण काव्यतत्त्वनिवेशिना**<br>
**आनन्दवर्धनः कस्य नासीदानन्दवर्धनः।**

✻ ✻

.८.

# राजशेखर

संस्कृत साहित्य समीक्षकांमध्ये राजशेखराचे नाव अत्यंत आदराने घेतले जाते. विक्रम संवत्सर ९, १० आणि ११ व्या शतकाचा काळ हा संस्कृत वाङ्मयामध्ये अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. ह्या तीन शतकांमध्ये संस्कृत वाङ्मयातील विभिन्न शाखांमध्ये सूक्ष्मरुपाने व्याप्त आणि विस्तृत विवेचन, समीक्षण आणि परीक्षण केले गेले. अनेक विद्वान ह्या तीन शतकांना काव्यशास्त्राच्या निर्मितीचा काळ मानतात. ह्याच काळात आनंदवर्धन, अभिनवगुप्त, क्षेमेन्द्र, मम्मट, राजशेखर इ. अनेक विद्वानांनी रस, ध्वनि, अलंकार आणि रीती इ. अनेक विषयांवर गंभीर विवेचन करून संस्कृत साहित्याची शोभा वाढविली. ह्या शतकांच्या समाप्तीसह मौलिक संशोधनाचा सुद्धा शेवट झाला.

राजशेखर याच युगातील एक देदीप्यमान नक्षत्र होत. ते एक सिद्धहस्त नाटककार, प्रौढ महाकवी, गंभीर मीमांसक आणि चतुरस्त्र विद्वान होते.

**जीवनवृत्त**

अधिकांश संस्कृत कवींच्या तुलनेत राजशेखराने स्वतःच्या जीवनाचा परिचय विस्ताराने दिला आहे. त्यावरून असे दिसून येते की राजशेखराचे पूर्वज महाराष्ट्रीय होते. 'बालरामायण' नावाच्या नाटकात त्याने 'अकालजलद' नावाच्या व्यक्तीपासून स्वतःला चवथ्या पिढीचे म्हटले आहे आणि अकालजलदाला त्याने 'महाराष्ट्र चूडामणी' म्हटले आहे.

**तदा मृण्यायणस्य महाराष्ट्र चूडामणेरकालजलदास्य चतुर्थो दैर्दुकिः शीलवतीसूतरुपाध्यायं श्री राजशेखर इत्यपर्याप्तं बहुमाने।** (बालरामायण १.१३)

राजशेखराने दिलेल्या माहितीनुसार त्याच्या पित्याचे नाव दुर्दुक (दुहिक) आणि आईचे नाव शीलवती होते. बालरामायणात असे सांगितले आहे की राजशेखराच्या यायावर कुळात अकालजलद, सुरानंद, तरल, कविराज इ. महान व्यक्तींनी जन्म घेतला.



बालरामायण (१.१६) आणि बालभारत (१.१२) मध्ये एक समान पद्य उपलब्ध आहे. त्यानुसार राजशेखराने तो स्वतः पूर्वजन्मात वाल्मीकि, श्रेष्ठ आणि भवभूती असल्याचा दावा केला आहे.

**बभूव वल्मीकभवः कवि पुरा ततः प्रपेदे भुवि भर्तृमेष्ठताम्।**
**स्थितः पुनर्यो भवभूतिरेखया स वर्तते संप्रति राजशेखरः।।**

(बालरामायण १.१६, बालभारत १.१२)

प्रचण्ड पाण्डव किंवा बालभारत नाटकाच्या प्रस्तावनेत उल्लेख आला आहे की राजशेखर एका मोठ्या मंत्र्याचे पुत्र होते.

**उक्ते हितेनैव महासुमन्त्रिपुत्रेण यशः प्रसूते।**
**विपदोरुणद्धि यशांसि दुग्धे मलिनं प्रमाष्टि।। (१.९)**

त्यांची पत्नी अवन्तिसुन्दरी ही चहुआण (चव्हाण) कुलोत्पन्न कन्या होती. ती एक सुशील नारी होती आणि राजशेखराने तिच्या मतांचा काव्यमीमांसेत उल्लेख केला आहे. तिच्या इच्छेमुळे राजशेखराचे प्राकृत नाटक (शाटक) कर्पूरमंजरीचा रंगमंचावर अभिनय झाला. बालरामायणात तिच्या रचनांचा उल्लेख आहे. ह्यावरून हे स्पष्ट होते की बालरामायणाची रचना त्याने प्रौढावस्थेत केली. कर्पूरमंजरीत असा पण उल्लेख आला आहे की मृगाङ्कलेखाचा रचयिता आपराजिताने त्याचा बालकवी, कविराज तसेच राजा निर्भयचे राजगुरु असा उल्लेख केला आहे. ह्याप्रकारे राजशेखराने एकामागोमाग एक प्रतिष्ठित पदे प्राप्त केली. पहिल्या अध्यायाच्या शेवटी त्याने स्वतःला यायावरीय म्हटले आहे. त्याने कवींवर उपकार करण्यासाठी मुनीमतांचा संग्रह करून त्याची व्याख्या करीत काव्यमीमांसा ग्रंथाची रचना केली. त्यामुळे काव्यमीमांसा व चार नाटकांचा रचयिता राजशेखर आहे ह्यात संशय नाही.

कर्पूरमंजरीवरून असे स्पष्ट होते की राजशेखर राजा महेन्द्रपालचे गुरु होते. 'रघुकुलतिलको भरेन्दरपालः सकलकलानिलय स यस्य शिल्पः।' बालरामायणाचे प्रथम वाक्य तसेच बालभारताच्या (१.६) या एकाच पंक्तीवरून हे स्पष्ट होते की हे नाटक राजा महेन्द्रपालाच्या महोदय (कनौज) स्थित राजदरबार विद्वन्मंडलीमधेय सादर झाले होते.

बालभारतात (१.७) राजा महीपालाचा उल्लेख येतो. ह्यानंतर आलेल्या

गद्यांशावरून असे स्पष्ट होते की महीपाल निर्भयराजाचे पुत्र होते आणि ते आर्यावर्ताच्या विन्ध्याचल किंवा नर्मदेच्या उत्तरभागाचे सम्राट होते. त्याचबरोबर असा पण उल्लेख आहे की महेन्द्रपाल राजशेखरांचा शिष्य होता. (बालभारत १.११)

ह्यावरून हे स्पष्ट होते की राजशेखरांच्या परिवाराने महाराष्ट्र सोडला आणि राजशेखर स्वतः महोदय (कनौज कान्यकुब्ज) मध्ये स्थायिक झाले.

राजशेखर अनेक भाषा जाणत होते. पण त्यांना प्राकृत भाषेविषयी प्रेम होते. कर्पूरमंजरीत (१.७) त्याला 'सर्वभाषाचतुर' म्हटले आहे. सूत्रधाराच्या अनुचराने राजशेखराची एक उक्ती उद्धृत केली आहे. त्यात म्हटले आहे की ज्या भाषेत प्रभावित करण्याची शक्ती असते त्या भाषेत काव्यरचना करणे शक्य असते. संस्कृत शब्दांच्या प्राकृत रुपांतराने मूळ संस्कृत प्रमाणेच अर्थ निघत असल्यामुळे त्यात रचना करणे शक्य आहे.

राजशेखराला एकच पद्य दोन नाटकांमध्ये उद्धृत करण्याची आवड होती. उदा.- बालरामायणातील आत्रवार्तिहरः (१.१८) हा श्लोक बालभारतात (१.१८) ह्याच रुपात मिळतो. तसेच बालरामायणाचा (१.२०) प्रथयति हा श्लोक बालभारतात (१.१४) ह्याच रुपात मिळतो.

**राजशेखराचा काळ**

राजशेखराचा काळ निश्चित करण्यात इतर संस्कृत कवींप्रमाणे कठीण जात नाही. कारण राजशेखराने स्वतः आपल्या नाटकांच्या प्रस्तावनेत स्वतःला कनौजचा राजा महेन्द्रपालचा गुरु म्हटले आहे आणि स्वतःच्या बालभारत ह्या शेवटच्या नाटकात राजा महेन्द्रपालचा पुत्र महीपालाची स्वतःचा संरक्षक असल्याची नोंद केली आहे. महेन्द्रपालाचेच नाव 'निर्भयराज' असेही होते असे राजशेखराने 'कर्पूरमंजरीत' लिहिले आहे. यावरून असे सिद्ध होते की ते महेन्द्रपाल आणि महीपाल या दोघांशीही संबंधित होते.

अनेक ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे विद्वानांनी ह्याचा काळ इ.स. ८९०-९०८ किंवा इ.स. ९०८-९४० पर्यंतचा मानला आहे. राजशेखराने रुद्रटाचा काव्यालंकार, आनंदवर्धनाची वृत्ती, उद्भटाचा संप्रदाय आणि वामनाच्या संप्रदायाचा उल्लेख केला आहे. त्यामुळे त्याचा काळ निश्चितच



इ. ८७५ नंतरचा आहे.

इ. ९५९-६० मध्ये रचलेल्या यशस्तिलकाच्या चतुर्थ आश्वासात अनेक कवींचा उल्लेख आहे. त्यात राजशेखराचा उल्लेख आहे. इ. १००० मध्ये रचित धनपालाच्या तिलकमंजरीत यायावरांच्या पद्याशांची प्रशंसा केली आहे. ती अशी,

**समाधिगुणशालिन्यः प्रसन्नपक्त्रिमाः।**
**यायावर कवेर्वाचोमुनीनामिव वृत्तयः।।** (पद्य ३३)

राजशेखराचा उल्लेख क्षेमेन्द्र, सोमदेव व सोढवलाने केला आहे. त्यांचा काळ इ. १०४०-६० आहे. मंख कवीने श्रीकंठचरितमध्ये सुद्धा राजशेखराची चर्चा केली आहे. अभिनव गुप्त आणि मम्मट सुद्धा राजशेखराच्या नाटकातील पद्य उद्धृत करतात.

ह्या सर्व बाबींवरून राजशेखराचा काळ ९व्या शतकाची शेवटची दोन दशके आणि १०व्या शतकाची प्रारंभिक तीन दशके असा मानला जातो.

**राजशेखराचे पांडित्य**

राजशेखराला लहानपणापासून काव्यकला अवगत होती. त्यामुळे त्याला 'बालकवी' अशी पदवीही मिळाली होती. त्या काळात कनौजच्या प्रतीहारांचे साम्राज्य भरभराटीला आले होते. महेंद्रपाल हा त्याच्या काळात प्रतीहार सम्राट होता. राजशेखर आपले नशीब काढण्यासाठी त्याच्या आश्रयाला गेला. राजशेखराची विद्वत्ता समजल्यावर महेंद्रपालाने त्याला आपला गुरु केले. तेथेच त्याला 'कविराज' ही पदवी मिळाली. महेंद्रपालानंतर त्याचा पुत्र महिपाल याच्या दरबारात राहून राजशेखराने बरीच ग्रंथरचना केली.

इ.स. ९१९ च्या सुमारास राष्ट्रकूट राजा इंद्र (तिसरा) याने कनौजवर स्वारी केली व ते नगर उद्ध्वस्त केले. या पराजयानंतर प्रतीहारांच्या साम्राज्याला उतरती कळा लागली. म्हणून राजशेखर पुनश्च त्रिपुरी येथे युवराजदेव (पहिला) या कलचुरी राजाच्या आश्रयाला आला. तेथेच त्याने 'काव्यमीमांसा' या बृहद्ग्रंथाच्या रचनेला प्रारंभ केला.

राजशेखराचे पांडित्य काव्यक्षेत्रात उठून दिसणारे होते. त्याला स्वतःलाही या गोष्टीची जाणीव होती. बालरामायणात त्याने स्वतःबद्दल गौरवाने

लिहिले आहे.

**बभूववल्मीकभवः कविःपुरा ततः प्रपेदे भुवि भर्तुमेष्ठताम्,**
**स्थितः पुनर्यो भवभूतिरेखया स वर्तते संप्रति राजशेखरः।।**

मी पुरातन काळी वाल्मीकि होतो. नंतर भर्तुमेष्ठ नावाने पृथ्वीवर आलो. त्यानंतर पुनश्च भवभूतीच्या आकाराने राहिलो आणि तो मी सांप्रतकाळी राजशेखर या नावाने जन्माला  आलो आहे.

यावरून राजशेखराने वाल्मीकि रामायणाचे, भर्तुमेष्ठाच्या हयग्रीववधाचे व भवभूतीच्या नाटकांचे सखोल अध्ययन केले होते, असे लक्षात येते. तो स्वतःला महाकवी न म्हणता ‘कवीराज’ म्हणतो. त्याने ह्या दोहोंची लक्षणे काव्यमीमांसेत दिली आहेत. ती अशी.

‘जो केवळ एकाच प्रकारच्या प्रबंधात प्रवीण असतो त्याला महाकवी म्हणतात आणि जो सर्व भाषा, सर्व प्रबंध आणि भिन्न भिन्न रसांमध्ये आत्मतंत्र असतो त्याला ‘कविराज’ म्हणतात.’ महाकवीपेक्षा कविराज श्रेष्ठ असतो आणि जगात कविराज विरळाच असतो.

**राजशेखराच्या रचना**

राजशेखर खरोखर कविराज होता. संस्कृत, प्राकृत, पैशाची व अनेक अपभ्रंश भाषा यांमध्ये त्याची निराबाध गती होती. या सर्व भाषांमध्ये तो लीलेने काव्यनिर्मिती करीत असे. राजशेखराने बालरामायणात स्वतः रचलेल्या सहा प्रबंधांचा निर्देश केला आहे.

**यद्यस्ति स्वस्ति तुभ्यं भव पाठ न रुचिर्विद्धि नः षट् प्रबन्धान्।**

यामध्ये एक भुवनकोशाचे नाव ते स्वतः लिहितात. परंतु इतर ग्रंथामध्ये उद्‌धृत उदाहरणांवरून त्याचे एक काव्य ‘हरविलास’ सुद्धा मानले जाते. काव्यमीमांसेच्या १७व्या अध्यायात भारतवर्षाचा संक्षिप्त भूगोल दिला आहे. ह्यातच कवी स्वतःद्वारा रचित भुवनकोशाचा उल्लेख करतो. परंतु हा प्रबंध स्वतंत्ररुपाने उपलब्ध नाही. काही विद्वान ह्या अध्यायालाच भुवनकोश मानतात. त्यामुळे त्याच्या सहा रचनांची संगती लागते.

१) **बालरामायण** – हे १० अंकी नाटक असून सीता–स्वयंवरापासून रावणवधापर्यंतची रामकथा यात येते. ह्या नाट्यरचनेत कवीने आपले सर्व





काव्यचातुर्य व पदविन्यासकौशल्य प्रकट केले आहे.

२) **बालभारत** – हे नाटक असून याचे फक्त दोनच अंक उपलब्ध आहेत. याचे दुसरे नाव ‘प्रचंड पांडव’ असे आहे. यात द्रौपदी स्वयंवर, द्यूत व वस्त्रहरण या तीन घटनांचे वर्णन आहे.

वरील दोन्ही नाटके महेंद्रपालाचा पुत्र महीपाल याच्या प्रेरणेने रंगभूमीवर आली होती.

३) **विद्धशालभंजिका** – ही चार अंकी नाटिका आहे. यात राजा विद्याधर मल्ल व राजकन्या मृगांकावली यांची प्रणयकथा वर्णिली आहे.

४) **कर्पूरमंजिरी** – हे ४ अंकांचे नाटक असून ते प्राकृत भाषेत लिहिल्यामुळे त्याला 'सट्टक' असे म्हणतात. यात राजा चंडपाल व कुंतक राजकन्या कर्पूरमंजरी यांची प्रणयकथा वर्णन केली आहे. या सट्टकात कवीने प्राकृत भाषेचे संपूर्ण माधुर्य ओतले आहे. पद्यासाठी महाराष्ट्री शौरसेनी प्राकृत उपयोजले आहे. यातील कर्पूरमंजरीच्या विरहप्रसंग वर्णनात त्याने एक श्लोक असा लिहिला आहे.

**परं जोव्हा उण्हा गरलसरितो चन्दणरसो**
**खतकखारो हारो रअणिपवणा देहतवणा**
**मृणाली बाणाली जलइच जलद्दा तणुलदा**
**वरिट्ठा जं दिट्ठा कमलवअना सा सुनअणा।**

अर्थ – जेव्हा ती कमलवदना व सुनयना कर्पूरमंजरी दृष्टिपथात आली तेव्हापासून चांदणे ताप देऊ लागले. चंदनरस विषवत् प्रतीत होऊ लागला. रात्रीचा गार वारा देह जाळू लागला. कमलतंतू बाणावलीसारखे तीक्ष्ण लागू लागले आणि जलाने भिजलेली तनुलताही जळू लागली.

५) **भुवनकोश** – या नावाचा भूगोल वर्णनात्मक एक ग्रंथ आपण रचला असल्याचे कवीने काव्यमीमांसेत सांगितले आहे. कवीला भूगोलाची आवड आणि भूगोलाचे बरेच ज्ञान होते असे दिसते. बालरामायणाच्या १०व्या अंकात भूगोलाची बरीच माहिती त्याने दिली आहे.

६) **काव्यमीमांसा** – राजशेखर विरचित काव्यमीमांसा हा ग्रंथ जरी काल्पनिक शैलीत लिहिला गेला आहे, यामध्ये कोणत्याही क्रमबद्ध सिद्धांतांचे प्रतिपादन

नाही, तरी सुद्धा विशेष उल्लेखनीय म्हणजे ह्यात कविशिक्षा आणि मुख्य काव्यशास्त्राचे विषय संयुक्तरुपाने मांडले आहेत. त्याचबरोबर विविधप्रकारच्या असंबद्ध विषयांचे निरुद्देश प्रतिपादन केले आहे.

हा ग्रंथ महत्त्वपूर्ण असण्याचे आणखी एक कारण म्हणजे ह्यात भिन्नभिन्न मतांचा अलगअलग संग्रह केला आहे. त्यामुळे त्या काळातील साहित्यिक पंथांवर प्रकाश पडला आहे. ह्यामध्ये प्रतिपादित दृष्टिकोनाचा कोणत्याही विशेष संप्रदायाशी प्रत्यक्ष संबंध दिसत नाही. कदाचित लेखकाने त्याला त्याच्या पूर्वजांकडून प्राप्त झालेल्या मतपरंपरांचेच अनुकरण केले असावे. म्हणून त्याचा उल्लेख त्याने 'यायावरीय' या रूपाने केला आहे.

राजशेखराने काव्यशास्त्राचा उद्‌गम स्वर्ग आणि ईश्वरीय विभूतीपासून सांगितला आहे. ह्याच्या रचनेसाठी त्यांना श्रेष्ठ दर्जाचे अनुशासन अपेक्षित आहे. त्याला त्याने सातवे 'अंग' मानले आहे. कारण त्याच्याशिवाय वैदिक ग्रंथांचे महत्त्व समजत नाही.

स्वजात श्रीकंठाने स्वेच्छेने उत्पन्न आपल्या ६४ शिष्यांना या विज्ञानाचा उपदेश केला. त्यामध्ये सर्वाधिक सन्माननीय काव्यपुरुष होते. ते सरस्वतीने उत्पन्न केले होते. ते ह्या अर्धउपदेशात्मक ग्रंथाचे नाममात्र नायक होते. प्रजापतीने त्यांना ह्या विज्ञानाचा विश्वात प्रचार व आख्यापन करण्यासाठी पाठविले होते. म्हणून त्याने ह्याची शिक्षा आपल्या १७ दैवी शिष्यांना, सहस्राक्ष तसेच अन्य लोकांना दिली. ह्या शिष्यांनी ज्या ज्या अंशाचे अध्ययन केले होते त्यावर त्यांनी वेगवेगळ्या १८ अधिकरणांची रचना केली. ग्रंथकाराने १८ अधिकरण असलेल्या एकाच ग्रंथात सर्व शिक्षांचा सारांश देण्याचा प्रयत्न केला आहे.

काव्यपुरुषापासून सर्वप्रथम छंदोबद्ध वाणी निर्माण झाली आणि तेच काव्याच्या आत्म्याचे प्रतीक मानले जाते. हिमालयावर दीर्घकाळ केलेल्या तपस्येच्या परिणामस्वरूप उत्पन्न झालेल्या काव्यपुरुषाला विद्यादेवी सरस्वतीचे पुत्र मानले जाते. पुत्राला संगती प्रदान करण्यासाठी सरस्वतीने त्याच्या वधूच्या रुपात साहित्यविद्येची निर्मिती केली. तिने त्यांचे अनुसरण केले आणि त्यांना आपल्याकडे आकर्षित केले.



ह्या सामान्य कल्पनेवर पुढे ह्या पुस्तकात ह्याचे विलक्षण सिद्धांत दिले आहेत आणि ह्याच्या स्वच्छंद विस्तारक्षेत्रात विविध प्रकारची साहित्यिक मते आणि रुढी सम्मिलित आहेत. ह्याचबरोबर ह्या ग्रंथात सामान्य भूगोल, कविसमय, ऋतुवर्णन, कविगोष्टींचे विवरण आणि अन्य संगत तसेच असंगत विषय यांचे वर्णन केले आहे.

काव्यमीमांसा हा साहित्यशास्त्रीय ग्रंथ आहे. हा अठरा विभागात पूर्ण करण्याचा राजशेखराचा मानस होता. पण त्याचा पहिला भागच तेवढा उपलब्ध असून तो १८ अध्यायांचा आहे. 'कविरहस्य' असे त्याने आपल्या पहिल्या भागाचे नाव ठेवले आङे. हा ग्रंथ अपूर्ण आहे असे म.म.पां.वा. काणे म्हणतात. ह्यामध्ये काव्यातील रस, गुण किंवा अलंकार यांचे विवेचन न करता कवींना मार्गदर्शक होतील अशा व्यावहारिक सूचनाच केल्या आहेत.

काव्यमीमांसा या ग्रंथाचे १८ अध्याय आहेत. प्रथम अध्यायाचे नाव 'शास्त्रसंग्रह' आहे. ग्रंथारंभ दार्शनिक शैलीत 'अथ' शब्दाने केला आहे. ग्रंथाचे प्रारंभिक शब्द आहेत 'काव्यमीमांसयिष्यामहे।' राजशेखराने आपल्या ग्रंथाच्या प्रथम अध्यायात अवान्तर प्रकरणांच्या विषयांची सूची दिली आहे. ह्याच अधिकरणात काव्यशास्त्राच्या विषयाचा निर्देश करून राजशेखराने त्याची प्रामाणिकता व उपादेयता सिद्ध केली आहे.

सुरुवातीला साहित्य (वाङ्‌मय) दोन भागात विभाजित केले आहे. एका भागाला शास्त्र (मानवीय आणि ईश्वरीय) आणि दुसऱ्या भागाला काव्य म्हणतात. ह्यात भिन्न शास्त्रांची संख्या सांगितली आहे आणि त्यांच्या प्रकृती तसेच रुपाची परिभाषा दिली आहे. ईश्वरीय शास्त्रामध्ये वेद, उपनिषद आणि ६ अंग येतात. द्वितीय अध्यायाचे नाव आहे 'शास्त्रनिर्देश'. ह्या अधिकरणात अलंकारशास्त्राला वेदाचे सातवे अंग सिद्ध केले आहे. तसेच त्याचे अपौरुषेयत्व सिद्ध केले आहे. वाङ्‌मयाचे दोन प्रकार पौरुषेय व अपौरुषेय मानून पौरुषेय वाङ्‌मयाच्या पद्धतीचे विस्तृत वर्णन केले आहे. काव्याच्या दोन्ही प्रकारांना वाङ्‌मयामध्ये मुख्य मानले आहे. सूत्र, भाष्य, वार्तिक, टीका, निवृत्ति, कारिका, पञ्जिका इ. ची सरल व्याख्या केली आहे. प्रसंगवश साहित्यविद्येची व्युत्पत्तिमूलक परिभाषा दिली आहे.

तिसऱ्या अध्यायाचे नाव 'पुरुषोत्पत्ती' आहे. ह्यामध्ये काव्यपुरुषाची उत्पत्ती, त्याचा विकास, रीती, वृत्ती, प्रवृत्ती इ. चे सरस वर्णन केले आहे आणि काव्यशास्त्राला दर्शनशास्त्रासमान परम पुरुषार्थ मोक्षाचे साधन सिद्ध केले आहे.

चतुर्थ अध्याय 'पदवाक्य विवेक' आहे. ह्यामध्ये कवीसाठी काव्यप्रयोजनाचे वर्णन तसेच विषय अधिकाऱ्याचे सुद्धा वर्णन आहे. शिष्यांची श्रेणी तसेच आलोचकांचे भिन्न प्रकार सुद्धा वर्णन केले आहेत. लेखकाने भिन्न प्रकारच्या शिष्यांचे वर्णन केले आहे. ज्याला शास्त्रज्ञान देता येते ते बुद्धिमान आणि आहार्यबुद्धीचे शिष्य असतात.

आहार्य बुद्धीचे दोन भदे होतात. अन्यथा बुद्धी आणि दुर्बुद्धी या संबंधात लेखकाने शक्ती, प्रतिभा, व्युत्पत्ती आणि अभ्यासाच्या बळाचे वर्णन केले आहे.

पाचव्या अध्यायात प्रतिभा आणि व्युत्पत्तीची सूक्ष्म मीमांसा केली आहे. कवींचे शास्त्रकवी, काव्यकवी आणि उभयकवी असे तीन स्तर केले आहेत.

यायावरीयांच्या मते शक्तीच काव्याचा स्त्रोत आहे आणि तिच्यापासूनच प्रतिभा आणि व्युत्पत्ति उत्पन्न होतात. परंतु काहींच्या मते समाधी आणि अभ्यासाच्या सहाय्याची आवश्यकता असते.

प्रतिभा दोन प्रकारची असते. कारयित्री आणि भावयित्री. कारयित्री प्रतिभेचे सहज, आहार्य आणि औपदेशिक असे तीन भेद होतात. ह्याच आधारावर कवींच्या सुद्धा तीन श्रेणी होतात. सारस्वत, आभ्यासिक आणि औपदेशिक.

भावकत्व प्रतिभा कवित्वापेक्षा पृथक् मानली जाते. भावक एक तर असंतुष्ट लोक असतात (अरोचकिन). असे लोक ज्यामध्ये प्रतिभा असते परंतु ज्यांना मार्गदर्शनाची गरज असते किंवा असे लोक जे तृणावर जीवित राहतात (सतृणाभ्यवहारिणः) ते अशिष्ट लोक प्रतिभेपासून पूर्णपणे वंचित असतात किंवा ईर्ष्यालू (मत्सरिणः) असतात किंवा तत्त्वाभिनिवेशी असतात (तत्त्वाभिनिवेशिनः) ते विरळच असतात.



प्रतिभेची व्याख्या अशी दिली आहे – 'या शब्द ग्रामं अर्थ सार्त अलकारं तंत्रं मुक्तिमार्गं अन्यत् अपि तथाविधं आदिहृदयं प्रतिभासयति सा प्रतिभा।'

सहाव्या अध्यायात पद आणि वाक्यांची व्याख्या, त्यांचे लक्षण व उदाहरणे दिली आहेत. ह्याच अध्यायात राजशेखराने गुण आणि अलंकारयुक्त वाक्याला काव्य मानले आहे.

सप्तम अध्यायात ब्राह्म, शैव आणि वैष्णव असे तीन प्रकारचे वाक्य सांगितले आहे. देवता आणि देवजातींच्या भाषेचा नवीन विषय सुद्धा ह्याच अध्यायात समाविष्ट केला आहे. ह्याच अध्यायात काकू प्रकरण आणि काव्यपाठी प्रकरणाचा सुद्धा समावेश आहे. ह्याच संदर्भात राजशेखर भिन्नभिन्न प्रदेशातील कवींच्या पाठप्रणालीचे सुद्धा वर्णन करतात.

अष्टम अध्यायात सर्वप्रथम काव्यार्थाचे स्त्रोत वर्णन केले आहेत व त्यांची उदाहरणे दिली आहेत धर्मग्रंथ, पुराणे, महाकाव्य, कला, विज्ञान, दर्शनशास्त्र इ. ची मोठी यादी दिली आहे. त्यामुळे काव्यासाठी अनेक विषय मिळतात. नवम अध्यायात अनेक विषयांची आलोचना करीत अर्थाची व्यापकता आणि त्यांच्या अवान्तर सूक्ष्मतम विषयांची दार्शनिक व वैज्ञानिक मीमांसा केली आहे. विषयवस्तु मनुष्य, देवता किंवा पातळीच्या संबंधाने भिन्नाभिन्न असते. परंतु विषयवस्तु रसवत् असावी.

दशम अध्यायात कविचर्या आणि राजयर्चेचे महनीय विषय वर्णन केले आहेत. ह्यात कवीचे वर्तन, राहणीमान, दैनिक व्यवहारासंबंधी छोट्याछोट्या गोष्टींचा उल्लेख केला आहे. राजाने कवी आणि विद्वानांच्या सभेचे आयोजन करावे, हे त्याचे कर्तव्य होय. यातच सन्मान आणि प्रतिष्ठेसाठी होणारी कवींची पारख किंवा साहित्यिक परीक्षांचे विवरण दिले आहे.

ह्यामध्ये सफल होणाऱ्या कवीला रथामध्ये बसवून फिरविले जात असे आणि पट्टबंधाने सज्जित केले जात असे.

त्यांनी कवींसाठी अपेक्षित गृह, त्याचे सेवक, त्याची लेखनसामुग्री, त्यांच्या संपूर्ण दिवसांचे आठ भागात विभाजन करून त्याच्या अनुकूल कर्तव्यांचे विवेचन केले आहे.

एकादश अध्यायापासून पुढील तीन अध्यायांपर्यंत काव्यचोरी आणि अपहरणासंबंधी सूक्ष्म मीमांसा केली आहे. हे विवेचन क्रमशः शब्दचोरी आणि विचारांच्या चोरीच्या संदर्भात केले आहे. शेवटी असा एक श्लोक उद्धृत केला आहे, ज्यात म्हटले आहे की विरळच असा कोणी कवी असेल जो दुसऱ्यापासून चोरी करत नाही. परंतु सर्वोत्तम चोरी तिच आहे जिच्यात तथ्य कुशलतेने लपवले असते.

**नास्ति अचौरः कवि जनो नास्ति अचौरो वणिग् जनः।**
**स नन्दति विना वाच्यं यो जानाति निगूरितम्।।**

केवळ छाया ग्रहण करणे किंवा विचारांच्या अनुकरणाला काव्यात्मक मानून त्याची निंदा केली आहे.

**सोऽयं कवेरकवित्वदायी सर्वथा प्रतिबिंब कल्पः परिहरणीयः।**

खरा कवी त्यालाच म्हणतात जो शब्द आणि विचारांच्या अभिव्यंजनेत काही नवीन गोष्टी प्रकट करतो आणि त्याचबरोबर प्राचीन, जुन्या गोष्टींना नवीन ढंगाने प्रस्तुत करतो.

**शब्दार्थोक्तिषु यः पश्येद् इह किंचन नूतनम्।**
**उल्लिखेत् किंचन प्राच्यं मन्यतां स महाकविः।।**

द्वादश अध्यायामध्ये अर्थाहरणासंबंधी विवेचन आहे. हे विवेचन अत्यंत गंभीर असून त्याने दिलेली उदाहरणे सुद्धा त्याच्या गंभीर विवेचनाचा परिणाम आहे.

त्रयोदश अध्यायामध्ये आलेख्य, लेख्य, तुल्य, देहितुल्य आणि पुरप्रवेश सदृश अर्थापहरणाचे विवेचन केले आहे.

चतुर्दश, पंचदश व षोडश अध्यायांमध्ये कवींच्या काव्याचे विवेचन आहे. वर्णनासाठी कवीने ह्याचा व्यावहारिक उपयोग केला आहे. कविसमयात देश, वृक्ष, झुडूप, फुले इ. विषय आहेत. तसेच अमूर्त किंवा अस्पृश्य विषय सुद्धा आहेत. हास्यवर्णन सदैव श्वेतरुपाने करावे, असे त्यांचे मत आहे.

सप्तदश आणि अष्टादश अध्यायात क्रमशः देश व काळाविषयी लिहिले आहे. या दोन अध्यायांना क्रमशः देशविभाग व ऋतुकालविभाग म्हणतात.



देश-विभागात भारताचे देश, नदी, पर्वत, प्रत्येक ठिकाणची वेगवेगळी स्थाने, विविध प्रकारच्या लोकांचे रंग, त्यांची मुखाकृती वर्णन केली आहे. काकूध्वनिवर आधारित पठनप्रणाली वर्णन केली आहे. काव्यविभागात पवन, पुष्प, पक्षी तसेच विविध ऋतुंना अनुकूल कार्याचे वर्णन केले आहे. ह्यात प्रकृतिचे सूक्ष्म वर्णन केले आहे.

राजशेखराने काव्यमीमांसेच्या १८ अध्यायात जो वर्णन केले आहे तेच वर्णन जरी विस्ताराने नाही तरी संक्षेपाने वामनासारख्या रुढिवादी लेखकांनी केले आहे. राजशेखराच्या संक्षिप्त परंतु सरळ व चित्रमय शैलीमुळे हे विषय अधिकच आनंददायी झाले आहेत.

**काव्यमीमांसा ग्रंथाची विशेषता**

'वाक्यं रसात्मकं काव्यम्।' ही विश्वनाथाने काव्याची परिभाषा केली आहे. या संदर्भात राजशेखर म्हणतात की ज्या वाक्यामध्ये साहित्यिक गुण आढळतात आणि जे अलंकाराने सुशोभित असते तेच 'काव्य' ठरते. 'गुणवद् अलंकृतं च वाक्यमेव काव्यम्।' या कथनावरून असा निष्कर्ष निघतो की राजशेखराने अप्रत्यक्षपणे रीति संप्रदायास मान्यता दिली आहे. कारण त्याने वामनाच्या, 'काव्यशब्दोऽयंगुणालंकार संस्कृतयोः शब्दार्थयोवर्तते।' या उक्तीला उद्धृत केले आहे.

वामनवर्णित तीन रीतींचा संक्षेपाने उल्लेख केला आहे. त्यांच्या मते विविध देशांमध्ये भटकण्यामुळे विविध प्रकारच्या काव्यरीती स्वतःच उत्पन्न झाल्या. यात वामनाने उल्लेख केलेल्या तीन रीती महत्त्वपूर्ण आहेत.

काव्यमीमांसा ग्रंथामध्ये केवळ रस, गुण किंवा अलंकाराचे मुख्यत्वाने विवेचन नाही तर ह्यात कवींसाठी व्यवहारोपयोगी तसेच मार्गदर्शक सूचना केल्या आहेत. हा ग्रंथ विविध विषयांची माहिती देणारा खजिना आहे.

केशवमिश्र लिखित अलंकारशेखर ग्रंथाच्या ११व्या मरीचिच्या अंती राजशेखराने रचलेले दोन श्लोक उद्धृत केले आहेत. त्यातील एक असा-

**अलंकार शिरोरत्नं सर्वस्वं काव्यसम्पदाम्।**
**उपमा कविवंशस्य मातैवेति मतिर्मम।**

हा ग्रंथ कौटिल्याच्या अर्थशास्त्रानुसार लिहिला आहे. ह्याची भाषाशैली

काही ठिकाणी अवघड असून सुद्धा सशक्त आहे. त्याने पूर्ववर्ती ग्रंथकारांची अनेक पद्ये उद्‌धृत केली आहेत. तसेच अलंकारविषयक मते पण स्वीकारली आहेत.

राजशेखराने आपल्या ग्रंथात काही महत्त्वपूर्ण ऐतिहासिक तथ्यं दिली आहेत.

मेधाविरुद्र आणि कुमारदास जन्मांध कवी होते. मगधाचे शिशुनाग, कुविन्द देशाचे शूरसेन, कुन्तकचे सातवाहन आणि उज्जयिनीचे साहसीक यांनी राजदरबारामध्ये विचित्र नियम केले होते. ह्या नियमानुसार बोलण्यास कठीण वाटणाऱ्या आठ अक्षरांचे उच्चारण दरबारात कोणी पण करू शकत नसे. वर्णकठोर वाटणाऱ्या संयुक्त अक्षरांचा प्रयोग वर्ज्य होता. ह्याचप्रकारे संभाषणात पूर्णतः संस्कृत किंवा प्राकृत प्रयोग केला जाई.

वासुदेव, सातवाहन, शूद्रक आणि साररुपक यांच्या सभांमध्ये विद्येची वृद्धी झाली. उज्जयिनीत कालिदास, मेष्ठ, अमर, रुपसूर (१ला), भारवि, हरिश्चंद्र, चन्द्रगुप्त (१ला) ह्या कवींची परीक्षा झाली होती. ह्या कवींची परीक्षा झाली तेव्हा उपवर्ष, वर्ष, पाणिनि, पिंगल, वररुचि इ. कवी उपस्थित होते. ही परीक्षा पाटलीपुत्र येथे झाली.

राजशेखराला प्राकृत भाषेविषयी अत्यंत प्रेम होते. त्याने विविध देशातील प्राकृताचा उल्लेख केला आहे. त्याच्या मते अवन्ती, पारियाल व दशपुरात पैशाची भाषेचा प्रभाव होता.

राजशेखर त्यांच्या काळातील प्रसिद्ध कवी व मीमांसक होते आणि हे सत्य आहे की केवळ सिद्धांत म्हणून त्यांनी काव्यशास्त्रात नवीन सिद्धांत प्रस्थापित केला नाही, तर त्यांनी आपल्या ग्रंथात त्याचे गंभीरतेने विवेचन केले आहे. म्हणून त्यांना साहित्यशास्त्राच्या क्षेत्रात मानाचे स्थान दिले जाते.

* *



.९.

# मुकुलभट्ट

मुकुलभट्टांनी 'अभिधावृत्तिमातृका' या ग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ अत्यंत लघु आहे तरी सुद्धा त्याचा परिचय देणं आवश्यक आहे. ह्यात १५ कारिका आहेत व त्यावर स्वतः मुकुलभट्टांनी वृत्ती लिहिली आहे. ह्यामध्ये शब्दाचे मुख्य व लाक्षणिक ह्या दोन प्रकारच्या अर्थांचे विवरण आहे. लक्षणेचे विवेचन विस्ताराने केले आहे आणि त्याच्या उपभेदांचे उदाहरणासह विवेचन केले आहे.

काव्यप्रकाशप्रमाणे परवर्ती कृतिंमध्ये जे लक्षणेचे विवरण आहे ते ह्या ग्रंथावर आधारित आहे. त्याने आपल्या ग्रंथात उद्‌भट, कुमारिलभट्ट, ध्वन्यालोक, भर्तृमित्र महाभाष्य, विज्जिका, वाक्यपदीक, शबरस्वामी इ. चे उल्लेख केले आहेत. तो भट्टकल्लाट चा पुत्र होता व प्रतिहारेन्दुराजचा शिक्षक होता.

अवन्तिवर्मनच्या (८५५-८८३ इ.स.) शासनकाळात भट्टकल्लाट रहात होता.

**अनुग्रहाम् लोकानां भट्टाः श्री कलाटादयः।**
**अवन्तिवर्मन काले सिद्धा भुवमवातरन्॥**

(राजतरंगिणी ५.६६)

माणिक्यचंद्राच्या काव्यप्रकाश संकेतात ह्याचा अनेक जागी उल्लेख येतो. ह्यावरून अनुमान केले जाते की अभिधावृत्ति मात्रिकाचा काळ इ.स. ९००-९२५ असावा.

* *

.१०.

# भट्टनायक

ज्यांनी भरताच्या रससूत्रावर विवेचन केलेले आहे अशा चार टीकाकारांपैकी भट्टनायक एक आहेत.

'विभावानुभव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः।' काव्यप्रकाशामध्ये त्यांचा उल्लेख आहे. त्यांचे रसविषयक मत असे आहे,

**'न ताटस्थ्येत नात्मगत्येन रसः प्रतीयते नोत्पद्यते नाभित्यज्यते अपितु काव्ये नाट्ये चाभिघातो द्वितीयेन विभावादि साधारणीकरणात्मना भावकत्व व्यापारेण भाव्यमानः स्थायी सत्वोद्रेक प्रकाशनंदमय संविद्विश्रान्तिसतत्वेन भोगेन युज्वत इति भट्ट नायकः।'**

त्याच्या मते काव्य किंवा नाटकाचे अभिधा, भावना आणि भोगाकृति (रसचर्वणा किंवा भोग) ही तीन कार्ये असतात.

प्रथम अभिधा शास्त्रासाठी अपेक्षित आहे. दुसऱ्या कार्यभावनेने सीता इ.ला पाठक किंवा दर्शकांसमोर अशाप्रकारे प्रस्तुत केले जाते की त्याचे व्यक्तिगत अस्तित्व मिटून जाते आणि ते सामान्य किंवा निर्वैयक्तिकरुपाने त्याच्या समोर येतात (सीता एक पवित्र व सुंदर नारीच आहे.) तिसऱ्या कार्याचा संबंध प्रेक्षक किंवा पाठकांच्या अंतिम अनुभूतीशी आहे. (ही अनुभूती ब्रह्मानंदासमान स्वसंवेद्य आहे. त्यांचे वर्णन शब्दांनी करता येत नाही.)

भट्टनायकाने 'हृदयदर्पण' नावाचा ग्रंथ लिहिला आहे. प्रो. वि. वि. सोवनींच्या मते हृदयदर्पण ही नाट्यशास्त्रावरील टीका आहे. भट्टनायकाचा उद्देश ध्वनिला रसमात्र स्थापित करणे होता. त्यांच्या मते आनंदवर्धनांनी केलेले वस्तुध्वनि व अलंकारध्वनि हे दोन भेद असंगत आहेत त्याचबरोबर त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की रसानुभूतीच्या सिद्धांताची शब्दात व्याख्या करता येत नाही.

भट्टनायक मीमांसक होते. त्यांनी आपल्या रचनेसाठी मीमांसा सिद्धांताचा आधार घेतला. भट्टनायकाचे रसचर्वणा किंवा भोगसंबंधी विचार





आम्हाला सांख्यदर्शनाची आठवण देतात. ज्यात पुरुष कर्ता नाही तर भोक्ता मात्र मानला जातो.

भट्टनायकाच्या सत्वोद्रेक सिद्धांताला मम्मटाने पण स्वीकारले आहे. त्यावर सांख्यांच्या सत्व, रजस् व तमस् या तीन गुणांचा प्रभाव आहे. भट्टनायकांच्या मते काव्यशास्त्र हे पूर्णपणे भिन्न आहे. काव्य पूर्णतः कविव्यापारावर आधारित आहे आणि सर्वांना आनंद देते तर शास्त्र उपदेश करतात आणि आख्यान (पुराण, इतिहास) सूचना करतात.

**काळ**

भट्टनायकाचा काळ ध्वन्यालोकाच्या नंतर व अभिनवगुप्ताच्या लोचनाच्या पूर्वी ९०० ते १००० इ.च्या मध्ये येतो. भट्टनायकाचा काळ ९३५ पासून ९८५ इ. मध्ये मानला जातो.

भट्टनायकाची रचना काव्य, रस आणि ध्वनी सिद्धांताच्या माहितीसाठी बहुमूल्य आहे. आजही अधिक शोध घेतल्यास त्याच्या रचनेची पांडुलिपी उपलब्ध होऊ शकते.

* *

## .११.
# भट्टतौत

भट्टतौत अभिनवगुप्ताचे गुरू होते. त्यांनी 'काव्यकौतुक' नामक ग्रंथ लिहिला. अभिनवगुप्ताने 'विवरण' नामक टीका लिहिली. अभिनवगुप्ताने नाट्यशास्त्राच्या भाष्याच्या प्रस्तावनेत चौथ्या पद्यात लिहिले आहे की तौतने नाट्यवेदाची व्याख्या त्यांना ऐकविली.

**सद्विप्रतोत् वदनोदित नाट्यवेद**
**तत्त्वार्थमर्थिजन वाञ्छितसिद्धिहेतोः।**
**माहेश्वराभिमतवगुप्तपदप्रतिष्ठ**
**संक्षिप्त वृत्तिविधिना विशदीकरोति।**

नाट्यशास्त्राच्या २९व्या अध्यायाच्या शेवटी पुनः अभिनवगुप्ताने लिहिले आहे की द्विजश्रेष्ठ तौत यांनी त्यांना संधींच्या अध्यायात नियमांची व्याख्या समजावून दिली.

भट्टतौतचा असा सिद्धांत होता की शांतरस मोक्षप्रद असल्यामुळे सर्व रसात श्रेष्ठ आहे.

**मोक्षफलत्वेत चायं (शान्तोरसः) परमपुरुषार्थनिष्ठत्वात्सर्वरसेभ्यः प्रधानतमः। सचायमस्मदुपाध्यायभट्टतौतेन काव्यकौतुके अस्माभिच्चतद्विवरणे बहुकृतरकृतानिर्णयः पूर्णपक्षसिद्धान्त इत्यलं बहुना।** (लोचन पृ.२२१ कारिका २६)

एका अन्य सिद्धांताचे वर्णन 'लोचन'मध्ये येते. तो सिद्धांत अभिनवगुप्ताचे गुरू तौत यांचा सांगितला जातो.- **'प्रीत्यात्मा च रसस्तदेव नाट्यं नाट्यं एव वेद इत्यस्मदुपाध्याय।'**

अभिनवभारतीतून तौतच्या काव्यकौतुकाची अनेक उदाहरणे देता येतात. भरताच्या 'तस्मान्नाट्यरसास्मृताः।' (नाट्य ६-३६) या वचनावर अभिनवगुप्ताने आपले अभिमत ह्या प्रकारे व्यक्त केले आहे. 'रससमुदायो हि नाट्यम्। न नाट्य एव रसः काव्येऽपि नाट्यायमान एव रसः, काव्यार्थविषये हि प्रत्यक्षकल्पसंवेदनोदये रसोदय इत्युपाध्यायाः।'



ह्याचा अर्थ असा की जेव्हा कवी आपल्या अद्भुत चित्रणशक्तीने वर्णित वस्तुला अशाप्रकारे पाठकांसमोर प्रस्तुत करतो की जणू ती त्यांच्या डोळ्यांपुढे प्रत्यक्ष साकार होते, तेव्हाच त्यांना काव्यरसाचे आस्वादन होऊ शकते. नाट्यशास्त्र भाग १ मध्ये काव्यकौतुकाच्या त्या पद्याचा संकेत प्राप्त होतो, ज्यामध्ये रसांची संख्या सांगितली आहे.

**यत्तूपाध्यायैः काव्यकौतुके रसोदेशपरे श्लोके निरुपितं।**

नाट्यशास्त्राच्या प्रथम भागात भट्टतौतकृत व्याख्येचा संकेत मिळतो. भरताच्याच एका पद्यावर एक अर्धपद्य उद्धृत केले आहे. त्यात म्हटले आहे की जेव्हा करुणरस विप्रलंभावर निर्भर असत नाही तेव्हा त्याची स्थिती सर्व प्राण्यांमध्ये समान असते.

**तदुक्तमस्मदुपाध्यायभट्टतातेन स्वातन्त्रेव प्रवृत्तौ तु सर्व प्राणिषु सम्भवः।**

नाट्यधर्मावर अभिनवगुप्ताच्या अध्यापकाचे एक पद्य उद्धृत आहे.

**यथोक्तमुपाध्यायैः यदत्रास्ति न तस्मादस्यकवेर्वणनमर्हति।**
**यन्नासमभवि तत्र स्यात् सम्भव्यत्र तु धर्मतः।**

हे पद्य आणि आणखी एक दूसरे पद्य अभिनवगुप्ताने अध्याय १९ मध्ये उद्धृत केले आहे. भरताच्या १५व्या अध्यायाच्या शेवटच्या पद्यात अभिनवगुप्ताने आणखी एक पद्य उद्धृत केले आहे, ज्यानुसार नाटकाला प्रभावित करण्यासाठी महाकवींनीसुद्धा क्रम व पद्धतींचा स्वीकार केला पाहिजे.

**स एव क्रम इत्युपाध्यायाः। यदाहुः।**
**महाकवीनां पदवीमुपात्तामारुरुक्षताम्।**
**ना संस्मृत्य पदस्पर्श सम्पत्सोपान पद्धतिः।**

अभिनवगुप्ताने म्हटले आहे की रस, चमत्कार प्राण, आनन्दैक घन आणि लोकोत्तर असतो. आपल्या मताच्या पुष्टिसाठी त्याने वाच्याभिनयाच्या विषयी तौतच्या सहा पद्यांना उद्धृत केले आहे.

काव्यामध्ये किंवा नाटकामध्ये कोणत्याही प्रकारच्या पात्राच्या प्रयोगावर कोणताही प्रतिबंध नाही. परंतु प्रकरणानुसार सैन्धवी भाषेचा (सिन्धु देशाची बोली) प्रयोग केला पाहिजे.

**यत्र भाषा नियमो नोक्तस्तत्र प्राथम्यात्संस्कृतैव यथेच्छमित्यन्ये स्त्रीपुंभावाश्रयत्वात् प्राकृतभाषैवेत्यपरं सैन्धव्येण प्रकरणादिति भट्टतोतः।**

अभिनवगुप्ताने अनेक ठिकाणी आपल्या गुरुचा उल्लेख उपाध्यायाः किंवा गुरवः असा केला आहे. त्यावरून भट्टतौताचा अभिनवगुप्तावर प्रभाव दिसून येतो. त्याने उद्‌धृत केलेल्या काव्यकौतुकातील उदाहरणांवरून असे दिसून येते की ह्या ग्रंथाचा अधिकांश भाग पद्यात्मक आहे. त्यात सामान्यतः काव्यसिद्धांतावर विवेचन केले आहे तसेच नाट्यशास्त्राशी संबद्ध प्रकरणांची व्याख्या केली आहे.

अभिनवगुप्ताचा साहित्यिक कार्यकाळ ९८० ते १०२० इ. चा मध्य आहे. म्हणून त्याच्या गुरूचा साहित्यिक कार्यकाळ ९५० ते ९८० इ. मध्य निश्चित होतो.

भट्टतौतचा एक आणखी सिद्धांत असा आहे की, काव्याचा नायक तसेच सहृदय पाठकाचा अनुभव एकसमान असतो.

**'नायकस्य कवेः श्रोतुः समानोऽनुभवस्ततः।'**

क्षेमेन्द्राच्या औचित्यविचारचर्चेत प्रस्तुत प्रतिभेच्या परिभाषेचे श्रेय भट्टतोतलाच प्राप्त होते.

**प्रज्ञा नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मता।**

भट्टतौताचे काव्यकौतुक किंवा अभिनवगुप्ताद्वारा केलेली विवरण टीका आज उपलब्ध नाही. परंतु हेमचंद्राने काव्यानुशासनात भट्टतौताचे तीन पद्य उद्‌धृत केले आहेत. सोमेश्वराच्या काव्यप्रकाशटीकेत पण हेच तीन श्लोक उद्‌धृत केले आहेत.

भट्टतौत शंकुकाच्या 'अनुकरणरुपो रसः' या मताच्या विरोधी होता.

* *



.१२.

# कुंतक

आनंदवर्धनानंतर काव्यमीमांसेच्या क्षेत्रात ज्यांनी स्वतंत्र बुद्धीची चमक दाखविली अशा प्रतिभाशाली ग्रंथकारांमध्ये प्रथम वक्रोक्तिजीवितकार व साहित्यशास्त्रज्ञ कुंतकाचा निर्देश करायला हवा.

**काळ**

कुंतकाने ध्वनिकार आनंदवर्धन, रुद्रट तसेच राजशेखरकृत बालरामायणाचा उल्लेख केला आहे. म्हणून वक्रोक्तिजीवित ही १०व्या शतकाच्या प्रथम चरणानंतरची रचना ठरते. व्यक्तिविवेकात महिमभट्टाने वक्रोक्तीजीविताचा उल्लेख करून त्यावर टीका केली आहे. त्यावरून तो कुंतकाचा पूर्ववर्ती किंवा समकालीन असावा. अभिनवगुप्ताने कुंतकाचा तसेच कुंतकाने सुद्धा अभिनवगुप्ताचा कुठेच उल्लेख केला नाही. त्यामुळे ते समकालीन असावेत.

**ग्रंथरचना**

कुंतकाने भामहाच्या काव्यालंकारातून वक्रोक्ती ही कल्पना उचलून ती मुळातल्यापेक्षा अधिक व्यापक बनवली आणि तिच्या आश्रयाने काव्याचा सारा प्रपंच विवेचन करण्याचा चंग बांधला.

कुंतकाच्या मते ही वक्रता मुख्यतः सहा प्रकारची आहे. वर्णविन्यास वक्रता, पदपूर्वार्ध वक्रता, प्रत्ययवक्रता, वाक्यवक्रता, प्रकरण वक्रता आणि प्रबंध वक्रता हे ते सहा प्रकार आहेत.

यापैकी पहिल्या तीन प्रकारांचे दुसऱ्या उन्मेषात, चौथ्याचे तिसऱ्यात व राहिलेल्या दोहोंचे चौथ्यात सविस्तर विवेचन केलेले आहे.

कुंतकाच्या प्रतिपादनाचे मुख्य सूत्र भामहाच्या काव्यविचारात आहे. भामहाने जे 'शब्दार्थौ सहितौ काव्यम्।' (१.१६) असे काव्यलक्षण केले आहे तेच अधिक वाढवून कुंतकाने दिले आहे. यातल्या 'सहितौ' या पदाचे आणि त्याच्या अनुषंगाने साहित्य या पदाचे जे अर्थपूर्ण विवेचन कुंतकाने केले आहे, ती त्याने काव्यविचारात घातलेली एक मोलाची भर आहे.

काव्यमीमांसेतील 'मार्ग' अर्थात 'रीती' ही कल्पना कुंतकाने अधिक सुसंगतपणे मांडली आहे. त्याने सांगितलेल्या सुकुमार, विचित्र व मध्यम या मार्गांच्या सामान्य आणि विशेष गुणांची एकूण संख्या १० आहे.

कुंतकाची काव्यविषयक भूमिका ध्वनि सिद्धांताहून फारशी वेगळी नाही. या दोहोंमध्ये जो काही वेगळेपणा दिसतो त्याचे मूळ कुंतकाने योजिलेल्या अभिनव परिभाषेत आणि तिला कारणीभूत झालेल्या 'अपूर्ण अलंकार' (लक्षण ग्रंथ) निर्माण करण्याच्या त्याच्या मनीषेत आहे.

**वक्रोक्ति संप्रदाय**

संस्कृत साहित्यातील अलंकारशास्त्राचा एक संप्रदाय. कुंतक हा या संप्रदायाचा प्रवर्तक आहे. वक्रोक्ती हा काव्याचा आत्मा आहे, असे याचे मत आहे. त्यामुळेच त्याने आपल्या ग्रंथाचे नाव 'वक्रोक्तिजीवित' असे ठेवले आहे.

वक्रोक्ती शब्दाचा अर्थ वक्र+उक्ती म्हणजे 'सर्वसाधारण लोकांच्या कथनापेक्षा भिन्न व अलौकिक चमत्काराने युक्त असे कथन' असा आहे. कुंतकाने वक्रोक्तीला 'वैदग्ध्यभङ्गीभाणिति' असे चातुर्यपूर्ण शैलीचे कथन असे म्हटले आहे.

वक्रोक्तीची ही कल्पना कुंतकाने भामहाकडून घेतली आहे. भामहाने अतिशयोक्तीला वक्रोक्ती असे नाव दिले आहे आणि तिच्यामुळेच काव्यात निर्मिती होते असे मानले आहे. तो म्हणतो,

**सैषा सर्वत्र वक्रोक्तिरनयाऽर्थो विभाव्यते।**
**यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलङ्कारोऽनयाविना।।**

वक्रोक्तिमुळेच अर्थ चांगल्या रीतीने प्रकट होतो. म्हणून कवीने वक्रोक्तीसाठी प्रयत्न करावा. वक्रोक्तीचा प्रयोग केल्याशिवाय अलंकार कसा उत्पन्न होईल?

दंडीनेही वाङ्मयाचे स्वभावोक्तिरूप व वक्रोक्तिरूप असे दोन प्रकार मानले आहेत. वक्रोक्तित श्लेषाच्याद्वारे सौंदर्याची उत्पत्ती होते, असे त्याने म्हटले आहे. कुंतकानेही याच कल्पनेचा विचार करून वक्रोक्तीला काव्याचे जीवित मानले आहे.



वक्रोक्तीचे मुख्य पाच प्रकार आहेत. वर्णवक्रता, पदवक्रता, वाक्यवक्रता, अर्थवक्रता, प्रबंधवक्रता. या व्यतिरिक्त उपचार वक्रता ही आणखी एक वक्रता मानलेली आहे. कुंतकाने ध्वनीच्या अनेक भेदांचा समावेश हिच्यात केला आहे. कुंतकाची वक्रोक्तीची कल्पना इतकी उदात्त, व्यापक व बहुमुखी आहे की तिच्यात ध्वनीचे सर्व भेद सामावून जातात.

कुंतकाची विवेचन करण्याची पद्धती अत्यंत मार्मिक आहे. वक्रोक्तिजीवित हा त्याचा ग्रंथ अलंकारशास्त्रावरील मौलिक विचारांचे भांडार आहे. त्याच्यानंतरच्या आलंकारिकांनी मात्र त्याच्या वक्रोक्ति कल्पनेचा पाठपुरावा केला नाही. त्यामुळे पुढच्या काळात वक्रोक्ती हा केवळ एक शब्दालंकार मानला जाऊ लागला.

**कुंतककृत वक्रोक्तिजीवित**

हा ग्रंथ अनेक वर्षे अनुपलब्ध होता. परंतु त्याच्या अस्तित्वाचे ज्ञान अलंकार सर्वस्व, साहित्यदर्पण इ. ग्रंथामध्ये उल्लिखित उद्धरणांमुळे होत होते. त्याची हस्तलिखित प्रत मद्रासमध्ये होती. डॉ. बेलवलकर यांच्या प्रयत्नांनी ती प्राप्त झाली.

वक्रोक्तिजीविताचे कारिका, वृत्ति आणि उदाहरण हे तीन भाग आहे. आणि अधिकांश उदाहरणे पूर्ववर्ती ग्रंथातून घेतली आहेत. हा ग्रंथ चार उन्मेषांमध्ये विभक्त आहे. ह्या ग्रंथाच्या कारिका, वृत्ति आणि उदाहरणांचे रचयिता कुंतकच आहेत ही गोष्ट अनेक प्रमाणांनी सिद्ध होते आणि ह्याला वक्रोक्तिजीवित म्हटले जात होते.

**प्रथम उन्मेष**

प्रथम उन्मेषाच्या आरंभी नमनाचा श्लोक आहे.

**वन्दे कवीन्द्र वक्त्रेन्दुलास्यमन्दिर नर्तकीम्**
**देवीं सूक्तिपरिस्पंदसुन्दराभिनयोज्ज्वलाम्।**

भामहाच्या शब्दार्थौ सहितौ काव्यम्। या परिभाषेप्रमाणेच कुन्तकाने काव्याची परिभाषा दिली आहे.

**शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनी**
**बन्धे व्यस्थितौ काव्यं तद्विदाल्हादकारिणी।**

कवीच्या कल्पनाकुशलतेमुळे संयोगाने जी चमत्कृतीपूर्ण रचना होते तिलाच काव्य म्हणतात.

सालंकृत शब्द व अर्थ मिळूनच काव्य होते आणि काव्यासाठी अलंकार अनिवार्य आहेत हे म्हणणे उपयुक्त नाही. ह्यावरून हे स्पष्ट होते की काव्य अलंकाराशिवाय पण संभवते.

त्यांनी काव्याचे उदाहरण असे प्रस्तुत केले आहे.

**ततोरुणपरिस्पन्दमन्दीकृतवपुःराशी।**

**दधरे काम परिक्षाम कामिनीगण्डपाण्डुणाम्।**

(काव्यप्रकाश ९ मध्ये उद्‌धृत)

त्यानंतर त्यांनी वक्रोक्तिच्या कार्याचे निरूपण केले आहे. 'वक्रोक्तिरेव वैदग्ध्यभङ्गीभणितिरुच्यते।' (कारिका १.१०.११) साधारण बोलीभाषेपेक्षा भिन्न आणि उच्चकोटिच्या चमत्कृतिजनक वर्णनाला वक्रोक्ती म्हणतात. त्यात कवीची कुशलता सहृदयांना मुग्ध करते.

ज्यांनी स्वभावोक्ति अलंकार मानला आहे त्यांचा ते उपहास करतात. वक्रोक्तीची व्याख्या ते अशी करतात,

**वक्रत्वं प्रसिद्धप्रस्थान व्यतिरेकिवैचित्र्यम्।** (कारिका १.१९)

ह्यानंतर कविव्यापार वक्रतेचे सहा भेद प्रस्तुत केले आहेत. वर्णविन्यास वक्रता, पदपूर्वार्द्ध वक्रता, प्रत्यय वक्रता, वाक्य वक्रता, प्रकरण वक्रता, प्रबन्ध वक्रता.

वक्रोक्तीच काव्याचा आत्मा आहे ह्याची स्थापना केली आहे. वक्रोक्ती हाच काव्याचा प्राण आहे व त्यामुळे काव्य होते. त्याशिवाय काव्याचे अस्तित्व असू शकत नाही. जोपर्यंत कवीमध्ये कल्पनाशक्ती असत नाही तोपर्यंत वक्रोक्ती होऊ शकत नाही. म्हणून काव्यामध्ये कविव्यापाराची प्रधानता असते.

**विचित्रो यत्र वक्रोक्ति वैचित्र्यं जीवितायते।**

**परिस्फुरातियस्यान्तः सा काव्यतिशया भिधा।**

त्यानंतर त्याने वैचित्र्याच्या काही गुणांचा उल्लेख केला आहे.

माधुर्य, प्रसाद (संयुक्त तसेच सुसंबद्ध शब्दांद्वारा केलेली वाक्यरचना) लावण्य आणि अभिजात्य हे विशिष्ट गुण असतात.



लावण्य व अभिजात्याची परिभाषा ह्याप्रकारे केली आहे,

**अत्रालुप्तविसर्गान्तैः पदैः प्रोतैः परस्परम्।**

**ह्रस्वैः संयोगपूर्वैश्च लावण्यमितिरिच्यते।**

**यद्धाति कोमलच्छायं नातिकाठिन्यमुद्वहत्**

**अभिजात्यं मनोहारि तदत्र प्रोढिनिर्मितम्।** (कारिका १.३१)

ह्या सर्वांची उदाहरणे दिली आहेत.

कुंतकाने वैचित्र्यमार्ग, सुकुमार मार्ग (सौकुमार्य वैचित्र्य) संवलित मार्ग हे तीन मार्ग सांगितले आहेत. संवलित मार्गालाच मध्यम मार्ग म्हटले आहे.

**मार्गोऽसौमध्यमो नाम नानारुचिमनोहरः।**

**स्पर्धया यत्र वर्तन्ते मार्ग द्वितीय समदः।**

**द्वितीय उन्मेष**

हा उन्मेष वर्णविन्यासवक्रतेच्या व्याख्येने आणि विवेचनाने आरंभ होतो. ह्याची परिभाषा अशी दिली आहे.

**एको द्वौ बहवोवर्णाः बध्यमानाः पुनःपुनः।**

**स्वल्पान्तरा स्त्रिदासोक्ता वर्णनविन्यास वक्रता।।** (२.१)

वर्णविन्यासवक्रता म्हणजे बहुधा प्राचीन आलंकारिकांनी वर्णन केलेला अनुप्रासच होय.

कुंतक एकाच पद्यात अलंकारांचा भरपूर वापर करणे योग्य समजत नाहीत. त्यांच्या मते उपनागरिका तसेच प्राचीन आचार्यांद्वारा नियमित अन्य वृत्ति वर्णविन्यास वक्रतेसमानच आहेत.

**वर्णच्छायानुसारेण गुणमार्गानुवर्तिनी।**

**वृत्तिवैचित्र्ययुक्तेति सैव प्रोक्ता चिरन्तनैः।** (२.५)

यमक सुद्धा वर्णविन्यास वक्रतेचा एक प्रकार आहे.

वर्णविन्यास वक्रतेनंतर पदपूर्वार्ध वक्रतेवर विचार केला आहे. ह्याचे रुढिवैचित्र्य वक्रता इ. प्रकार सांगितले आहेत.

**यत्र रुढेरसंभाव्यधर्माध्यारोपगर्भता।**

**सद्धर्मातिशयारोप गर्भत्वं वा प्रतीयते।**

**लोकोत्तर तिरस्कार श्लाघ्योत्कर्षाभिधित्सया**

**वाच्यस्य सोच्यते कापि रुढिवैचित्र्यवक्रताः।** (कारिका २.८)

रुढिवैचित्र्य दोन प्रकारचे आहे. पदपूर्वार्धाचा दुसरा प्रकार पर्याय वक्रता आहे. **पर्यायप्रधानः शब्दः पर्यायः।**

पदपूर्वार्ध वक्रतेचाच एक दुसरा महत्त्वपूर्ण प्रकार उपचार वक्रता आहे. पदपूर्वार्ध वक्रतेचे विशेषणवक्रता आणि संवृत्तिवक्रता हे आणखी दोन प्रकार होतात.

पदपूर्वार्ध वक्रतेचे वृत्तिवैचित्र्यवक्रता (वृत्तिचे कृत, तद्धित, समास, एकशेष व सन्नन्त हे पाच भेद) भाववैचित्र्यवक्रता, लिंगवैचित्र्यवक्रता, कर्तन्तरङ्ग विचित्रता, क्रियावैचित्र्यवक्रता, कालवैचित्र्यवक्रता, कारकवैचित्र्यवक्रता. संख्यावैचित्र्यवक्रता, कुरूपवैचित्र्यवक्रता, उपग्रहवैचित्र्यवक्रता आदि अनेक उपभेद सांगितले आहेत.

**तृतीय उन्मेष**

तृतीय उन्मेषात लेखकाने वाक्यवैचित्र्यवक्रतेचे विवेचन केले आहे. त्याचबरोबर वस्तुवक्रतेचे पण विवेचन केले आहे. वस्तु सहज किंवा आहार्य असू शकते.

तिसऱ्या व चौथ्या उन्मेषांमध्ये कारिकांचे स्वतंत्रपण निर्धारण कठीण आहे कारण त्यांचा अन्तर्भाव वृत्तिमध्ये केला आहे किंवा ते पूर्णतः उल्लेखित नाही.

**उदारस्वपरिस्पन्दसुन्दरत्वेनवर्णनम्।**

**वस्तुनो वक्रशब्दैकगोचरत्वेनवक्रता।**

कुंतकाने ह्या जागी 'अपारे काव्यसंसारे परिवर्तते।' हा ध्वन्यालोकात उपलब्ध श्लोक उद्धृत केला आहे. सहज आणि आहार्यचे उत्कृष्ट मिश्रण असलेला विक्रमोर्वशीय नाटकातील श्लोक, 'अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूत' दिला आहे.

कुंतकाने सजीव तसेच अन्य वस्तुंचा काव्यात प्रयोग करण्याविषयी पण लिहिले आहे. तसेच रस, भाव इ. च्या परिपोषाने काव्याला रमणीय कसे करावे हे पण सांगितले आहे. ह्याचप्रमाणे रसवत् प्रेम, उर्जस्वी, समाहित,



उदात्त ह्या पूर्वग्रंथकारांना निरुपित अलंकारांना अलंकार मानावे की नाही ह्याचे विवेचन करून असा निष्कर्ष काढला आहे की हे अलंकार नाहीत तर अलंकार्य आहेत.

भामहाने दीपकाची जी तीन प्रकारे व्याख्या केली आहे, कुंतकाच्या मते ती सदोष आहे.

ह्यानंतर कुंतकाने रूपक, अप्रस्तुत प्रशंसा, पर्यायोक्त, व्याज स्तुति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति इ. २० अलंकारांच्या लक्षणांचे परीक्षण करून त्यांचे आपल्या मतानुसार स्पष्टीकरण केले आहे.

**चतुर्थ उन्मेष**

ह्यात त्यांनी प्रकरण वक्रता व प्रबंध वक्रतेचे विवेचन केले आहे. प्रकरण वक्रतेचे उदाहरण रघुवंशच्या पंचम सर्गातील, 'कि वस्तुविद्वन् गुरवेप्रदिये। यावद्यते साधयितुं तवार्थम्।' हे दिले आहे.

तसेच शाकुंतलातील दुर्वासांच्या शापाचे नियोजन प्रकरण वक्रतेचे सुंदर उदाहरण म्हणून दिले आहे. रामायण आणि महाभारत प्रबंध वक्रतेची उदाहरणे आहे.

महाकवी आपल्या रचनेच्या नामकरणात व उदाहरणात सुद्धा आपल्या कल्पनेचा चमत्कार दाखवितो.

**आस्तां वस्तुषु वैदग्धं काव्ये कामापि वक्रताम्।**

**प्रधान संपिधानाङ्गनाम्नापि कुरूते कविः।**

कुंतकाने उदाहरणस्वरूप अभिज्ञान शाकुंतल, मुद्रा राक्षस, प्रतिमानिरुद्ध, मायापुष्पक, कृत्यारावण इ. चा उल्लेख केला आहे. तसेच त्यांनी हयग्रीववध, शिशुपालवध, पाण्डवाभ्युदय, रामानन्द, रामचरित आदि नावांना सौन्दर्यहीन म्हटले आहे.

कथानक एकसारखे असूनसुद्धा प्रतिभा गुणांनी त्यात पृथक् सौंदर्य उत्पन्न केले जाते.

**कथोन्मेषे समानेऽपि वपुषीव निजैर्गुणैः।**

**प्रबन्धाः प्राणित इव भासन्ते हि पृथक् पृथक्।**

वक्रोक्तिजीवितामध्ये ध्वनि किंवा व्यंग्याची काव्याच्या आत्माच्या

रूपाने स्वतंत्र सत्ता असण्याचे प्रतिपादन केले आहे आणि वक्रोक्तिच्या व्यापक स्वरूपात त्यांचा अंतर्भाव करण्याचा प्रयत्न केला आहे. सामान्य पद्धतीपेक्षा किंवा त्यापेक्षा उच्च प्रकारच्या वस्तुला ते काव्याचा आत्मा मानतात.

कुंतकाने सर्वाधिक जोर कविव्यापारावर दिला आहे आणि त्यानंतर सौंदर्यजन्य आनंदावर. त्याचा आस्वाद केवळ सहृदयच काव्य किंवा नाटकातून घेतात.

**श्रेष्ठता**

वक्रोक्तिजीवित एक मूल्यवान कृती आहे. परंतु ती अत्यंत उपेक्षित अवस्थेत आहे. तिचा उद्धार अत्यंत आवश्यक आहे. वक्रोक्तिला काव्याचा आत्मा मानण्याबाबत किंवा कुंतकाद्वारा प्रस्तुत विचित्र संज्ञा, परिभाषांबाबत कोणी काहीही म्हणो परंतु हा ग्रंथ मौलिकता, महान साहित्यिक, कुशाग्रता आणि सुंदर विचारांनी परिपूर्ण आहे. त्यांनी अत्यंत उपयुक्त उदाहरणे निवडली आहेत आणि आपल्या क्षेत्राचा विस्तार केला आहे. ह्या ग्रंथात ५०० पेक्षा अधिक उदाहरणे आहेत. कारिकांची रचना सुद्धा सरळ आणि स्पष्ट पद्धतीने केली आहे. वृत्तींची रचना उच्च साहित्यिक शैलीत केली आहे, ज्यात माधुर्य आणि सरस गुण आहेत. त्यांनी अलंकारांना आपल्या वक्रोक्ती सिद्धांतासह स्थापन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी आपल्या पूर्ववर्ती कोणत्याच आचार्याचे अंधानुकरण केले नाही. त्या सर्वांवर टीका केली आहे. तरी सुद्धा दण्डी, आनंदवर्धन आणि भामहाचे ते प्रशंसक आहेत.

* *



.१३.

# अभिनव गुप्त

अभिनवगुप्त हे मध्ययुगीन भारतात होऊन गेलेल्या महान व्यक्तींपैकी एक होते. ते अत्यंत प्रतिभावान आणि प्रकांड पंडित होते. (१) हे काश्मिरी शैव ब्राह्मण व महान आचार्य होते. तंत्रशास्त्र व साहित्यशास्त्र यांचे प्रकांड पंडित असलेले अभिनवगुप्त हे क्षेमेन्द्र व मम्मट यांच्या पूर्वी आणि भट्टनारायणाच्या आधी होऊन गेले. ते अत्यंत ज्ञानी होते व अनेक ग्रंथांचे ते प्रणेता मानले जातात. त्यांच्या काही ग्रंथांवरून आम्हाला त्यांचे पूर्वज, माता-पिता, अन्य संबंधी, गुरू तसेच त्यांच्या रचनांविषयी पुरेशी माहिती मिळते. अभिनवगुप्तांनी आपल्या पूर्वजांचा संक्षिप्त परिचय 'परा त्रिंशिका' टिकेच्या अंती तसेच 'ईश्वरप्रत्यभिज्ञाविवृत्तिविमर्शिकी'च्या अंती दिला आहे.

**जीवनवृत्त**

अभिनवगुप्त आपल्या बालपणी अत्यंत खोडकर होते. अभिनवगुप्त शब्द त्यांच्या नावासह का जोडल्या गेला? ह्याविषयी त्यांनी स्वतः सांगितले आहे की ते बालपणी आपल्या सवंगड्यांना सापाप्रमाणे घाबरवीत. म्हणून त्यांना 'गुप्तपाद' म्हटले जाऊ लागले. त्यांच्या गुरूने त्यांचे हेच नाव ठेवले. ह्याच नावाला त्यांनी आपल्या नावासह जोडले. अभिनवगुप्तांनी त्यांच्या काळातील जवळपास सर्वच प्रसिद्ध विद्वानांकडून ज्ञान प्राप्त केले होते. त्यांनी आपल्या कवींच्या कृतींमध्ये सात विशेष गुरूंचा उल्लेख केला आहे, ज्यांच्यापासून त्यांनी भिन्नभिन्न विद्या ग्रहण केल्या होत्या. ह्याशिवाय एका अन्य सूचीत त्यांनी अन्य १३ गुरूंचा सुद्धा उल्लेख केला आहे. (२)

यांचे घराणे विद्या व तांत्रिक साधना याबाबतीत काश्मिरमध्ये प्रसिद्ध होते. अभिनवगुप्तांची ज्ञानतृष्णा विलक्षण होती. अनेक गुरूंच्या जवळ ते विद्या शिकले. जालंधर येथे जाऊन आचार्य शंभुनाथ यांच्याजवळ त्यांनी कौलिक मताचे प्रगाढ अध्ययन केले. आपल्या पित्याकडून व्याकरण, भूति राजाकडून ब्रह्मविद्या, लक्ष्मणगुप्ताकडून त्रिकदर्शन, महेंद्र राजाकडून ध्वनिशास्त्र,

भट्टनोत याच्याकडून नाट्यशार्स अशा विविध गुरूंकडून विविध विद्या त्यांनी संपादन केल्या.

कौलसाधनेत त्यांना शांति व सिद्धि या दोन्ही विद्या प्राप्त झाल्या.

परा त्रिंशिकेत भैरव (शिव) आणि भैरवी (शक्ती)चा ३५ श्लोकांत संवाद दिला आहे. त्यांच्या कथनानुसार त्यांचे पूर्वज आरंभी अन्तर्वेदी (गंगा आणि यमुनेच्या मधील प्रदेश) प्रदेशात रहात होते. ते काश्मिरचा राजा ललितादित्याच्या आमंत्रणावरून काश्मिरला आले. राजतरंगिणीनुसार जयापीडनंतर ललितापीडाने ७८३ पासून ७९५ इ.च्या मध्ये १२ वर्षे राज्य केले. अभिनवगुप्तांच्या परिवारात वराहगुप्ताचा जन्म झाला. वराहगुप्ताचा पुत्र चुरबल शिवाचा मोठा भक्त होता. अभिनवगुप्त त्याचाच पुत्र होता. मालिनी विजयवार्तिकाच्या आरंभी अभिनवगुप्ताने असे लिहिले आहे,

**गुरूभ्योऽपि गरीयांसं युक्तं श्री चुरबुलाभिधम्।**
**वन्दे यत्कृत्संस्कारः स्थितोऽस्मि गलितग्रहः।**

जयरथाच्या मतानुसार अभिनवगुप्ताच्या पित्याचे नाव नृसिंहगुप्त व आईचे नाव विमल किंवा विमलकला होते. अभिनवगुप्ताला 'योगिनी भूः' नावाने संबोधित केले जात असे, कारण ते उच्च आध्यात्मिक व्यक्तीचे पुत्र होते. म्हणूनच ते त्रिक्शास्त्रावर लिखित संपूर्ण आगमांचा संग्रह करून त्यांची रचना करण्यास समर्थ होते.

**गुरूपरंपरा**

तंत्राच्या अध्ययनात त्याची गुरूपरंपरा ह्याप्रमाणे होती, सुमतिनाथ–सोमनाथ– –शंभुनाथ–अभिनवगुप्त. अभिनवगुप्ताने म्हटले आहे की त्याने ज्ञानाच्या शोधात तर्क (न्याय, वैशेषिक) पद्धतींचा, बौद्ध अरहत तसेच वैष्णव सिद्धांतांच्या पंडितांचा आश्रय केला. अभिनवगुप्त यौगिक अभ्यासात कुशल होते. त्यांचा असा विश्वास होता की त्यांनी शिव अथवा परमसत्याला प्राप्त केले आहे. त्यांचा असाही विश्वास होता की शिवाच्या प्रेरणेने ते आध्यात्मिक ज्ञान व शांतिच्या शोधात निघालेल्या सामान्य लोकांना मुक्तीचा मार्ग दाखवू शकतात. स्वतः सिद्धि प्राप्त केली असून सुद्धा दुसऱ्यांवर उपकार करण्यासाठी त्यांनी ग्रंथांची रचना केली.



प्रत्यभिज्ञाविमर्शिनीच्या अंती अभिनवगुप्त म्हणतात की 'शिवदृष्टी'मध्ये गुरूद्वारा निरुपित मार्गाला त्यांनी सरल व सर्वग्राह्या बनविले आहे. जो कोणी पुरुष ह्या मार्गाचे अनुसरण करतो तो पूर्ण बनतो आणि शिवात विलीन होतो. त्यांनी आपल परमार्थसारच्या अंतीम श्लोकात उद्घोषित केले आहे की त्यांनी १०० आर्या छन्दात रहस्यतत्त्वाचा सारांश दिला आहे.

अभिनवगुप्ताने शिवाच्या चरणांशी बसून अध्यात्मज्ञान प्राप्त केले. १३व्या आघ्निकाच्या २१५व्या श्लोकात त्यांनी सुनिश्चल, रुद्रभक्ती, मंत्रसिद्धी, सर्वतत्त्वत्वशिव, कृत्यसंपद् (प्रारब्दकार्य निष्पत्ति) ह्या पाच गुणांचा उल्लेख केला आहे. हे पाच गुण उच्च आध्यात्मिक सिद्धिप्राप्त व्यक्तीमध्येच असतात. अभिनवगुप्तात हे पाचही गुण होते.

काश्मिरी परंपरेनुसार अभिनवगुप्त आपल्या १२०० शिष्यांसह भैरवी स्तोत्राचा पाठ करीत एका गुहेत प्रवेशले व अंतर्धान पावले. डॉ. ग्रियर्सनच्या मते ही गुहा बीरू किंवा प्राचीन नाव बहुरूपा येथे आहे, जी श्रीनगरपासून १३ मैल दक्षिण–पश्चिम दिशेला आहे.

**काळ**

अभिनवगुप्तांचे पूर्वज त्यांच्या जन्माच्या साधारणपणे २०० वर्षे आधी कन्नौज येथून काश्मिरला स्थायिक झाले. त्यावेळी काश्मिरचा राजा ललितादित्याने कन्नौजचा राजा यशोवर्माला पराभूत केले होते. त्यांचे पूर्वज अत्रिगुप्त, यशोवर्माच्या सभेत प्रतिष्ठित विद्वान होते. यशोवर्माने त्यांना आपल्यासह आदराने काश्मिरला नेले. त्यांनी वेतसा नदीच्या किनारी शिवमंदिराच्या समोर राज्यशासनाद्वारा दिल्या गेलेल्या भूमीवर आपले निवासस्थान केले. ह्याच अत्रिगुप्ताच्या वंशामध्ये अभिनवगुप्तांचे पितामह वराहगुप्त आणि त्यांचे पिता चुखुल नृसिंहगुप्त यांचा जन्म झाला. हे दोघेही प्रतिष्ठित विद्वान होते.

अभिनवगुप्तांचा काळ ठरविण्यात अडचण येत नाही कारण अभिनवगुप्ताने आपल्या तीन कृतींमध्ये रचनाकाळ दिला आहे. त्यांची रचना 'ईश्वरप्रत्यभिज्ञाविवृताविमर्शिनी'च्या शेवटी ह्या ग्रंथाच्या रचनातिथीचा उल्लेख ह्याप्रकारे केला आहे.

**इति नवति तमेऽस्मिन्वत्सरेऽन्ते युगांशे तिथि**
**शशिजलाधिस्ये मार्गशीर्षावसाने।**
**जगति विहितबोधामीश्वरप्रत्यभिज्ञाव्यवृणुत परिपूर्णा**
**प्रेरितः शम्भुपादैः।।**

ह्याचे तात्पर्य असे की ही रचना ४११५ कविवर्षात पूर्ण झाली तर लौकिक वर्ष मार्गशीर्ष अंती पूर्ण झाली. त्यानुसार 'बृहद विमर्शनी' इ.स.९९० मध्ये लिहिली गेली. 'क्रमस्तोत्र' इ.स. ९९२ मध्ये लिहिले गेले आणि 'भैरवस्तोत्र' इ.स. १०४४ मध्ये लिहिले गेले. अशाप्रकारे अभिनवगुप्तांचा काळ १०व्या शतकाचा अंतिम भाग आणि ११व्या शतकाचा पूर्वार्ध होतो.

अभिनवगुप्ताचा साहित्यिक रचनाकाळ ९८०-१०२० इ. चा मध्य केवळ ३५ ते ४० वर्षांचाच आहे. अभिनवगुप्ताने आपली पहिली रचना वयाच्या ३०व्या वर्षी केली असे मानले तर त्याचा जन्म ९५० इ. असा निश्चित होतो.

अभिनवगुप्ताने आपला एक शिष्य कर्ण ह्याच्यासाठी परात्रिंशिकावर टीका लिहिली. हा कर्ण, राजा यशस्करच्या एका मंत्र्याचा पुत्र होता. त्याचा मृत्यू ९४८ इ. मध्ये झाला.

क्षेमेन्द्राने बृहत्कथामंजरी व भारतमंजरीच्या शेवटी म्हटले आहे की त्याने साहित्याचे अध्ययन अभिनवगुप्तापासून केले. क्षेमेन्द्राने सन १०५० मध्ये मातृकाची रचना केली व इ.स. १०६६ मध्ये दशावतारचरिताची. त्याचा साहित्यिक कार्यकाळ इ.स. १०३० ते १०७० चा मध्य मानला जातो. ह्यावरून स्पष्ट होते की क्षेमेन्द्र अभिनवगुप्ताच्या उत्तरवर्ती जीवनकाळात त्यांच्या संपर्कात आले होते.

**रचना**

अभिनवगुप्तांच्या रचनांची संख्या ४१ आहे. ह्यातील काही अत्यंत विशाल तर काही अत्यंत संक्षिप्त म्हणजे केवळ १० ते १२ श्लोकांपर्यंत मर्यादित आहेत. ह्या ४१ रचनांमध्ये साहित्यशास्त्राशी संबंधित केवळ ३ रचना आहेत. उर्वरित रचना दर्शन किंवा दर्शनसंबंधी विषयांवर लिहिल्या गेल्या आहेत. नाट्यशास्त्रावरील टीका अभिनवभारती, ध्वन्यालोकावरील टीका आणि



घटकर्पर नावाचे काव्य ह्या त्यांच्या साहित्यिक रचना आहेत. घटकर्पर काव्यासंबंधी विवाद आहेत, परंतु पहिल्या दोन रचना निर्विवाद आहेत.

त्यांच्या रचना चार भागांमध्ये विभाजित होतात, तंत्रसंबंधी रचना (ह्यामध्ये मालवी, परात्रिंशिका विवरण, तंत्रालोकसार इ. रचना येतात), स्तोत्रे (ह्यात क्रमस्तोत्र, भैरवस्तोत्र, बौद्ध पंचदशिका येतात), टीकारचना (ह्यामध्ये अभिनव भारती व लोचन येतात), दर्शनसंबंधी रचना (ह्यामध्ये ईश्वरप्रत्यभिज्ञा, विमर्शनी, विवृत्ति विमर्शनी आणि मालिनीविजय वार्तिका येतात)

अभिनवगुप्तांच्या मातेचा मृत्यू त्यांच्या बालपणीच झाला. त्यांच्या वडिलांना संन्यास घेतला होता. त्यामुळे अभिनवगुप्त सुद्धा विरक्त झाले. ते आजीवन अविवाहित राहिले. अद्वैत वेदान्त त्यांचा विशेष प्रिय विषय होता. अभिनवगुप्तांनी वेदान्ताला एक नवीन स्वरूप दिले होते आणि 'प्रत्यभिज्ञादर्शन' नावाने एका नवीन दर्शनाचा सूत्रपात केला. नंतर हे दर्शन अत्यंत प्रसिद्ध झाले.

**रचना**

ग्रंथ, टीका व स्तोत्रे धरून त्यांनी केलेल्या रचना ५०च्या वर आहे. यांच्या प्रमुख ग्रंथांचे स्वरूप असे आहे.

१) **तंत्रालोक** - हा तंत्रशास्त्रावरचा विश्वकोशच आहे. याचे ३७ परिच्छेद आहेत. यात तंत्रशास्त्राचे सिद्धांत, तंत्राच्या प्रक्रिया, तंत्रविषयक नाना मते, बंधमोक्ष, मोक्षाचे स्वरूप, परमार्थसाधक उपाय, शैवाचाराच्या विविध प्रक्रिया इ. विषयांचे सुंदर व साधार विवरण आहे.

२) **ध्वन्यालोक लोचन** - हे आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकावरचे प्रौढ व्याख्यान आहे. अभिनवगुप्तांच्या अनेक रस सिद्धातांबद्दल साहित्यशास्त्र त्यांचे ऋणी आहे. त्यांचे रसविषयक विवेचन वैज्ञानिक व युक्तिसंगत आहे.

३) **अभिनव भारती** - भरतमुनीच्या नाट्यशास्त्रावरचे पांडित्यपूर्ण व प्रमेयासह व्याख्यान. हा ग्रंथ नसता तर नाट्यशास्त्रांतील तत्त्वांचा पत्ता आजही लागला नसता.

४) **ईश्वरप्रत्यभिज्ञान विमर्शिनी** - हा ग्रंथ अभिनवगुप्तांच्या प्रौढ पांडित्याचा आदर्श आहे.

याशिवाय त्यांचे परमार्थविचार, बोधपंचदशिका, तंत्रसार, तंत्रोश्चय, भगवद्गीतार्थसंग्रह असे आणखी काही ग्रंथ आहेत.

अभिनवगुप्ताने लिहिले आहे की त्याने आपला बंधू मनोरथगुप्त, काश्मिरचा राजा यशस्कराचा मंत्री वल्लभाचा पुत्र कर्ण नामक ब्राह्मण तसेच व्याकरण, तर्क व मीमांसेत कुशल रामदेवासाठी परा त्रिंशिका ग्रंथावर भाष्य लिहिले. त्याचप्रकारे त्यांनी आपला शिष्य कर्ण तसेच मन्द्रच्या आग्रहावरून 'मालिनीविजयवार्तिक'ची रचना केली. हास्याभासासाठी अभिनवगुप्ताने त्याचे काका वामनगुप्ताचे पद्य अभिनवभारतीत उद्धृत केले आहे. त्याने लिहिले आहे की त्याचे मामा यशोराग एक अत्यंत प्रसिद्ध व्यक्ती होते.

**इति षोडषमध्यायं ग्रन्थनिर्ग्रन्थिकं व्यधात्।**
**यशोराशेर्यशोरागनाम्नो दौहित्र देहजः।।**

अभिनवगुप्ताने त्याचा उल्लेख गर्वाने केला आहे. ह्यावरून असे दिसून येते की अभिनवगुप्ताचे हे नातलग निश्चितच उच्चपदावर होते. परंतु ह्यावेळी तरी आम्हाला यशोरागाविषयी माहिती नाही.

पांडित्यात त्यांचा अधिकार मोठा असल्यामुळेच नारदाच्या संगीत मकरंदात त्यांना 'महोदेश्वराचार्य' अशा उपाधीने गौरविले आहे. व्याकरणाच्या इतिहासात पतंजलिचे व वेदान्ताच्या इतिहासात वाचस्पतिमिश्रांचे जे महत्त्वपूर्ण स्थान आहे तेच अलंकारशास्त्रात अभिनवगुप्तांचे आहे. यांनी अलंकारशास्त्राला दर्शनाच्या पदवीवर आरूढ केले. अभिनवगुप्त केवळ तार्किक नव्हते तर विश्वाचे रहस्य शोधणारे मर्मज्ञ साधकही होते.

अभिनवगुप्त यौगिक अभ्यासात कुशल होते. त्यांचा असा विश्वास होता की त्यांनी शिव अथवा परम सत्याला उपलब्ध केले आहे तसेच ते शिवाच्या प्रेरणेने आध्यात्मिक ज्ञान व शांतिच्या शोधात निघालेल्या साधारण लोकांना मुक्तीचा मार्ग दाखवू शकतात. स्वतः सिद्धि प्राप्त करूनसुद्धा त्यांनी दुसऱ्यांवर उपकार करण्यासाठी ग्रंथांची रचना केली. 'प्रत्यभिज्ञा विमर्शिनी'च्या अंती अभिनवगुप्तांनी म्हटले आहे की 'शिवदृष्टीत गुरूद्वारा निरुपित मार्गाला त्यांनी सरल व सर्वग्राह्य बनविले आहे. जो कोणी व्यक्ती ह्या मार्गाचे अनुसरण करतो तो पूर्ण बनतो आणि शिवात विलीन होऊ शकतो.'



त्यांनी आपल्या परमार्थसारच्या अंतिम श्लोकात (१०५) उद्घोषित केले आहे की त्यांनी १०० आर्या छंदात रहस्यतत्त्वाचा सारांश दिला आहे.

अभिनवगुप्तांनी शिवाच्या चरणाशी बसून अध्यात्मज्ञान प्राप्त केले. १३व्या अह्निकाच्या २१५व्या श्लोकात त्यांनी सुनिश्चन, रुद्रभक्ती, मन्त्रसिद्धि, सर्वतत्त्वशिव, कृत्यसंपद् (प्रारब्धकार्य निष्पत्ति) ह्या पाच गुणांचा उल्लेख केला आहे. उच्च आध्यात्मिक सिद्धि प्राप्त व्यक्तीमध्येच हे गुण असतात.

अभिनवगुप्त निर्भिडपणे असे म्हणतात की प्रत्यभिज्ञादर्शनाचा संबंध मानवमात्राशी आहे, मग तो कोणत्याही मतसंप्रदायाचा अनुयायी असो.

त्यांनी ज्ञानप्राप्ती व प्रतिभेच्या विकासासाठी अनेक आचार्यांच्या जवळ अध्ययन केले. त्यांच्या रचनांना अनेक वर्गात विभक्त करता येते. त्यांच्या रचनांचा एक वर्ग तंत्रविषयक आहे. 'तन्मात्रालोक' ही त्यांची एक विशाल रचना आहे. ह्यात तन्मात्रालोकात नमूद केलेल्या आगमतंत्रांचे विवेचन केले आहे. उदा. **दशाष्टादशवस्वष्ट भिन्न यच्छासनं विभोः।**
**तत्सारं त्रिक्शास्त्रं हि तत्सारं मालिनी मतम्।।**

ह्याचा अर्थ आहे १०, १८ आणि ६४. चौसष्ट चे ८ चे ८ वर्ग बनविले आहेत तन्मात्रालोकनुसार जो कोणी ह्या ३७ आह्निकांना लक्षपूर्वक वाचेल तो स्वतः भैरव होईल. (१.२१४.१५)

ह्याच भागात मलिनीविजय वार्तिक (काश्मीरच्या पूर्वभागाच्या प्रवरपुरात अभिनवगुप्तद्वारा लिखित) परा त्रिशिंकाविवरण, तन्मात्रालोकसार इ. ग्रंथ येतात.

दुसऱ्या वर्गात स्तोत्र येतात ज्याचे नाव भैरवस्तवन, क्रमस्तोत्र इ. आहे. तसेच ह्यातच बोधपंचाशिका इ. लघुग्रंथ येतात. तृतीय वर्गात काव्यशास्त्र व नाट्यशास्त्रसंबंधी रचना येतात. काव्यशास्त्रात त्यांचे गुरु इन्दुराज होते व नाट्यशास्त्रात तौत होते. लोचनाच्या अंती ध्वन्यालोकाच्या चौथ्या उद्योतात सिद्धिचेल व इन्दुराज ह्या दोन गुरूंचा उल्लेख केला आहे.

**सिद्धिचेल चरणाब्ज परागपूते भट्टेन्दुराजमति संस्कृतबुद्धिलेशः।**

ह्या दोन वर्गांमध्ये प्रस्तुत लोचन तसेच अभिनवभारती ह्या दोन रचना ज्ञान, समीक्षा कौशल, साहित्यसौंदर्य व शैलीच्या उत्कृष्टतेचे द्योतक आहेत.

अभिनवगुप्तांच्या रचनांचा चौथा वर्ग काशिमरच्या शैवाद्वैत दर्शनाशी (प्रत्यभिज्ञाशास्त्र) संबंधित आहे. त्यांनी आपला ग्रंथ ईश्वरप्रत्याभिज्ञाविमर्शिनी (१.१.२०५) मध्ये गुरुपरंपरेचा उल्लेख केला आहे. त्र्यंबक त्यांचा संस्थापक होता. त्यांच्या परिवारात सोमानंद नाथांचा जन्म झाला होता. त्यांनी ह्या पद्धतीची शिवदृष्टि नामाने व्याख्या केली. उदयाकरचा पुत्र उत्पल सोमानंद नाथाचा शिष्य होता. त्याने १९० कारिकांमध्ये प्रत्यभिज्ञा सूत्राची रचना केली व स्वतःच त्यावर वृत्ती व टीका लिहिली. त्याचा शिष्य लक्ष्मणगुप्त होता आणि अभिनवगुप्त लक्ष्मणगुप्तचा शिष्य होता. लक्ष्मणगुप्ताची कोणतीही रचना आजपर्यंत उपलब्ध नाही. ईश्वरप्रत्यभिज्ञाविवृत्ति विमर्शिणीच्या अंती तिसरा श्लोक असा आहे,

**श्रीशास्त्रकृद्धहित लक्ष्मणगुप्तपाद सत्योपदर्शित शिवाद्वयवाद् दृप्तः।**

मालिनी विजयवार्तिकात अभिनव गुप्ताने आपले गुरू लक्ष्मणांची खूप प्रशंसा केली आहे. स्वतः अभिनवगुप्ताने प्रत्यभिज्ञाशास्त्रावर दोन महत्त्वपूर्ण रचना लिहिल्या आहेत. एक उपलदेवाच्या प्रत्यभिज्ञा कारिकेत ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिणी (जिला लघुवृत्ती पण म्हणतात) आणि त्याच्या प्रत्यभिज्ञाकारिकेवर उपदेव लिखित टिकेवर ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिणी (जिला बृहत्वृत्ती सुद्धा म्हणतात) नावाची दुसरी रचना केली आहे.

साहित्यशास्त्राच्या क्षेत्राला लाभलेली त्यांची विशेष देणगी म्हणजे ध्वनिसिद्धांताची सांगोपांग व्याख्या होय. हा त्यांच्या श्रमशक्तीचा, विचारशक्तीचा तसेच युक्तिपूर्ण विवेचनाचा परिणाम होता की पश्चाद्वर्ती आलंकारिकांनी ध्वनिसिद्धांताचा सहर्ष स्वीकार केला. भरतमुनीच्या नाट्यशास्त्राची सुद्धा अभिनवगुप्तांना विशेष आवड होती. ह्या सूत्रांवर अभिनवगुप्ताच्या पूर्वी सुद्धा दीर्घकाळ चिंतन होत होते. अनेक विद्वानांनी ह्यावर आपली मते प्रकट केली होती. ह्या सर्व मतांना प्रस्तुत करून सुद्धा अभिनवगुप्ताने एक सर्वग्राह्य व नवीन व्याख्या प्रस्तुत केली. त्याच्या आधी झालेल्या सर्व आलंकारिकांनी रससूत्राची व्याख्या नाटकाच्या संदर्भातच केली होती. काव्यवाचक सहृदयांच्या परिस्थितीला समजण्याचा प्रयत्न आणि त्यांच्या अनुकूल ह्यांची व्याख्या अभिनवगुप्तानेच केली होती. त्यांच्या ह्या





व्याख्येला अधिक परिष्कृत मम्मट, विश्वनाथ, पंडितराज जगन्नाथ ह्यांनी केले. ह्या अभिव्यक्तीसाठी ध्वनिच्या योगदानाला ज्या हिंमतीने आणि स्पष्टतेने त्यांनी प्रस्तुत केले तसे अन्य दुसऱ्या विद्वानाने केले नाही. काव्यसिद्धांतामध्ये रस आणि ध्वनिचे समन्वयन सुद्धा त्यांनीच केले. काव्यतत्त्वांमध्ये रसाला सर्वाधिक महत्त्वपूर्ण स्थान सुद्धा अभिनवगुप्तानेच दिले. आनंदवर्धनांसारखे विद्वान रसध्वनिच्या बरोबरच वस्तु आणि अलंकारध्वनिला सुद्धा महत्त्व देत होते. परंतु अभिनवगुप्ताने अत्यंत स्पष्टपणे रसाची प्रमुखता सिद्ध केली. त्यांनी स्पष्ट उद्घोषणा केली की काव्याचे सार रसच आहे. 'रसेनैव सर्वं जीवति काव्यं नहि तद् चिन्तनीयं यत् रसशून्यं काव्यं किंचिदस्ति।' हा एक नवीन मार्ग होता, ज्यामुळे कृत्रिमपक्ष आणि हृदयपक्ष दोन्ही स्वतंत्र झाले. अभिनवगुप्ताच्या मते वस्तु आणि अलंकार सुद्धा शेवटी रसातन समाहित होतात. 'वस्तु अलंकार ध्वनि तु सर्वथा रसं प्रतिपर्यवस्येते।'

अशाप्रकारे दिसून येते की ज्या रससिद्धांताला मम्मट आणि विश्वनाथ इ. लोक काव्याच्या आत्मतत्त्व किंवा आत्मरूपाला स्वीकार करतात. रस आणि ध्वनीसंबंधी त्यांचे विचार इतके दृढ होते की ज्यामुळे ह्या दोन्ही सिद्धांतांची मुळे खोलवर रुजली. डॉ. एस. के. डे यांच्या मते एका विचारकाच्या रुपात अभिनवगुप्ताचा समकक्ष अलंकारक्षेत्राच्या क्षेत्रात अन्य कोणी नाही. विषयाची स्पष्टता, प्रतिपाद्याची संदेशरहित व्याख्या आणि नूतन सिद्धांतांचे प्रतिष्ठापन ह्या अभिनवगुप्तांच्या विशेषता आहेत. जरी त्यांनी कोणत्याच स्वतंत्र अलंकारग्रंथाची रचना केलेली नाही तरी त्यांच्या विचारतत्त्वांचे मूल्य इतके आहे की अलंकारशास्त्राचे अधिकांश सिद्धांत त्यांच्या व्याख्येशिवाय अपूर्ण भासतात. रस आणि ध्वनि तर विशेषपणे त्यांच्या व्याख्येशिवाय पांगळे वाटतात. भाषेचे काठिण्य त्यांच्या सिद्धांतामध्ये बाधक होत नाहीत. साहित्याच्या क्षेत्रात दर्शनाचा भरपूर प्रभाव पाडण्याचे श्रेय सुद्धा अभिनवगुप्तालाच आहे.

* *

## .१४.
# भोज

भोज हा धारानगरीचा राजा होता. त्याच्या दरबारात अनेक विद्वानांना राजाश्रय लाभला होता. एक रसिक राजा म्हणून त्याची प्रसिद्धी होती.

**काळ**

अंतर्गत व बाह्य पुरावे भोजाचा काळ निश्चित करण्यास पुरेसे आहे. हेमचंद्र १२व्या शतकातील काव्यशास्त्राचे प्राचीनतम लेखक आहेत. त्यांनी भोजाचा उल्लेख केला आहे. वर्धमान ११४० इ. च्या नंतर सुद्धा एका पद्याच्या वृत्तीमध्ये भोजाला 'सरस्वतीकण्ठाभरणम्'चा रचयिता म्हणतात. राजशेखर अर्वाचीनतम लेखक आहेत, ज्यांचा भोजाने उल्लेख केला आहे. त्यांचा काळ हा १०व्या शतकाचा प्रारंभ मानला जातो. भोज, दशरुपक व त्याच्या अवलोक टीकेच्या पद्यांचे १६वे उदाहरण देतात. हे दोघे मुंजकालीन होते व त्यांचा काळ १०व्या शतकाचा उत्तरार्ध तसेच ११व्या शतकाचा आरंभिक चरण मानला जातो. ह्या सर्व आधारांनुसार सरस्वतीकण्ठाभरणाच्या लेखकाला ११व्या शतकाच्या दुसऱ्या चरणापासून चौथ्या चरणाच्या मध्ये मानणे योग्य होईल. डॉ. एस. के. डे यांच्या मतानुसार हा काळ परमार वंशाच्या ११व्या शतकातील धारानरेशाशी मिळणारा आहे. हा राजा आपल्या साहित्यिक अभिरुचीसाठी प्रसिद्ध होता. कल्हणाच्या उल्लेखावरून हे कळते की तो सिंधुराजाचा पुत्र तसेच उत्तराधिकारी व विद्याप्रिय भुंजवाक्पतिराजाचा भाचा होता. अनेक ऐतिहासिक पुरावे, शिलालेखांवरून त्याची कालमर्यादा जवळपास इ. १०१० पासून इ. १०५५ पर्यंत निश्चित करण्यास मदत होते.

भोज यांनी खगोलशास्त्रासंबंधी ग्रंथ करण अथवा राजमृगांकची रचना जवळपास इ.स. १०४०-१०४३ मध्ये केली. भोजप्रबन्धात आलेल्या उल्लेखानुसार असे दिसते की भोज ५५ वर्षे राज्य करेल अशी भविष्यवाणी होती. भोजाचा काका मुंज ९९४-९९७ मध्ये तैल्यद्वारा मारल्या गेला. मुंजाचा उत्तराधिकारी त्यांचा बंधू सिन्धुराज, सिन्धुल किंवा नवसाहसाङ्क झाला.



धारानरेश जयसिंहाच्या मान्धाता शिलालेखवरून हे स्पष्ट होते. भोज इ.स. १०५४ नंतर जीवित नव्हता. भोजाचा राज्यकाल बराच होता.

राजा सिन्धुराजाच्या आदेशावरून त्याने नवसाहसाङ्कचरित लिहिले. त्यात त्याच्या आक्रमणांचे वर्णन आहे. म्हणून सिंधुराजाने सुद्धा काही वर्षे राज्य केले असेल. ह्यावरून हे निश्चित होते की भोज इ.स. १००५ च्या आसपास राजगादीवर बसला, त्यापूर्वी नाही.

सरस्वतीकण्ठाभरण आणि श्रृंगारप्रकाशाची रचना १००५ ते १०५०च्या मध्ये झाली असावी.

प्राचीन व मध्यकालीन भारतातील सुप्रसिद्ध राजांमध्ये भोज एक राजा होता. तो कवि व साहित्याचा महान आश्रयदाता, मंदिरांचा निर्माता व साहित्याचा स्त्रष्टा म्हणून प्रसिद्ध होता. मालव राजांच्या उदयपूर प्रशस्तित भोजाच्या यशाविषयी असा श्लोक येतो,

**साधितं विहितं दत्तं ज्ञातं तघन्न केनचित्**
**विमन्यत् कविराजस्य श्रीभोजस्य प्रशस्यते।**

राजतरंगिणीत भोजाला कविबांधव म्हटले आहे.

सरस्वतीकण्ठाभरणात भोजाचा उल्लेख असा येतो,

**जयजय श्रीमन् भोज प्रभाति।**
**विभावरी वद वद वद श्रव्यं विद्वन्निदं हयवधीयते।**
**शृणु श्रृणुश्रृणु त्वद्वत्सूर्योऽनुरज्यति मण्डलं**
**नहि नहि नहि क्षमा मार्तण्डः क्षणेन विरज्यते।**

भोजाच्या काही रचना विशाल आहेत. त्याने काव्यशास्त्र व व्याकरणावर सरस्वतीकण्ठाभरणम् नावाचा ग्रंथ लिहिला. त्याचा 'समरांगण सूत्रधार' नावाचा ग्रंथ आहे. त्यात ७००० श्लोक आहेत. धर्मशास्त्रावरून असे ज्ञात होते की त्यांनी भूपालकृत समुच्चय, भुजबल भीम, संस्कारतत्व, राजमार्तण्ड इ. ग्रंथ लिहिले. भोजाने श्रृंगारप्रकाश व्यतिरिक्त श्रृंगारमंजरी नावाची कथा पण लिहिली. त्यांनी ओषधिंच्या संबंधी राजमार्तण्ड ग्रंथ रचला. ह्यामध्या ४१८ श्लोक आहेत. भोजाने त्याच नावाने पतंजलींच्या योगसूत्रांवर एक टीका लिहिली आहे.

सरस्वतीकण्ठाभरणाच्या टीकेचे नाव रत्नदर्पण आहे. तिची रचना तिरहूतचे राजा रामसिंहदेवाच्या आदेशावरून महामहोपाध्याय रत्नेश्वराने केली. ह्याचा काळ इ. १४वे शतक आहे. केवळ तीन परिच्छेदांवरच टीका प्रकाशित झाली आहे. ही टीका विद्वत्तापूर्ण आहे.

**रचना**

धारानरेश भोजाला ८० पेक्षा अधिक ग्रंथांचा रचयिता मानले जाते. त्यांची प्रसिद्धी विशेषकरून संग्राहक रूपाने आहे. साहित्यिक क्षेत्रात त्यांच्या दोन महत्त्वपूर्ण रचना आहेत. सरस्वतीकण्ठाभरण आणि श्रृंगारप्रकाश. ह्या दोन्ही रचना विश्वकोशाच्या दर्जाच्या आहेत. डॉ. पां. वा. काणे ह्यांना असा संशय आहे की भोजाच्या सर्व रचनांची संख्या इतकी विशाल आहे की त्यावरून असे म्हणता येते की अनेक लेखकांनी रचना करून त्याला भोजाचे नाव दिले असावे. वास्तुशास्त्रावरील त्याची रचना 'समरांगणसूत्रधार' ही ७००० श्लोकांची रचना आहे. धर्मशास्त्रावर भोजाचे अनेक ग्रंथ आहेत. व्याकरणावरसुद्धा विशाल रचना आहेत. पातंजल योगसूत्र व आयुर्वेदासारख्या विभिन्न विषयांवर त्यांच्या रचना उपलब्ध आहेत.

भोज आपल्या विवेचनामध्ये संख्येची एक समानता ठेवतात. त्यांचे सर्व दोष १६ प्रकारचे आहेत. शब्द, अर्थ व उभयालंकार सर्व २४ प्रकारचे आहेत. केवळ भोजच उपमा, आक्षेप, समासोक्ती व अपह्नुतीला उभयालंकार मानतात. बाकी सर्व आचार्य त्यांना अर्थालंकार मानतात. रीतीला सुद्धा ते शब्दालंकारच मानतात व रीतींचे प्रकार ते वैदर्भी, पांचाली, गौडी, लाटी, आवन्तिका व मागधी असे ६ मानतात. जैमिनीच्या सहा प्रमाणांना सुद्धा ते अलंकार करून टाकतात. आठ रसांचे वर्णन करून सुद्धा ते शृंगाराला एकमेव रस मानतात.

**सरस्वतीकण्ठाभरण**

'सरस्वतीकण्ठाभरण' हा एक बृहद् ग्रंथ आहे, परंतु हा अधिकांशरुपाने संग्रहात्मक आहे. हा पाच परिच्छेदांमध्ये विभक्त आहे.

प्रथम परिच्छेदात काव्यप्रयोजन, काव्यलक्षण, काव्यभेद, १६ पददोष, १६ वाक्यदोष, १६ वाक्यार्थदोष, २४ शब्दगुण, २४ वाक्यार्थ गुणांचे



निरुपण आहे.

द्वितीय परिच्छेदात लेखकाने २४ शब्दालंकार, उदाहरणार्थ जाति, रीति, वृत्ति, छाया, मुद्रा, गुंफना, शय्या, यमक, श्लेष, प्रहेलिका आदिंचे विवेचन केले आहे.

तृतीय परिच्छेदात २४ अर्थालंकार जाति, विभावना, हेतु, अहेतु, सूक्ष्म उत्तर, विरोध, संभव, अन्योन्य, परिवृत्ति, निदर्शन, भेद, समाहित, भ्रांति, वितर्क, मीलित, स्मृति, भाव, प्रत्यय, अनुमान, उपमान, आगम, अर्थापत्ति आणि अभावाचे निरुपण आहे.

चतुर्थ परिच्छेदात २४ शब्दालंकार व अर्थालंकारांचे विवेचन केले आहे. ज्यात उपमा, रुपक, साम्य, संशय, अपह्नुति, समाधि, समासोक्ति, उत्प्रेक्षा, अप्रस्तुत प्रशंसा, तुल्ययोगिता, श्लेश (व्याजस्तुति समान), सहोक्ति, समुच्चय, आक्षेप, अर्थान्तरन्यास, विशेषोक्ति, परिकर, दीपक, क्रम, पर्याय, अतिशयोक्ति, श्लेष, भाविक आणि संसृष्टिचे वर्णन आहे.

पाचव्या परिच्छेदात रस, भाव, नायक-नायिका, त्यांचे उपभेद, विशेषता, पाच मुख-प्रतिमुख इ., संधी, भारती इ. चार वृत्तींचे विवेचन आहे.

ग्रंथात एकूण ६४३ कारिका आहेत. ह्यातील काही कारिका जशाच्या तशा रुपात काव्यादर्श, ध्वन्यालोक इ. अन्य रचनांमधून घेतल्या आहेत.

सरस्वतीकण्ठाभरणातील अधिकांश उद्धरणे दण्डीच्या काव्यादर्शातून घेतली आहेत. जवळपास २०० श्लोक काव्यादर्शातील आहेत. प्रसाद ह्या काव्यगुणाची परिभाषा भामहापासून घेतली आहे. सरस्वतीकण्ठाभरणातील १५०० पेक्षा अधिक उदाहरणे पूर्ववर्ती कवींपासून घेतली आहेत. म्हणून हा ग्रंथ संस्कृत साहित्याच्या कालानुत्क्रमणिकेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वपूर्ण आहे.

भोजाच्या विवेचनात सर्वत्र एक प्रकारची प्रमाणबद्धता, समानता आहे. उदा. त्याने पद्याचे १६ दोष तर वाक्याचेही १६ दोष वर्णन केले आहेत. शब्दाचे २४ गुण तर वाक्यार्थाचे पण २४ गुण सांगितले आहेत. रीतिचे ६ प्रकार तसेच वृत्ति आणि मुद्रेचे पण ६ प्रकार दिले आहेत.

उपमा, आक्षेप, समासोक्ति, अपह्नुति आणि काही अलंकारांचा शब्द आणि अर्थाशी संबंध दाखविला आहे, हे त्यांचे स्वतःचे मत आहे. त्यांनी

रीतिला शब्दार्थालंकार मानले आहे. त्यांनी रीतीचे वैदर्भी, पांचाली, गौडी, अवन्तिका, लाटीया व मागधी हे सहा भेद केले आहेत.

जैमिनीच्या ६ प्रमाणांना त्यांनी अलंकारच मानले आहे. जरी प्राचीनांचे अनुकरण करून त्यांनी ८ रस मानले आहेत, परंतु त्यांनी ह्या सर्वांचे विवेचन ज्याप्रकारे केले आहे त्यावरून त्यांना शृंगार हा एकमेव रस अभिप्रेत होता असे दिसते.

**श्रृंगारप्रकाश**

अलंकारशास्त्राच्या क्षेत्रात भोजाचा दुसरा ग्रंथ श्रृंगारप्रकाश आहे. हा ग्रंथ २६ प्रकाशांमध्ये रचला आहे. संस्कृत काव्यशास्त्रामध्ये हा सर्वाधिक दीर्घकाय ग्रंथ मानला जातो.

एकावलित म्हटले आहे की भोजराजकृत श्रृंगारप्रकाशात त्यांनी एकमेव श्रृंगाररस मानला आहे.

**राजा तु श्रृंगारमेकमेव श्रृंकारप्रकाशे रसमुरीचकार।**

रत्नायणामध्ये सुद्धा कुमारस्वामीने सुद्धा हेच मत उद्धृत केले आहे.

**श्रृंगार एक एव रस इतिश्रृंगारप्रकाशकारः।**

श्रृंगारप्रकाश एक बृहद् ग्रंथ आहे. संस्कृत काव्यशास्त्रावर लिहिलेल्या पुस्तकात ही सर्वात विशाल रचना आहे. हा ग्रंथ पूर्णरुपाने अजूनपर्यंत प्रकाशित झालेला नाही. ह्याचे केवळ तीन प्रकाश मेलकोटचे महाराज श्री यतिराज स्वामींच्या अध्यक्षतेखाली प्रकाशित झाले.

श्रृंगारप्रकाशात नाट्यशास्त्र व काव्यशास्त्र या दोहोंचे विवेचन आहे. श्रृंगारप्रकाशात 'शब्दार्थौ संहितो काव्यं' ही काव्याची परिभाषा दिली आहे. हेच भामहाचे पण मत आहे.(१.१६) आणि हेच प्रतिपादित केले आहेत की अभिमान व अहंकाराचे प्रतीक श्रृंगारच एकमात्र रस आहे.

श्रृंगारप्रकाशच्या ३६ अध्यायांची संक्षिप्त विषयसूची अशी आहे.

१. काव्य, शब्द व अर्थाची परिभाषा व प्रत्येकाची १२ कार्ये
२. प्रातिपदिक, त्याचे भेद व उपभेद
३. पद व वाक्याचा अर्थ व त्याचे प्रकार
४. अर्थाचे १२ प्रकार जसे क्रिया, काळ, कारक इ.



५. उपाधिचा अर्थ
६. विभक्तीचा अर्थ
७. शब्दाच्या विभिन्न शक्ती उदा. अभिधा, विवक्षा, तात्पर्य इ.
८. दुसऱ्या शब्दांशी संबंध, शब्दशक्तीचा विकास जसे व्यपेक्षा, सामर्थ्य इ.
९. काव्यामध्ये दोषांचा त्याग व गुणांचे ग्रहण
१०. शब्दालंकार, अर्थालंकार आणि उभयालंकार
११. रस
१२. नाटक व त्याच्या ६४ विशेषता
१३. रतिचा आलंबन विभाग
१४. हर्ष व अन्य ४८ भावांचे दर्शन
१५. रतीच्या आलंबन भावाचे वर्णन
१६. रतिचे उद्दीपन विभाव
१७. अनुमान
१८. धर्मशृंगाराचे वर्णन
१९. अर्थश्रृंगार
२०. कामश्रृंगार
२१. मोक्षश्रृंगार-नायक-नायिका विभाग आणि नायक-नायिका गुण
२२. अनुराग (सामान्य प्रेम)
२३. विप्रलंभ व संयोग श्रृंगार
२४. विप्रलंभ
२५. पूर्वानुराग विप्रलंभ
२६. प्रतीक्षा व अभावाचे वर्णन
२७. अभियोग विधि
२८. दूती विशेष दूतकर्मोपवर्णन
२९. दूतप्रेषण सन्देशदान इ.
३०. भावस्वरूप
३१. प्रवासोपवर्णन
३२. करुणारस विनिर्णय

३३. संभोगस्वरूप

३४. प्रथमानुरागान्तर संभोग

३५. मानप्रवासकरुणान्तर संयोग

३६. संभोग अवस्थांचे वर्णन

ह्यावरून स्पष्ट होते की २४ अध्यायांपर्यंत केवळ रसचर्चा आहे व त्यातही शृंगाराचे चार पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम, मोक्षाच्या परस्पर संबंधाचे निरुपण आहे. अहंकार, अभिमान, शृंगारनामक एकमात्र विशिष्ट रससिद्धांताला मुख्य व अनिवार्य मानले आहे.

प्रकाशित तीन प्रकाशात ४६७ उदाहरणे आहेत. त्यातील २५१ प्राकृतात आहेत.

भोज अनेक ग्रंथांचे रचयिता होते. असे वाटते की त्यांनी धर्मशास्त्रावरसुद्धा लिहिले आहे. मिताक्षरा व दायभागमध्ये त्याचा उल्लेख आहे.

भोजाने सिद्धांताच्या नावाने नवीन काहीच दिले नाही. फक्त प्राचीन सिद्धांतामध्ये यथासंभव परिवर्तन केले. त्यांचे काही बदल एकदम वेगळे दिसतात. ग्रंथामध्ये उदाहरणांचे बाहुल्य आहे. ग्रंथाचा विशाल आकार असल्यामुळे कदाचित हा ग्रंथ लोकप्रिय झाला नसेल. तरी सुद्धा विश्वकोशाप्रमाणे एकाच जागी विविध माहिती प्राप्त होत असल्यामुळे विश्वकोशाप्रमाणे ह्याची उपयोगीता आहे. वैचारिक तत्त्वांच्या दृष्टीने ह्याचे मूल्य अधिक नाही किंवा गंभीर व सूक्ष्म विवेचन उपलब्ध नाही. भोज शृंगाराच्या अनेक भेदांचे वर्णन करतात व शृंगारालाच मूळ रस मानतात.

* *



.१५.

# क्षेमेन्द्र

**जीवनवृत्त**

क्षेमेन्द्र हे काश्मिरी कवी होते. काश्मिरच्या एका धनाढ्य ब्राह्मणकुळात क्षेमेन्द्रांचा जन्म झाला. त्यांच्या पितामहांचे नाव सिन्धु व पित्याचे नाव प्रकाशेन्द्र होते. त्यांचे पिता अत्यंत ज्ञानी होते. त्यांनी आपल्या पित्याच्याविषयी लिहिले आहे की ते मेरुसमान उदार आणि कल्याणप्रद संपत्तीने युक्त होते. त्यांच्या घरी असंख्य ब्राह्मणांचे भोजन होत असे.

**यस्य मेरोरिवादारकल्याणापूर्ण संपदः।**

**अगणेयमभूद् गेहे यस्य भोज्यं द्विजन्मनाम्।**

(बृहत्कथामञ्जरी १९।६२)

क्षेमेन्द्राच्या बृहत्कथामंजरीनुसार त्यांचे साहित्यशास्त्रातील गुरू प्रसिद्ध विद्वान अभिनवगुप्त होते.

**श्रुत्वाभिनवगुप्ताख्यात् साहित्यं बोधवारिधेः।**

**आचार्यशेखरमणेः विद्याविवृतिकारिणः।।**

(बृहत्कथामञ्जरी १९।३७)

अशाप्रकारे ते काश्मिरच्या सर्वश्रेष्ठ साहित्यविद्वानाचे शिष्य होते. त्यांनी साहित्यविद्येत आपली आचार्यता व निपुणता योग्यरीत्या अभिव्यक्त केली आहे. ते योग्य गुरूचे योग्य शिष्य होते. ते मूलतः शैव होते. पण सोमाचार्यांच्या संपर्कात राहून ते वैष्णव झाले.

**काळ**

क्षेमेन्द्रांच्या समकालिनांचा काळ इ.स. १०५० आहे आणि दशावतारचरित रचनेचा काळ इ.स. १०६६ आहे. तेव्हा कलश राज्य करीत होता. औचित्यविचारचर्चा आणि कविकण्ठाभरणाची रचना राजा अनंताच्या काळी झाली.

**तस्य श्रीमदनन्तराजनृपतेः काले किलायं कृतः।** (औचित्य)

**राज्ये श्रीमदनन्तराजनृपतेः काव्योदयोयं कृतः।** (कविकण्ठाभरण)

राजा अनन्तवर्माने काश्मिरात इ. १०२८ ते १०६३ पर्यंत राज्य केले आणि इ. १०६३ मध्ये आपल्या पुत्राला राज्याभिषेक केला. त्याचा मृत्यू इ. १०८१ मध्ये झाला. तेव्हा त्याचे वय ६१ वर्षे होते.

क्षेमेन्द्राच्या वर्णनावरून असे अनुमान करता येते की त्याच्या ह्या दोन्ही रचना अनन्तवर्माच्या राज्यकाळात लिहिल्या आहेत. म्हणून क्षेमेन्द्राचे हे दोन्ही ग्रंथ इ. १०६३च्या पहिले लिहिले गेले. त्यांचा साहित्यिक कार्यकाळ ११व्या शतकाचा द्वितीय किंवा तृतीय चरण निश्चित होतो.

क्षेमेन्द्र अभिनवगुप्ताचे शिष्य होते व अभिनवगुप्ताचा साहित्यिक काळ इ. ९८० ते १०२० मधला आहे. म्हणून क्षेमेन्द्राचा जन्म इ. ९९० च्या जवळपास झाला असावा आणि त्यांचा मृत्यू इ. १०६६ नंतर काही काळात झाला असावा.

अन्य संस्कृत लेखकांप्रमाणे क्षेमेन्द्रसुद्धा आपल्या जीवनवृत्तांसंबंधी आपल्या रचनांमध्ये अत्यल्प संकेत देतात. त्यांच्याविषयी काही संकेत त्यांच्या ग्रंथांच्या अंतिम पद्यांमध्ये मिळतात तर काही सौमेन्द्राच्या 'अवदान कल्पलता' च्या भूमिकेत तसेच कल्हणाच्या राजतरंगिणीत मिळतात. क्षेमेन्द्राने आपल्या शासक राजाचे नाव सर्वच रचनांमध्ये दिले आहे आणि बृहत्कथामंजरी, समयमातृका आणि दशावतारचरित ह्या तीन ग्रंथांमध्ये लौकिक संवत्सराच्या तिथीचा पण उल्लेख केला आहे. परंतु ह्यात शताब्दीचा उल्लेख नाही. विद्वानांनी ह्या अभावाची पूर्ती त्याच्या शासकाच्या काळावरून जाणून केली आहे. त्यांच्या अधिकांश रचनांमध्ये राजा अनंताचा उल्लेख आहे. कल्हणाच्या अनुसार राजा अनंताचा शासनकाळ १०२८-६२ पर्यंत होता. क्षेमेन्द्राची अंतिम रचना 'दशावतारचरित' १०६६ इ. मध्ये लिहिली गेली होती आणि ह्यात राजा अनंताचा पुत्र व उत्तराधिकारी कलशचा उल्लेख आहे. बृहत्कथामंजरीचा काळ १०३७ इ. ठरविला जातो. म्हणून हा निष्कर्ष काढला जाऊ शकतो की क्षेमेन्द्राच्या अधिकांश रचना १०३७ इ. पासून १०६६ इ. च्या मध्ये रचल्या गेल्या.

प्रत्यभिज्ञादर्शनाची टीका 'विद्याविवृत्ति' आचार्य अभिनवगुप्ताने १०१४ इ. मध्ये लिहिली. त्यानंतरच क्षेमेन्द्राचा त्यांच्याशी संबंध आला



असे वरील श्लोकावरून स्पष्ट होते. ह्या टीकेचा रचनाकाळ विद्वानांनी १०१४ इ. हा निश्चित केला आहे. अशाप्रकारे क्षेमेन्द्राचा जन्म साधारणपणे १००० इ. च्या आसपास झाला असावा. परंतु क्षेमेन्द्राच्या मृत्युचा समय पण अनिश्चित आहे. परंतु दशावतार ही त्यांची अंतिम रचना आहे. ही रचना पूर्ण झाल्यानंतर काही काळानेच त्यांचा मृत्यू झाला असावा अशी शक्यता आहे. साधारणतः १०७० इ. च्या आसपास हा काळ मानावा लागतो. कारण क्षेमेन्द्र परिमलाचे श्लोक आपल्या रचनांमध्ये उद्धृत करतात. ह्यावरून सुद्धा त्यांच्या वरील काळाची पुष्टी होते. ह्या दृष्टीने ते मम्मटाचे समकालीन ठरतात.

**रचना**

क्षेमेन्द्राने विपुल प्रमाणात ग्रंथरचना केली आहे. त्यातील प्रमुख ग्रंथ 'रामायण मञ्जरी', 'भारतमञ्जरी' व 'बृहत्कथामञ्जरी' हे आहेत. हे तीनही ग्रंथ क्रमशः रामायण, महाभारत व गुणाढ्याच्या बृहत्कथेचे कवित्वमय सारांश आहेत. हे तीनही स्वतंत्र काव्यमय ग्रंथ आहेत. त्यांच्या 'दशावतारचरित' ह्या अत्यंत प्रौढ महाकाव्यात भगवान विष्णुच्या दशावतारांचे अत्यंत रोचक व विस्तृत वर्णन आहे. 'बोधिसत्वावदानकल्पलता' ह्यात बौद्ध जातककथांचे अत्यंत सुंदर व सुबोध असे पद्यात वर्णन आहे.

ह्याशिवाय क्षेमेन्द्राचे कलाविलास, चतुर्वर्गसंग्रह, चारुचर्या, नीतिकल्पतरु, समयमातृका आणि सेव्यसेकोपदेश हे लघुकाय ग्रंथ आहेत. हे ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहेत.

क्षेमेन्द्राने जवळपास ४०० ग्रंथ लिहिले. त्यांच्या रचना चार गटात विभागता येतात.

१. महाकाव्यसार - रामायणमञ्जरी किंवा रामायणकथासार, भारतमञ्जरी, बृहत्कथामञ्जरी, दशावतारचरित, अवदान कल्पलता.

२. उपदेशात्मक काव्य - कलाविलास, समयमातृका, चारुचर्याशतक, सेव्यसेवकोपदेश, दर्पदलन, देशोपदेश, नर्ममाला, चतुर्वर्गसंग्रह.

३. काव्यशास्त्र - कविकण्ठाभरण, औचित्यविचारचर्चा, सुवृत्ततिलक छन्दोरचना

४. विविध - लोकप्रकाश कोष, नीतिकल्पतरु, व्यासाष्टक.

ह्या व्यतिरिक्त त्यांच्या अनेक ग्रंथांमध्ये अनेक अन्य रचनांचा उल्लेख येतो. पण त्या रचना अनुपलब्ध आहेत.

काव्यशास्त्राशी संबंधित त्यांच्या दोन रचना आहेत – कविकण्ठाभरण आणि औचित्यविचार चर्चा.

**कविकण्ठाभरण**

कविशिक्षा विषयक हा संक्षिप्त ग्रंथ आहे. ह्या ग्रंथात पाच अध्याय आहेत, ज्यांना 'संधी' असे नाव दिले आहे. यामध्ये ५५ कारिका आहेत. या संधीचे क्रमिक रुप याप्रमाणे आहे.

प्रथम संधीमध्ये कवी होण्यासाठी आवश्यक प्रयत्नांचे वर्णन येते. हा प्रयत्न दैवी किंवा मानवीय असू शकतो.

दुसऱ्या संधीमध्ये कवीच्या प्रशिक्षणावर भर दिला आहे. ह्यात नवकवींसाठी जवळपास १०० उपदेशात्मक निर्देश आहेत. त्यांनी शिष्यांचे तीन वर्ग केले आहेत. कवींचे छायोपजीवी, पदकोपजीवी, पादोपजीवी, सकलोपजीवी, भुवनोपजीवी असे भेद केले आहेत.

तिसऱ्या संधीमध्ये कवीद्वारा सुंदर व आकर्षक काव्यरचनेची पद्धत सांगितली आहे. ह्यामध्ये १० प्रकारचे चमत्कार आहेत.

चौथ्या संधीत काव्याच्या गुणदोषांचे वर्णन केले आहे. तसेच नाटट्य, तर्क, व्याकरणाच्या अध्यापनाविषयी कवींना उपयोगी संकेत दिले आहेत.

पंचम संधीत अशा कलांचे वर्णन आहे ज्यात निष्णात होणे सत्काव्य रचनेसाठी आवश्यक आहे.

**औचित्यविचार चर्चा**

औचित्य नामक एका नूतन सिद्धांताचे प्रतिपादन करणारा हा ग्रंथ आहे. ह्यातील कारिका आणि वृत्ती दोन्हींची रचना ग्रंथकारानेच केली आहे. ह्यात औचित्याला काव्याचे सर्वस्व मानले आहे. ह्यात औचित्यालाच सर्वश्रेष्ठ स्थान दिले आहे. ह्याच्या तुलनेत रसाला सुद्धा गौणत्व दिले आहे. औचित्याचे अनेक भेद मानले आहेत.

औचित्याचा संबंध पद, वाक्य, प्रबंधार्थ, गुण, अलंकार, रस आदिंसह दाखवून त्याचे महत्त्व सिद्ध केले आहे.



**ग्रंथस्वरूप**

**औचित्यस्य चमत्कारकारिणश्चारुचर्वणे**
**रसजीवितभूतस्य विचारं कुरुतेऽधुना।।** (कारिका ३)

क्षेमेन्द्राद्वारा केल्या गेलेली औचित्याची परिभाषा अशी आहे,

**उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य तत्।**
**उचितस्य च यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते।**

त्यांनी औचित्याचा खालील तत्त्वांशी संबंध दाखवून व्यापक चित्रण केले आहे.

औचित्याचा संबंध पद, वाक्य, प्रबन्धार्थ, गुण (ओज इ.) अलंकार, रस, क्रिया, कारक, लिंग, वचन, उपसर्ग, काळ, देश इ. अनेक वस्तुंशी दाखविला आहे. क्षेमेन्द्राने एकूण २८ औचित्यस्थाने मानली आहेत

क्षेमेन्द्राने औचित्याचे विवेचन उपयुक्त व अनुपयुक्त उदाहरण देऊन केले आहे. औचित्यविचार चर्चेत लेखकाने ध्वन्यालोकातील अनेक सिद्धांताचे सविस्तर विवेचन केले आहे. ह्या सिद्धांताचे सार ध्वन्यालोकातील खालील श्लोकात आले आहे.

**अनौचित्यादृते च नान्यद्रसभंगस्य कारणम्।**
**प्रसिद्धौचित्यबन्धु स्तु रसस्योपनिषत्परा।।**

क्षेमेन्द्राचा 'सुवृत्तितिलक' हा ग्रंथ छंदशास्त्रावरील अनुपम ग्रंथ आहे. ह्यात छंदविषयक अनेक मौलिक गोष्टी मांडल्या आहेत.

**औचित्य सिद्धांत**

औचित्य सिद्धांत हा साहित्यशास्त्राचा व्यापकतम सिद्धांत म्हटला जावू शकतो. ह्याला काव्याचा आत्मा किंवा प्राण मानण्याचा मान जरी क्षेमेन्द्राला प्राप्त आहे तरी औचित्याची कल्पना साहित्यविश्वात अत्यंत प्राचीनकाळापासून चालत आली आहे. भरताच्या नाट्यशास्त्रात सिद्धांतरुपाने जरी नाही तरी व्यवहाररुपाने औचित्याचे विधान आढळते. भरताचे मत आहे की लोकच नाट्याचे प्रमाण आहे. लोकामध्ये जी वस्तू ज्या रुपात, ज्या वेषात, ज्या मुद्रेत उपलब्ध होते त्याचे त्याच रुपात, त्याच वेषात, त्याच मुद्रेत अनुकरण करणे हे नाट्याचे चरम लक्ष्य असते. म्हणून नाट्यशास्त्र प्रकृती, पात्राची

भाषा, वेष इ. च्या विधानावर विशेष भर देते. भरताने विभिन्न प्रकृतींचे वर्णन आपल्या ग्रंथात विस्ताराने केले आहे. ह्यावरून स्पष्ट होते की भरत नाटकात औचित्याच्या विधानाला परमावश्यक मानत होते. काव्यामध्ये औचित्यतत्त्वाच्या कल्पनेचा मूलस्त्रोत हाच आहे. ह्याबाबतीत भरताचा हा श्लोक महत्त्वपूर्ण आहे.

**अदेशजो हि देशस्तु न शोभां जनिष्यति**
**मेखलोरसि बन्धे च हास्यायैव प्रजायते।** (ना.शा. २३।६८)

जरी दण्डी औचित्य शब्दाचा प्रयोग करीत नाहीत पण काव्यादर्शातील एका कारिकेत हा भाव निश्चितच प्रतिपादन करतात. उपमेच्या दोषांचे वर्णन करताना दंडी म्हणतात,

**न लिङ्ग वचने भिन्ने न हीनाधिकतामपि वा**
**उपमादूषणालयं स यत्रोद्वेगो न धीमताम्।**

परंतु अत्यंत स्पष्ट शब्दात ह्या सिद्धांताचा मूलस्त्रोत आनंदवर्धनाद्वारा प्रतिपादित झाला आहे. ध्वन्यालोकाच्या तिसऱ्या उद्योतात अनेक स्थानी औचित्य ह्या शब्दाचा प्रयोग मिळतो. आनंदवर्धनाने औचित्याच्या श्रेष्ठत्वाचे आवाहन करीत रसभंगाची व्याख्या करतांना हे सर्वमान्य तथ्य प्रतिपादित केले आहे की अनौचित्य हेच रसभंगाचे प्रधान कारण आहे. रसाच्या उन्मेषाचे मुख्य रहस्य, औचित्याद्वारा वस्तुचे उपनिबंधन व काव्यातील कल्पना याविषयी आनंदवर्धन सांगतात,

**अनौचित्याद ऋते नान्यत् रसभङ्गस्यकारणम्।**
**औचित्यनिबंधस्तु रसस्योपनिषत्परा।**

आनंदवर्धन ध्वन्यालोकाच्या तिसऱ्या उद्योतामध्येच अनेकप्रकारे औचित्याचे वर्णन करून दाखवून देतात. परंतु सर्व प्रकारे वर्णन करून सुद्धा आनंदवर्धन औचित्याला रसापेक्षा कमीच महत्त्व देतात. औचित्याचा मुख्य उपयोग ते कवीच्या स्वेच्छाचारावर अंकुश लावणे मानतात. आनंदवर्धनांच्या औचित्यवर्णनात एक अभाव आहे, तो म्हणजे ते औचित्याचे लक्षण देत नाहीत. ह्या अभावाची पूर्ती वक्रोक्तिकार कुन्तकाने केली आहे. परंतु त्यातही काही उणिवा राहिल्या आहेत.



औचित्याचे सांगोपांग विवेचन आणि साहित्याच्या महत्त्वपूर्ण सिद्धांताच्या रुपाने त्याची स्थापना करण्याचे श्रेय क्षेमेन्द्राला जाते. ग्रंथारंभीच त्याने सांगितले आहे की औचित्यच रससिद्ध काव्याचे स्थिर जीवन आहे.

**औचित्यं हि रससिद्धस्य स्थिरं काव्यस्य जीवनम्।**
(औचित्यविचारचर्चा २.५)

क्षेमेन्द्र औचित्याला गुण व अलंकारापेक्षा भिन्न मानतात. तसेच गुण व अलंकारयुक्त काव्याला सुद्धा औचित्याच्या अभावी निर्जीव काव्य मानतात.

**औचित्यं त्वग्रे वक्ष्यमाणलक्षणं स्थिरमविनश्वरं जीवितं काव्यस्य।**
**तेन विनाऽस्य गुणालङ्कारयुक्तस्यापि निर्जीवित्वात्।**

औचित्याचे महत्त्व इतके आहे की औचित्याशिवाय अलंकार, अलंकार नाही आणि गुण, गुण ठरत नाहीत.

**उचितं स्थानंविन्यासादलंकृतिरलंकृतिः।**
**औचित्यादच्युता नित्यं भवन्त्येव गुणा गुणाः।।**

क्षेमेन्द्राच्या अनुसार औचित्याचे लक्षण ह्याप्रकारे आहे.

**उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य यत्ः।**
**उचितस्य यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते।।**

क्षेमेन्द्राने औचित्याला अनेक प्रकारे स्वीकार केले आहे. पद, वाक्य, अर्थ, रस, कारक, लिंग, वचन आदी २८ प्रकारचे औचित्य त्याने स्वीकारले आहे. कारिकांमध्ये उल्लेखित २८ स्थानांशिवाय काव्याच्या अन्य अंगांच्या बाबतीत सुद्धा क्षेमेन्द्राने औचित्याचा स्वीकार केला आहे.

**काव्यस्याङ्गेषु च प्राहुरौचित्यं काव्यस्य जीवितम्।**

रसामध्ये औचित्याचे स्थान मान्य करून प्रत्येक रसासाठी पृथक् पृथक् रूपाने औचित्यभावाची प्रस्तुती आणि त्याची उदाहरणे दिली आहेत. रसाच्या संबंधात ते औचित्यालाच रसाचा प्राण म्हणून स्वीकारतात.

क्षेमेन्द्राने औचित्य सिद्धांताला एक नवीन रुप दिले. ह्याचे संपूर्ण लक्षण सांगोपांग विवेचन, अन्य काव्यतत्त्वांची तुलना तसेच संबंधाविषयी ह्याचे महत्त्व, ह्या सर्वांचे विस्तृत वर्णन केले आहे. क्षेमेन्द्राची युक्तिपूर्ण शैली,

काव्यग्रंथातील उदाहरणे तसेच पूर्वाचार्यांचे उल्लेख हे सर्वच विषय प्रतिपादनात प्रभावशाली ठरले आहेत.

क्षेमेन्द्राचे उत्तरवर्ती आचार्य मम्मट, भोज आदी ह्या सिद्धांताला स्वीकारून त्याचा उल्लेख तर करतात परंतु त्याला विशेष महत्त्व देत नाहीत. औचित्याचा सिद्धांत जरी ध्वनि किंवा रसाप्रमाणे लोकप्रिय झाला नाही तरीसुद्धा त्याचे महत्त्व नाकारता येत नाही.

**उल्लेखित ग्रंथ**

क्षेमेन्द्राने परिमल, कालिदास रचित कुन्तेश्वर, दौत्य, गौडकुंभकार, भट्टमल्लट, भट्टतौत तसेच त्याचे गुरु भट्ट गंगकाचा उल्लेख केला आहे. औचित्यविचार चर्चेत त्यांनी आपल्या कविकर्णिका काव्यालंकाराचा पण उल्लेख केला आहे. परंतु ही रचना आजपर्यंत उपलब्ध नाही. कविकर्णिका काव्यालंकाराला कविकण्ठाभरणाशिवाय अतिरिक्त रचना मानणे संदिग्ध आहे.

ह्या ग्रंथाचे प्रथम प्रकाशन हरिदास संस्कृतमाला संख्या २४ तसेच काव्यमाला संख्या ४ च्या अंतर्गत झाले.

**कवित्व**

क्षेमेन्द्राला खऱ्या अर्थाने एका कवीचे हृदय लाभले होते. संसाराचा त्यांना पूर्ण अनुभव होता. ते पूर्णपणे जाणत होते की संसारामध्ये इतकी प्रलोभने आहेत की ती दुर्बळ हृदयाच्या व्यक्तीला आपल्याकडे खेचून दुर्गतीच्या खड्ड्यात पाडतात. जगतकल्याणाच्या भावनेने प्रेरित होऊन त्यांनी आपल्या नीतिमय ग्रंथांची रचना केली. त्यांची भाषा अत्यंत मधुर, सरस व सुबोध आहे. कुठे पांडित्याचे प्रदर्शन नाही, कुठे शब्दांचा अनावश्यक चमत्कार उत्पन्न करण्याचा व्यर्थ प्रयास नाही. त्यांची भाषा प्रवाही आहे. पदावली इतकी स्निग्ध आहे की कुठेही अयोग्य शब्दांचा प्रयोग दिसून येत नाही.

दुसऱ्याच्या पत्नीचे अपहरण करणे हा केवढा मोठा गुन्हा आहे हे क्षेमेन्द्र सांगतात.

**सर्वापकारः सुकृतप्रहारः क्लेशावतारः कुशलापसारः।**
**शीलापचारः कुपदाभिसारः पापप्रकारः परदारहारः।।**

(दशावतारचरित ७।१११)





अरण्यवासातील आनंदाचे सुद्धा क्षेमेन्द्र सुंदर वर्णन करतात.

**दयितजनवियोगोद्वेगरोगातुराणां**
**विभवविरहदैन्यम्लानमानाननानाम्।**
**शमयति शितशल्यं हन्त नैराश्यनश्य–**
**द्भवपरिभवतान्तिः शान्तिरन्ते वनान्ते।।**

ज्या लोकांचे हृदय दयितजनांच्या वियोगाच्या उद्वेगरुपी रोगाने आक्रान्त आहे आणि धनाच्या नाशाने उत्पन्न होणाऱ्या दीनतेमुळे मुख फिके पडले आहे, त्यांच्या हृदयगत तीक्ष्ण बाणाला दूर करण्यास एकच वस्तु समर्थ होते आणि ती आहे शेवटी वनात निवास. त्यामुळे त्यांच्या मनातील निराशाजन्य संसारपरिभवाचे क्लेश दूर होतात आणि ते शांतीचा आनंद घेऊ लागतात.

**प्रसन्नरसगम्भीरविविधैः सूक्तिसंयचयैः।**
**प्रत्यक्ष जगतां क्षेमे, क्षमः क्षेमेन्द्र सत्कविः।।**

संस्कृत कवींमध्ये क्षेमेन्द्राचे स्थान अद्वितीय आहे. त्यांनी साहित्यातील विविध विषयांवर लेखन केले आहे. त्यांनी संस्कृतमध्ये इतक्या ग्रंथांचे लेखन केले आहे की त्यांचे वर्णन करणे कठिण आहे. महाभारताचे प्रणेता व्यासांनंतर इतकी विपुल रचना करणारे क्षेमेन्द्रच होत. दुसरी गोष्ट अशी की ज्याप्रमाणे व्यासांनी लोकोपकारासाठी आपल्या ग्रंथांची रचना केली, त्याचप्रमाणे क्षेमेन्द्रांनीसुद्धा नीती व उपदेश देणाऱ्या आणि लोकव्यवहार शिकविणाऱ्या ग्रंथाची रचना केली आहे. कदाचित ह्याच दोन कारणांमुळे ते स्वतःला 'व्यासदास' म्हणवितात.

**इत्येष विष्णोरवतारमूर्तेः कथामृतास्वादविशेषभक्त्या।**
**श्रीव्यासदासान्यतमाभिधेन, क्षेमेन्द्रनामा विहितः स्ववाग्रसः।**

(दशावतार चरित १०।४१)

* *

.१६.

# महिमभट्ट

**जीवनवृत्त**

महिमभटट्ट 'राजानक' ह्या उपाधीने विभूषित होते. राजानक पदवीवरून हे स्पष्ट होते की महिमभट्ट हे काश्मिरनिवासी होते. त्यांच्या पित्याचे नाव श्रीधैर्य होते आणि ते श्यामल नामक महाकविचे शिष्य होते. क्षेमेन्द्राने आपल्या सुवृत्ततिलक आणि औचित्य विचारात श्यामलाचे पद्य उद्धृत केले आहे. सुभाषितावलित सुद्धा हे श्लोक मिळतात.

शामिलक पादताडिक नामाच्या भाणचा लेखक आहे. त्यांचे संपादन श्रीकवीने केले आहे. महिमभट्टाने आपला ग्रंथ भीमाच्या पुत्रांसाठी लिहिला. बहुधा भीम त्याचा जामात होता.

**आधातुं व्युत्पत्तिं नसृणां क्षेमयोग भाजानाम्।**
**सत्सु प्रथितनयानां भीमस्यायितगुणस्य तनयानाम्।**

यात क्षेमयोगभाजानाम् शब्द द्व्यर्थक आहे. क्षेम, योग, भाज हे बहुधा महिमभट्टाचे दौहित्र होते कारण ते त्याचे पौत्र असते तर 'पौत्राणां' शब्दांचा प्रयोग छंद त्याग न होता करता आला असता.

**काळ**

महिमभट्टाचा काळ इ. ११००च्या पूर्व निश्चित होतो. त्याने स्वतः बालरामायण आणि विद्धशालमंजिकेतील उदाहरणे दिली आहेत आणि वक्रोक्तिजीवित आणि लोचनवर टीका केली आहे. त्यावरून त्याचा समय इ.स. १०२० नंतरचा ठरतो.

काव्यप्रकाशात महिमभट्टाचा स्पष्ट उल्लेख केलेला नसला तरी व्यक्ति विवेकातील सिद्धांताचे खंडन केले आहे.

**ननु वाच्यादसंबद्धं तावन्न प्रतीयते।**

७व्या उल्लासात काव्यप्रकाशकाराने दोषांचे विवेचन व्यक्तिविवेकनुसार केले आहे. त्यामुळे महिमभट्टाचा काळ इ.स. १०२० ते १०५० चा मध्य असावा.



व्यक्तिविवेकावर प्रकाशित टीका अपूर्ण आहे. ही टीका केवळ दोन विमर्शांवरच आहे. लेखकाचे नाव दिलेले नाही. ह्या टीकेत टिकाकाराने एका जागी स्वतःला हर्षचरित वार्तिक व दुसऱ्या जागी साहित्य मीमांसा व नाटक मीमांसेचा लेखक म्हटले आहे. 'अलंकारसर्वस्व वृत्ती'च्या लेखकाने ह्या ग्रंथाला स्वरचित म्हटले आहे. जयरथाच्या अलंकारवृत्तिकारानेच व्यक्तिविवेकवर टीका लिहिली आहे.

व्यक्तिविवेकावरील टीका अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. टीकाकाराने महिमभट्टांचा 'महामति' असा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. शरयू नदीच्या तीरी चामुण्डसिंह राजाद्वारा लिखित व्यक्तिविवेकाची तिलकरत्नानामक टीका आहे. यावरून त्यांचा काळ इ.स. १०२० ते १०५० चा मध्य मानला जातो.

**ग्रंथरचना**

**व्यक्तिविवेक**

महिमभट्टने ध्वनि सिद्धांताचे प्रत्याख्यान करण्यासाठी 'व्यक्तिविवेका'ची रचना केली. महिमभट्टाने ध्वन्यालोकात निरुपित शब्दांच्या तीन शक्ती अभिधा, लक्षणा, व्यंजना यामध्ये व्यंजनेचे खंड केले आहे. तसेच व्यंजनाशक्तीने भाव ध्वनित होतो याचे पण खंडन केले आहे. त्यांच्या मते शब्दाची एकमात्र शक्ती अभिधाच होय. प्रतीयमान अर्थाचा जो बोध होतो तो वाच्यार्थानेच अनुमानित होतो. शब्द आणि अर्थ यामध्ये व्यंग्य व्यंजक भाव मानणे उपयुक्त नाही. रस काव्याचा आत्मा आहे ह्या मताचा महिमभट्टने विरोध केला आहे.

**ग्रंथस्वरूप**

व्यक्तिविवेक हा ग्रंथ तीन भागात विभक्त आहे. त्यांना विमर्श म्हटले आहे.

प्रथम विमर्शाच्या प्रथम श्लोकात लेखकाने अशी प्रतिज्ञा केली आहे,

**ऋतुमानन्तर्भावं सर्वस्यैव ध्वनेः प्रकाशयितुम्**
**व्यक्तिविवेकं कुरुते प्रणम्य महिमा परां वाचम्।**

प्रथम ध्वनिची व्याख्या अशाप्रकारे दिली आहे. 'यथार्थः शब्दो वा' (ध्वनि का. १.१३) आणि त्यात दोष दाखविले आहेत आणि म्हटले आहे की ह्या दोषांना दूर केले नाही तर ही परिभाषा अनुमानावर उतरते.

ध्वनिच्या ह्या व्याख्येवर महिमभट्टचा पहिला आरोप हा आहे की अर्थ शब्दाला 'उपसर्जनी कृतात्मत्व' विशेषण लावणे उपयुक्त नाही. दुसरा आक्षेप हा आहे की लक्षणेसाठी 'शब्द' ह्या शब्दाचा प्रयोग करू नये कारण शब्दाचा अभिधेव्यतिरिक्त दुसरा कोणताच व्यापार नाही. तिसरा आक्षेप 'वा' अव्ययाच्या संबंधी आहे. काव्यविशेष किंवा समासगत विशेष ह्या शब्दावर पण त्यांचा आक्षेप आहे. कारण ध्वनिकाराच्या मतानुसार कोणत्याही प्रकारचे काव्य असले तरी त्याचा आत्मा ध्वनिच असतो. महिमभट्टाच्या मते 'सूरिभिः' शब्द सुद्धा अनावश्यक आहे. अशाप्रकारे त्यांनी १० दोष काढले आहेत. त्यांच्या मते शब्दाचे वाच्य आणि अनुमेय असे दोन अर्थ निघतात. दुसऱ्या लेखकांद्वारा निरुपित लक्षणा अनुमानाच्या अंतर्गत येते. उदा. 'सुवर्ण पुष्पां पृथिवीं चिन्वन्ति पुरुषास्त्रयः' ह्यातील अविवक्षित वाच्य ध्वनि, 'एवं वादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी' ह्या श्लोकातील प्रतीयमान अर्थ अनुमानाच्या अंतर्गतच येईल.

वाच्य अर्थ व प्रतीयमान अर्थात लिंग-लिङ्गिभाव असतो. म्हणून वाच्यापासून प्रतीयमानापर्यंत येण्याच्या प्रक्रियेचे तात्पर्य अनुमान आहे. ध्वनिकाराच्या मते जेव्हा मुख्यार्थ ध्वनि असतो तेव्हा अधिक रमणीय भासतो.

'गोर्वाहिकः' मध्ये तात्पर्यार्थाची प्रतीती अनुमानानेच होते. कारण वाहिक आणि बैल वास्तविक एक असू शकत नाहीत. म्हणून त्यांच्यात समान धर्म आहे हे तात्पर्य अनुमानाद्वाराच निघते.

ध्वनिकाराने काव्याचे लक्षण दिले नाही परंतु ध्वनि तसेच गुणीभूत व्यंग्य ह्या काव्याच्या दोन प्रकारांचे सविस्तर विवेचन केले आहे. महिमभट्टाने त्याचा उपहास केला आहे. तसेच महिमभट्टाने ध्वनिकार निरुपित अविवक्षितवाच्य आणि विवक्षितान्यपरवाच्य ह्या दोन संज्ञा सुद्धा सदोष वर्णन केल्या आहेत. त्यांच्या मते विवक्षित वाच्यार्थाचे 'अग्निर्माणवकः'सारखे उदाहरण भक्तिचेच आहे. दुसऱ्या विमर्शात त्यांनी अनौचित्य दोषावर विचार केला आहे. हा दोन प्रकारचा असतो, अर्थविषयक आणि शब्दविषयक. अर्थविषयक अनौचित्य तेव्हा असते जेव्हा विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भावांचे नियोजन अनुपयुक्त रीतीने करून रसनिष्पत्तीचा प्रयत्न केला जातो.



त्याची व्याख्या त्यांच्या पूर्ववर्ती आनंदवर्धन इ. लेखकांनी केली आहे.

बहुरंग अनौचित्याचे पाच भेद आहेत. विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद, पौनरुक्त्य आणि वाच्यावचन. संपूर्ण द्वितीय विमर्श ह्या पाच दोषांची व्याख्या व उदाहरणांनी परिपूर्ण आहे. मध्येच अन्य विषयांचीही चर्चा आहे.

द्वितीय विमर्शात ध्वन्यालोकातील साधारण ४० श्लोक घेऊन त्यांचा अंतर्भाव अनुमानात होऊ शकतो हे दाखविले आहे. रसांच्या बाबतीत त्याने म्हटले आहे की त्याची अनुभूती अनुमानाच्या अंतर्गत होते. महिमभट्टाने आपल्या मताचा उपसंहार असा केला आहे.

**तदेवं सर्वस्यैव ध्वनेरनुमानान्तर्भानाभ्युपगमः श्रेयानिति।**

महिमभट्टाने काव्यशास्त्रावर 'तत्त्वोक्तिकोश' नावाचा एक अन्य ग्रंथ पण लिहिला आहे.

**इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिरूपपादितम्।**
**शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्ये इति नेह प्रपंचितम्।**

त्यांची रचना अलंकारविषयक साहित्यावर लिहिलेली महत्त्वपूर्ण रचनांमध्ये एक आहे. तिला अप्रसिद्धी व उपेक्षेच्या अंधःकारातून बाहेर काढले पाहिजे. त्याची रचना महिमभट्टाच्या बुद्धिमत्तापूर्व तर्क, विद्वत्ता, संबद्ध आलोचनाशक्ती तसेच रचनाकाराच्या गहन विचारशक्तीची परिचायक आहे.

अलंकारविषयक परवर्ती लेखकांपैकी कोणीही त्याचे अनुसरण केलेले नाही आणि ख्यातिलब्ध आनंदवर्धनाच्या तुलनेत त्याला अपेक्षित श्रेय मिळाले नाही. त्याने आपल्या शब्ददोषांसंबंधी विचारांवर केलेल्या आक्षेपांचे खंडन करतांना म्हटले आहे,

**स्वकृतिष्वयन्त्रितः कथमनुशिष्यादन्यमयमिति न वाच्यम्**
**वारयति भिषगपथ्यादितरान् स्वयमाचरन्नापि।**

यावरून महिमभट्ट अत्यंत अभिमानी व आत्मविश्वासी होते असे लक्षात येते. रसाला अनुमेय मानण्यात त्यांनी शंकुकाचे अनुसरण केले आहे. त्यांच्या मतांवर साहित्यदर्पणात विस्तृत व कठोर टीका केली आहे. ह्या दोन्ही ग्रंथांमुळे राजानक महिमभट्टाचे नाव साहित्यशास्त्रात आदराने घेतले जाते.

* *

.१७.

# वाग्भट द्वितीय

वाग्भट नावाचे दोन काव्यमीमांसक आहेत. त्यातील हा दुसरा होय. वाग्भटाची रचना 'काव्यानुशासन' आणि त्यावरील त्याची स्वतःची टीका 'अलङ्कारतिलक'सहित १९१५ ला प्रकाशित झाली.

ह्या रचनेतील सूत्रे गद्यात आहेत. वृत्ति आणि उदाहरणे अधिकांशतः दुसऱ्यापासून घेतली आहेत. हा ग्रंथ पाच अध्यायांमध्ये विभक्त आहे. ह्याचा अधिकांश भाग गद्यसूत्रांच्या रुपात असून टीकेत व्याख्या व उदाहरणे येतात.

प्रथम अध्यायात काव्यप्रयोजन, काव्यहेतू (प्रतिभा, तिचे सहायक– व्युत्पत्ति व अभ्यास) आणि त्यांच्या परिभाषा येतात. ह्यातच कविसंकेत, काव्यलक्षण, त्याचे गद्य, पद्य व मिश्र भेद, महाकाव्य, आख्यायिका, कथा, चम्पू, मिश्र काव्याची (दशरुपक आणि गेय) व्याख्या येतात.

दुसऱ्या अध्यायात पद आणि वाक्याचे १६ दोष, अर्थाचे १४ दोष, दण्डी आणि वामन निरुपित १० गुण आदिंचे विवेचन आहे. लेखकाच्या मते वस्तुतः माधुर्य, ओजस् आणि प्रसाद हे तीनच गुण आहेत. ह्यात वैदर्भी, गौडीया व पांचाली रीतींचे वर्णन आले आहे. तृतीय अध्यायात ६३ अर्थालंकारांची परिभाषा दिली आहे. त्यातील काही उल्लेखनीय अलंकार असे आहेत. अन्य, अपर, पूर्व, लेश, विहित, मत, उभयन्यास, भाव आणि आशीः.

चतुर्थ अध्यायात चित्र, श्लेष, अनुप्रास, वक्रोक्ति, यमक, पुनरुक्त तदाभास ह्या सहा शब्दालंकारांचे आणि त्यांच्या भेदांचे विवेचन केले आहे. पाचव्या अध्यायात नऊ रस, विभाव, अनुभाव, व्यभिचारी भाव, नायक–नायिकांचे प्रकार, प्रेमाच्या १० अवस्था तसेच रसदोषांचे विवेचन केले आहे.

**काळ**

त्यांनी वाग्भट व काव्यप्रकाशाचा उल्लेख केला आहे. म्हणून त्यांचा काळ इ.स. ११५० नंतरचा आहे. साधारणपणे ते १४व्या शतकातील असावेत.





**जीवनवृत्त**

वाग्भट जैन होते. त्यांनी भेदपाट (मेवाड), राहडपूर, नलोटकपूर ह्या स्थानांचा उल्लेख केला आहे. ते नेमिकुमारांचे पुत्र होते. त्यामुळे वाग्भटालंकारचे रचयिता वाग्भटापेक्षा निश्चितच भिन्न आहेत. ह्याविषयी त्यांनी स्वतः लिहिले आहे,

**दण्डी वामन वाग्भटादि प्रणीता दशकाव्यागुणाः।**
**परन्तु माधुर्योजः प्रसादलक्षणां त्रितेवगुणान् मन्यामहे।।**

(काव्यानुशासनवृत्ति)

त्यांनी आपल्या टीकेत विभिन्न प्रदेश, नद्या, वृक्ष, विभिन्न प्रदेशांच्या विशिष्ट वस्तूंची सविस्तर सूची दिली आहे.

**रचना**

त्यांनी ऋषभदेवचरित नावाचे महाकाव्य लिहिले होते. छन्दोनुशासन नामक छंदशास्त्राच्या ग्रंथाची रचना पण ह्यांचीच असावी. त्यांनी अनेक ग्रंथ व ग्रंथकारांचा उल्लेख केला आहे. जसे, आनंदवर्धन, काव्यप्रकाश, त्रिविक्रम दमयंती, नेमिनिर्वाण, बालरामायण, भीमकाव्य, राजीमती परित्याग, लीलावती, वासवदत्ता, शृंगारतिलक इ. त्यांनी राजशेखराच्या काव्यमीमांसा, काव्यप्रकाश तसेच अन्य ग्रंथांचा आधार घेतला आहे.

* *

.१८.

# वाग्भट

अलंकारशास्त्रामध्ये वाग्भट नावाच्या दोन व्यक्ती येतात. वाग्भटाने लिहिलेला 'वाग्भटालंकार' ग्रंथ विस्तृत विवेचनात्मक ग्रंथ नाही. हा ग्रंथ पाच परिच्छेदांमध्ये विभागलेला आहे. त्यात २६० श्लोक येतात. अधिकांश श्लोक अनुष्टुप छंदात लिहिलेले आहेत. परिच्छेदाच्या अंती काही पद्य अन्य छंदात पण रचले आहेत. ह्यामध्ये ओजोगुणाचे चित्रण करणारे एकमात्र गद्य अवतरण आहे.

प्रथम परिच्छेदात काव्याचे लक्षण दिले आहे. काव्याच्या उत्पत्तीचे कारण प्रतिभा आहे. प्रतिभा, व्युत्पत्ति आणि अभ्यासाच्या परिभाषा दिल्या आहेत. काव्यनिर्मितीसाठी कोणती परिस्थिती अनुकूल असते आणि कवीने स्वीकारण्यास योग्य परंपरांचा उल्लेख केला आहे.

दुसऱ्या परिच्छेदात संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, भूतभाषा पैशाची ह्या चार भाषांमध्ये काव्यरचना करावी. काव्याचे भेद, छन्दोनिबद्ध आणि गद्यनिबद्ध तसेच गद्य-पद्य आणि मिश्र हे तीन प्रकार केले आहेत. ह्यानंतर पद आणि वाक्याच्या आठ दोषांचे लक्षण उदाहरणासहित विवेचन करून अर्थदोषांचे निरुपण केले आहे.

तिसऱ्या परिच्छेदात काव्याचे १० गुण आणि लक्षण उदाहरणासहित दिले आहेत.

चौथ्या परिच्छेदात चित्र, वक्रोक्ति आणि अनुप्रास ह्या शब्दालंकारांचे तसेच त्यांच्या अनेक उपभेदांचे ३५ अर्थालंकारांचे आणि वैदर्भी व गौडी ह्या दोन रीतिंचे विवेचन केले आहे.

पाचव्या परिच्छेदात ९ रस, नायक-नायिकांचे भेद आणि त्यासंबंधी अन्य विषयांचे निरुपण केले आहे.

**जीवनवृत्त**

वाग्भट जैन होते. त्यांचे नाव बाहड किंवा वाहड ह्या प्राकृत रुपाशी मिळणारे आहे. हे कोणत्यातरी राजाचे मंत्री होते.





**काळ**

वाग्भटाची सर्व उदाहरणे स्वरचित वाटतात. ह्यातील काही प्राकृतात आहेत. 'वाग्भटालंकारा'त उदाहरणस्वरूप दिलेल्या श्लोकात अनहिलवाडच्या चालुक्यवंशगत कर्णराजाचा पुत्र जयसिंह राजाचा अनेकवेळा उल्लेख येतो. जसे,

**जयति प्रताप पूषा जयसिंहः क्ष्मामृद्धिनाथः।**

अनहिलवाड चालुक्याच्या ध्वजावर कोंबड्याचे चिह्न होते. जयसिंहाने इ.१०९३ ते ११४३ पर्यंत राज्य केले. त्यावरून वाग्भटाचा काळ इ.११७९ ते १२१३ हा ठरतो.

त्यांच्या ग्रंथावर सिंहदेवगणिकच्या टीकेव्यतिरिक्त जिनवर्धन सूरी, गणेश, क्षेमहंसमणी, राजहंसोपाध्याय आदिंच्या टीका उपलब्ध आहेत.

* *

## .१९.
# धनंजय

### जीवनवृत्त

नाट्यकारिकांचा रचयिता धनंजय विष्णुचा पुत्र होता व राजा मुंजचा राजसभासद होता. धनिक पण विष्णुचा पुत्र होता. त्यावरून असे वाटते की तो धनंजयाचा बंधू असावा. कारिकांची रचना मुंजच्या शासनकाळात झाली. दशरूपकाचा रचनाकाळ निर्धारित करण्यासाठी मुंज (वाक्पतिराज)च्या शासनकाळाची माहिती आवश्यक आहे. वाक्पतिराजाचा संवत् १०३१ (ई.स. ९७४) चा एक शिलालेख उपलब्ध आहे. ह्या शिलालेखात अहिच्छत्रहून आलेल्या धनिक पंडिताचा पुत्र वसंताचार्यला भूमीची स्वीकृती दिल्याचा उल्लेख आहे.

संवत् १०३६ ई.स. ९७९ चे, वाक्पतिराजाचे एक ताम्र स्वीकृतीपत्र आहे. त्यावरून असे दिसते की वाक्पतिराजाने देवी भद्रेश्वरीच्या नावाने उज्जयिनीत एक गाव दान दिले होते. आणि असेही कळते की तैलाप द्वितीयने मुंजला पराभूत करून त्याला बंदी केले व त्याचा वध केला.

अमितगतिने राजा मुंजच्या शासनकाळात सुभाषित रत्नसंदोह नामक ग्रंथाची रचना संवत् १०५० (इ.स. ९९३) मध्ये केली. मुंजचा शासनकाळ इ.स. ९७४ च्या प्रारंभी असावा. म्हणून दशरुपकाची रचना इ.स. ९७४-९९६ मध्ये निश्चितपणे झाली असावी.

काही विद्वानांनी धनंजय व धनिक ह्या एकच व्यक्ती मानल्या आहेत. परंतु हे योग्य नाही. दशरुपकाची रचना इ.स. ९७४-९९६ च्या काळात झाली व त्यावर धनिकाची टीका इ.स. १००० पूर्व लिहिल्या गेली नव्हती. त्यामुळे धनंजय आणि धनिक अभिनवगुप्ताचे समकालीन होते. कारण ह्या दोघांच्याही रचनेत परस्परांचा उल्लेख आला नाही.

### काळ

धनंजयाचा काळ निश्चित करण्यात प्रायः कोणतीच अडचण येत नाही. खालील श्लोकात ते स्वतःला विष्णुसुत आणि राजाद्वारा सुरक्षित





विद्वन्मण्डलाचे सदस्य सुद्धा म्हणतात.

**विष्णोसुतेनापि धनञ्जयेन, विद्वन्मनोरागनिबन्ध हेतुः।**
**आविष्कृतं मुञ्जमहीश गोष्ठी वैदअध्यभाजादशरुपकेतत्।।**

राजा मुंज मालवाच्या परमार वंशातील सप्तम राजा होते. त्यांच्या स्वतःच्या शिलालेखांवरून हे ज्ञान होते की ते ९७४ ई. मध्ये त्याचा पिता हर्षदेव सीयकानंतर राजसिंहासनावर बसले आणि त्यांनी जवळपास ९९५ ई. पर्यंत राज्य केले. चालुक्य शिलालेखांवरून असे ज्ञात होते की चालुक्य तैलप द्वितीयाने त्यांना पराजित केले आणि बंदी बनवून शेवटी वध केला. वाक्पतिराज हे मुंजराजाचे कवी म्हणून टोपणनाव होते. ह्याशिवाय ते अमोघवर्ष, पृथ्वीवल्लभ, श्रीवल्लभ इ. अनेक उपनामांनी प्रसिद्ध होते. भोज ह्याच मुंजाचे उत्तराधिकारी होते व कवित्व इ. गुण त्यांनी मुंजापासूनच ग्रहण केले होते. म्हणून धनंजय इ. १०च्या उत्तरार्धातील मानले जातात.

### धनंजय रचित दशरुपक

धनिक/धनंजयद्वारा लिखित 'दशरुपक' त्यावरील 'अवलोक' नावाच्या टीकेसह उपलब्ध आहे. ह्यामध्ये रससिद्धान्ताचे विवेचन आढळते. ह्या रचनेचा संबंध केवळ नाट्यशास्त्राशी आहे, काव्यशास्त्रातील विभिन्न विषयांशी नाही. ह्यामध्ये जवळपास ३०० कारिका आहेत व त्यांचे चार प्रकाशांमध्ये विभाजन केले आहे. भरताने २०व्या अध्यायाच्या पहिल्या दोन श्लोकांमध्ये १० प्रकारच्या नाटकांची नावे, कार्य, रंगमंचगत अभिनयसहित प्रस्तुत करेल असे म्हटले आहे.

नाटक, प्रकरण, अङ्क, व्यायोग, भाग, समवकार, वीथि, प्रहसन, डिम, ईहामृग हे नाटकाचे १० प्रकार आहेत. ह्यात नाटक व प्रकरण हे महत्त्वपूर्ण आहेत व नाटकाच्या अन्य प्रकारांसाठी आधाराचे काम करतात. भरताच्या मते नाटिकेची रचना ह्याच आधारावर होते.

ह्या रचनेचे नाव दशरुपक आहे कारण हे रुपकाच्या १० प्रकारांचे प्रतिनिधीत्व करते. भरताने काव्य व नाटकाला समानार्थी मानले आहे.

वामनाच्या मते काव्यरचनेत दशरुपकाचे स्थान उच्च आहे. संस्कृत नाट्यशास्त्राच्या विषयी तीन महत्त्वपूर्ण ग्रंथरचना आहेत. त्यात भरताचे

नाट्यशास्त्र, दशरुपक व साहित्यदर्पणाचे नाव उल्लेखनीय आहे.

दशरुपकाच्या प्रथम प्रकाशात गणेश, विष्णु, भरत व सरस्वती वंदनेनंतर दशरुपकांचे निरुपण केले आहे. ह्यानंतर नृत्य, नृत्त, लास्य, ताण्डव, पाच संधि, त्यांची अंगे-विष्कंभक, चूलिका, अंकास्य, अंकावतार, प्रवेशक इ. च्या परिभाषांचा उल्लेख आहे.

द्वितीय प्रकाशात विभिन्न प्रकारच्या नायक-नायिका, त्यांची विशेषता, त्यांचे मित्र, चार वृत्ती तसेच त्यांच्या अंगांचे वर्णन केले आहे.

तृतीय प्रकाशात नाटकाचा आरंभ कसा व्हावा, प्रस्तावना कशी असावी, नाटकाचे १० प्रकार कोणकोणत्या गुणांनी युक्त असावेत, ह्याविषयी व्यावहारिक सूचना दिल्या आहेत.

चतुर्थ प्रकाशात रसभाव, स्थायी व्यभिचारी तसेच रससंबंधी अन्य घटकांचा उल्लेख आहे. रसाचे वर्णन नाटकाच्या अंतर्गतच आहे.

धनंजय रसनिष्पत्तीसंबंधी ध्वनिवादी आचार्यांचे अनुसरण करत नाहीत. रसाची निष्पत्ती ते सामाजिकांमध्येच मानतात. परंतु रसाभिव्यक्ती व्यङ्ग्यव्यञ्जकभावाने न मानता भाव्य-भावक संबंधाने मानतात. रसनिष्पत्तीचा हा सिद्धांत भट्टनायकाचे अनुसरण करतो. ह्याशिवाय धनंजयाने रसास्वादाचे प्रकार, रसांची संख्या तसेच अन्य रसांची स्थिती ह्या संबंधी आपली भिन्न विचारधारा प्रस्तुत केली आहे. काळाच्या दृष्टीने धनंजय अभिनवगुप्ताचे समकालीन होते. परंतु विचारांच्या दृष्टीने दोघांमध्ये खूप भिन्नता आहे. अभिनवगुप्ताने शांत रसाला नवम् रसाच्या रुपात स्वीकारले आहे, तर धनंजयाने नाटकाच्या दृष्टीने आठ रसांच्या स्थितीलाच स्वीकारले आहे. 'शममपि केचित्प्राहुः पुष्टिर्नाट्येषु नेतस्य।' धनंजयाच्या मते शांत रसाचा उपयोग नाटकाच्या कथावस्तुत केला जात नाही. अभिनवगुप्त रसाच्या संबंधात व्यंजनावादाची पुष्टी करतात तर धनंजय तो अमान्य करतो. त्यांच्या मते रसानुभूतीसाठी व्यंजना आवश्यक नाही.

धनंजयाची एकमात्र रचना 'दशरुपक' आहे. ही रचना नाट्यशास्त्राशी संबंधित आहे. भरतमुनीच्या नाट्यशास्त्रानंतर ह्या विषयावरील सर्वाधिक प्रसिद्ध रचना आहे. नाट्यशास्त्रात नाटकीय विषयांचा अत्यंत विस्तारपूर्वक





विचार केला आहे. हा विस्तार इतका व्यापक आहे की कधी कधी सामान्य वाचकाला मूळ विषयापासून दूर करणे कठीण होते. नाट्यशास्त्रामध्ये नाटकीय विषयांच्या अतिरिक्त अनेक अन्य विषय आले आहेत. म्हणून ह्याला अन्य विषयांचा विश्वकोश म्हटले जाते. भरताचा ग्रंथ बृहत् आणि अन्य विषय विस्तारांमुळे जटिल झाला आहे. धनंजयाने ह्या विस्ताराचा खूपच संकोच केला आहे. केवळ नाट्यक्षेत्रापुरतेच मर्यादित करून त्यांनी सामान्य सिद्धांतांना व्यावहारिक, संक्षिप्त तसेच सुव्यवस्थित रुपाने प्रस्तुत केले आहे. नाट्यशास्त्रातील पारिभाषिक शब्दावलीचे ज्ञान करण्यासाठी दशरुपक एक उपयोगी ग्रंथ आहे. विषयांचे प्रस्तुतीकरण अत्यंत सरल पद्धतीने केले आहे. भाषा सुबोध्य व सर्वग्राह्य आहे. ह्या गुणांमुळे हा ग्रंथ इतका प्रसिद्ध व प्रचलित झाला की ह्याने ह्या विषयावरील अन्य ग्रंथांव्यतिरिक्त भरताच्या आधारभूत ग्रंथांना सुद्धा गौण ठरविले. दशरुपकानंतरच्या नाट्यविषयक ग्रंथांमध्ये ह्यातीलच उद्धरणे व लक्षणांचे अनुकरण केले आहे. साहित्यदर्पणकार विश्वनाथ व नाट्यदर्पणकार रामचन्द्र गुणचन्द्र निश्चितपणे ह्याच ग्रंथाचे अनुकरण करतात.

दशरुपक संस्कृत साहित्यात सरलता, संक्षिप्तता, विषयांची शृंखलाबद्धता तसेच बोधगम्यता इ. कारणांमुळे लोकप्रिय आहे. संस्कृत नाट्यसिद्धांतांना लोकप्रिय करण्याचे बहुतांश श्रेय दशरुपकालाच आहे. नाटककारांसाठी बहुतेक सर्वच निर्देश ह्या ग्रंथात आले आहेत. परवर्ती साहित्यकारांनी ह्या नियमातील प्रमुख नियमपालन करण्याचा प्रयत्न केला आणि सैद्धांतिकांनी सुद्धा जवळपास ह्याच पद्धतीचे अनुकरण केले. भानुदासाचे रसमञ्जरी, रसतरङ्गिणी व भावमिश्राची रस रसी व नायिकाभेदाचे अन्य ग्रंथ सुद्धा दशरुपकानेच प्रभावित झाले आहेत. रामचन्द्र गुणचन्द्राचे नाट्यदर्पण सुद्धा ह्यालाच उपजीव्य बनवून लिहिले गेले आहे.

नाट्यशास्त्राइतकेच विस्तृत आणि सांगोपांग विवेचन दशरुपकात असल्यामुळे आज हा ग्रंथ विद्वन्मान्य ठरला आहे.

* *

.२०.

# मम्मट

मम्मटाच्या जीवन व काळाविषयी साधारणपणे काही माहिती उपलब्ध नाही. त्यांचे नाव व उपाधी 'राजानक' होती, त्यावरून ते काश्मिरी असावेत.

**मम्मटाचा काळ**

मम्मटाच्या काळाची मर्यादा एका पांडूलिपीमध्ये अंकित तिथीवरून तसेच काव्यप्रकाशावरील दोन टीकांच्या आधारे निश्चित करता येते. माणिक्यचंद्राच्या टीकेवर स्पष्टपणे संवत् १२१६ किंवा इ. १५५६-६० असे नोंदवले आहे. रूय्यकाद्वारा रचित टीकेची शुद्धता ज्ञात नाही परंतु अन्य ग्रंथांच्या प्रमाणांनी सूचित होते की रुय्यक १२व्या शतकाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या चरणात झाले. जैसलमेर येथील प्राचीनतम पांडूलिपी इ. ११५८ मध्ये तयार केली गेली. म्हणून मम्मटाची कालमर्यादा १३व्या शतकाच्या प्रारंभानंतर ठरविता येत नाही.

मम्मटाच्या व्यक्तिगत जीवनाविषयीपण विशेष माहिती उपलब्ध नाही. काव्यप्रकाशचे एक टीकाकार भीमसेन, त्यांना जैयटाचा पुत्र, कैथट आणि उक्कटाचा ज्येष्ठ बंधू मानतात. परंतु भीमसेनाची माहिती सुद्धा त्रुटिपूर्ण वाटते. कारण अन्य प्रमाणांच्या आधारावर हे सिद्ध झाले आहे की उक्कटाच्या पित्याचे नाव वज्रट होते, जैयट नाही. कैथटाच्या बाबतीत भीमसेनाचे कथन सत्य असेल परंतु आजपर्यंत ह्याची पुष्टी झाली नाही. मम्मटाने अभिनव गुप्त (इ. १०१५) तसेच पद्मगुप्त (इ. १०१०) च्या काळातील पद्यांना उद्धृत केले आहे. ह्यावरून मम्मटाचा काळ ११व्या शतकाचा उत्तरार्ध मानावा लागतो.

**रचना**

मम्मटाच्या प्रसिद्धीचा मुख्य आधारस्तंभ 'काव्यप्रकाश' आहे. हा अत्यंत लोकप्रिय ग्रंथ आहे. ह्याशिवाय मम्मटाने 'शब्द व्यापार परिचय' पण लिहिला. परंतु हा ग्रंथ विशेष परिचित नाही. ह्या ग्रंथात शब्दाच्या कृतीवर संक्षिप्तपणे चर्चा केली आहे. काही लोक ज्यात पीटरसन प्रमुख होते, सुरूवातीला



काव्यप्रकाशाच्या कारिका व वृत्ती दोन भिन्न भिन्न व्यक्तींच्या रचना मानत होते. परंतु कालांतराने त्यांनी ह्या मतात सुधारणा केली आणि कारिका आणि वृत्ती एकाच व्यक्तीच्या आहेत हे मान्य केले आहे. अधिकांश टीकाकार ही गोष्ट मान्य करतात की मम्मटाच्या काव्यप्रकाशाचा एक अंश अपूर्ण होता, तो अलट नावाच्या लेखकाने पूर्ण केला.

माणिक्यचंद्र सूरिने आपल्या टीकेत काव्यप्रकाशाच्या टीकेत लेखकद्वयाचा प्रश्न असा सोडविला आहे.

'अथ चायं ग्रन्थोऽन्येनारब्धोऽपरेण च समर्थित इति द्विखण्डोऽपि सघटनावशादखंडायते।'

रूय्यक, चयत भट्ट, सोमेश्वर, नरहरि सरस्वतितीर्थ आदी अनेक टीकाकार ह्याच मताचे समर्थक आहेत. साधारणतः 'परिकर' अलंकारापर्यंतचा ग्रंथ मम्मटाची रचना आणि उर्वरित भाग अलक किंवा अलटाचा मानतात.

काव्यप्रकाशाची रचना योजनाबद्ध व सुव्यवस्थित आहे. ग्रंथामध्ये १४२ कारिका व १० उल्लास आहेत. विभिन्न विषयांवर जवळपास ६२० पद्य व अन्य कवींच्या रचनांतील उदाहरणे दिली आहेत. उल्लासांच्या क्रमानुसार असे विषय येतात.

१) काव्यप्रयोजन, काव्यहेतू, काव्यलक्षण व काव्यविभाजन

२) शब्दांचे वाचिक, लाक्षणिक तसेच व्यंजक भेद, तसेच अर्थांचे भेद, लक्षणा तसेच व्यंजनेचे विस्तृत वर्णन

३) अर्थांची व्यंजकता व व्यंजनेचे त्यात योगदान

४) ध्वनिचे विवक्षित वाच्य व अविवक्षित वाच्य भेद, रसाचे स्वरूप, स्थायी भाव, विभाव व व्यभिचारी भावांचे वर्णन, रसानुभूती विषयक विभिन्न सिद्धांत.

५) गुणीभूत व्यंङ्ग्य प्रकार व व्यंङ्ग्याच्या महत्त्वाची सिद्धता

६) अधम काव्य व त्याचे दोन भेद-शब्दचित्र आणि अर्थचित्र

७) पद, वाक्य, अर्थ व रसदोष

८) गुण व अलंकारांतील भेद, गुणत्रयवादाचे समर्थन, त्यांचे लक्षण

९) शब्दालंकार व रीती

१०) अर्थालंकार

**काव्यप्रकाश**

मम्मटाचे स्थान संस्कृत साहित्यात अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. मम्मटाची रचना काव्यप्रकाश अत्यंत लोकप्रिय ग्रंथ आहे. सर्वच विद्यार्थी व अध्येता काव्यप्रकाशाचा सन्मान करतात. मम्मटाच्या पूर्व ९०० वर्षांमध्ये अलंकारशास्त्रासंबंधी जे चिंतन झाले त्याला मम्मटाने काव्यप्रकाशात अत्यंत नैपुण्याने मांडले आहे. काव्यप्रकाशवर आजपर्यंत १०० पेक्षा अधिक टीका लिहिल्या गेल्या. तरी सुद्धा हा ग्रंथ दुर्बोध मानला जातो. मम्मटाचे एक टीकाकार सुधासागराचे कर्ता भीमसेनांच्या शब्दांत, 'काव्यप्रकाशाय टीकागृह तथाप्येष तथैव दुर्गमः।' ह्यावरून ह्या ग्रंथाच्या दुर्बोधतेचा अंदाज लावता येतो. हा ग्रंथ केवळ भारतातच लोकप्रिय नाही तर भारताबाहेर सुद्धा प्रसिद्ध आहे. प्रसिद्ध विद्वान स्व. राहूल साकृत्यायन यांना काव्यप्रकाशची एक प्रत तिबेटमध्ये मिळाली.

ह्यावरून ह्या ग्रंथाचा प्रसार भारताबाहेरही झाला होता हे सिद्ध होते. मम्मटाच्या पूर्ववर्ती आलंकारिकाकडे दृष्टिक्षेप टाकला तर असा प्रश्न उद्भवतो की ह्या ग्रंथाच्या इतक्या लोकप्रियतेचे कारण काय? भरत आणि भामहापूर्वी सुद्धा काव्यशास्त्रावर चिंतन सुरू होते. त्याकडे ह्या दोन्ही विद्वानांनी संकेत केला आहे. परंतु ग्रंथरूपामध्ये कोणतीच रचना भरताच्या नाट्यशास्त्रापूर्वी नव्हती आणि अलंकारशास्त्रावरील कृती म्हणजे भामहाचा काव्यालंकारच आहे. भरतमुनींच्या नाट्यशास्त्रामध्ये नाट्यशास्त्राशी संबंधित विषयांचे विवेचन झाले आहे. भरतमुनींची रससूत्रे सुद्धा नाटकाच्या अनुषंगानेच रसाची व्याख्या करतात आणि भरतमुनींनी केवळ चार अलंकारांची चर्चा केली आहे. आणि ते अलंकार सुद्धा गौण आहेत, मुख्य नाहीत. ह्यावरून हा स्पष्ट निष्कर्ष निघतो की नाट्यशास्त्राला अलंकारशास्त्रावरील ग्रंथामध्ये प्राधान्य देता येत नाही. नाट्यसिद्धांताच्या क्षेत्रात नाट्यशास्त्राचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. रससंबंधी चिंतनाला सुद्धा ह्यामुळे प्रेरणा मिळाली आहे. परंतु अलंकारशास्त्राचे अनेक विषय ह्या ग्रंथात आलेले नाहीत.

काव्यशास्त्राच्या विषयांचे निबंधन सर्वप्रथम भामहाच्या काव्यालंकारात आले आहे. भामहाने अलंकारशास्त्राच्या विषयांना एक



सुनिश्चित व सुनियोजित रूप दिले. हा प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहे. परंतु अलंकाराच्या ग्रंथाच्या रूपात हे चिंतन अत्यंत प्राथमिक वाटते. काव्याच्या बाह्य रूपांपर्यंतच भामहाची दृष्टी जाते. सूक्ष्म आत्मतत्त्वापर्यंत भामह पोहचत नाहीत. कारण भामहाच्या काळापर्यंत हे चिंतन प्रौढ झाले नव्हते. आधुनिक काळातील श्रेष्ठ आलोचक (येथे मराठी समीक्षक शब्द वापरावा का?) डॉ. एस. के. डे यांनी ह्या ग्रंथाला काव्याच्या बाह्यांगाशी संबंधित पारिभाषिक ग्रंथांची संज्ञा दिली आहे. कारण त्यात सर्वप्रथम परिभाषा संग्रहित केल्या आहेत. भामहाने काव्याच्या मूलघटकांचा स्वीकार केला तसेच काव्यगुणांचा स्वीकार करून काव्यशास्त्राच्या भावी भवनाच्या निर्मितीसाठी मौलिक भूमी प्रदान केली परंतु भामहाच्या विवेचनामध्ये उणीवा सुद्धा भरपूर आहेत.

भामहानंतरचा काळ अलंकारशास्त्राच्या निर्मितीचा काळ म्हटला जातो. ह्या युगात काव्यशास्त्राच्या आधारभूत समस्यांवर विशद विवेचन झाले आणि अनेक बाबतीत निर्णय पण घेतले गेले. ह्याच युगात काव्यशास्त्राला चार विभागात विभागल्या गेले. रीति संप्रदाय, अलंकार संप्रदाय, रस संप्रदाय आणि ध्वनि संप्रदाय. उद्भट, रुद्रट आणि भामह काव्यालंकारावरच आपले लक्ष केंद्रित करतात. वामन ह्याच्या पुढे जाऊन रीतीला काव्याचा आत्मा मानतात. ही दोन्ही मते काव्याच्या बाह्य स्वरूपापर्यंत मर्यादित आहेत. ह्याशिवाय भट्टलोल्लट, शंकुक आणि भट्टनायकाने रससूत्रावर आपल्या पद्धतीने व्याख्या केल्या. हे तिघे भरताचे टीकाकार होते. म्हणून एका मर्यादित दृष्टिकोनाचा त्यांनी स्वीकार केला.

आनंदवर्धनांपासून अलंकारशास्त्राच्या क्षेत्रात एका वैचारिक क्रांतीचा उद्भव झाला. भामह आणि वामनादि अलंकारशास्त्रींचे लक्ष ध्वनि आणि रसाच्या सूक्ष्म प्रक्रियेकडे गेले नव्हते. लक्ष्य ग्रंथात असूनसुद्धा ध्वनि लक्षणग्रंथात अस्पष्टच होता. रसाच्या संबंधी सुद्धा सूक्ष्म चिंतन न समानच होते. आनंदवर्धनांनी ध्वनीचे सविस्तर वर्णन केले. रसाला व्यंङ्ग्याच्या क्षेत्रात आणून खंडन केले तसेच चिंतनाच्या क्षेत्रात एक नवा प्रवाह मांडला. प्रत्येक नवीन सिद्धांताला विरोध होतो तसा ध्वनीला सुद्धा विरोध झाला. परंतु मम्मट आणि अभिनवगुप्ताच्या प्रयत्नाने ध्वनीची पुन्हा स्थापना झाली आणि आज

ध्वनी एक सर्वसंमत सिद्धांताच्या रुपाने स्वीकृत आहे. इतके सगळे होऊन सुद्धा मम्मटाचा ग्रंथ अनेक विषयांना स्पर्श करीत नाही. जसे रसानुभूतीची प्रक्रिया, अभिधा, लक्षणादींचे लक्षण आणि अलंकारांची परिभाषा. अलंकारशास्त्राच्या क्षेत्रात आनंदवर्धनानंतर अभिनवगुप्ताचे नाव येते. वैचारिक दृष्टीने अभिनवगुप्तांचे स्थान अत्यंत उच्च आहे. त्यांची रससूत्राची परिभाषा अलौकिक आहे. त्यांची ध्वनीच्या स्थापनेची युक्ती काव्यशास्त्राला लाभलेली अपूर्व देणगी आहे. काव्यशास्त्रात दार्शनिक प्रक्रिया आणणे आणि त्याची शास्त्रसंमत व्याख्या करणे हे अभिनवगुप्ताचे कार्य होते. परंतु दुर्भाग्य हे आहे की अभिनवगुप्ताने अलंकारशास्त्रावर केवळ दोन टीका लिहिल्या. त्यातली पहिली आहे ध्वन्यालोकावरील लोचन टीका व दुसरी आहे नाट्यशास्त्रावरील अभिनव भारती. अलंकारशास्त्राशी संबंधित कोणत्याही तंत्रशास्त्राची रचना त्यांनी केली नाही. म्हणून ह्या क्षेत्रातील संपूर्ण विषयांना ते स्पर्श करू शकले नाहीत. चिंतक म्हणून सर्वश्रेष्ठ असूनसुद्धा त्यांच्याद्वारा स्वतंत्र रचनेचा अभाव खटकतो.

मम्मट साहित्यशास्त्रातील अशा काळाशी संबंध ठेवतात जेव्हा ह्या क्षेत्रात प्रौढतेने पदार्पण केले होते. सैद्धांतिकांनी आपले सिद्धांत प्रस्तुत केले होते. अनेक सिद्धांत प्रतिष्ठापित पण झाले होते आणि काही प्रतिष्ठित होत होते. काव्यशास्त्री ह्या सिद्धांतांना सुनियोजित रूप देण्यात प्रयत्नशील होते. मम्मटाने आपल्या चिंतनाच्या पृष्ठभूमीच्या रूपाने आपल्या पूर्ववर्ती अलंकारशास्त्रींकडून काही ना काही ग्रहण केले. तरीसुद्धा त्या सर्वांचा समन्वय करण्याची शक्ती त्यांच्यात होती. मम्मटांनी त्यांच्या पूर्वीच्या कथित सिद्धांतांना एक नवीन रूप दिले. भामहाची काव्यपरिभाषा आणि गुणसंबंधी विचार तसेच आनंदवर्धनांचा ध्वनिसिद्धांत ही त्याची दोन प्रत्यक्ष उदाहरणे आहेत. काव्यप्रकाशच्या टीकाकारांमध्ये असाही एक वर्ग आहे की जो मम्मटावर कसून टीका करतो. त्यांच्या मते मम्मटांनी ह्या क्षेत्रात नवीन काहीच दिले नाही. काही तर ह्या मर्यादेपर्यंत जातात की काव्यप्रकाशचा प्रत्येक विचारच नव्हे तर प्रत्येक शब्द सुद्धा मम्मटपूर्व युगाच्या चिंतनाचा परिणाम आहे. ही गोष्ट नाकारता येत नाही की सिद्धांताच्या नावावर मम्मटांनी कोणतीही नवीन



गोष्ट अलंकारशास्त्राला दिली नाही. त्यांनी रीति समान कोणताही ग्रंथ दिला नाही. केवळ त्यांच्या समन्वित दृष्टिकोनामुळे त्यांचा ग्रंथ वर्षानुवर्षे प्रिय राहिला.

मम्मटाने आपल्या पूर्ववर्ती सिद्धांतांना व विचारांना केवळ सुनियोजित रूपच दिले नाही तर त्याला प्रतिष्ठा सुद्धा दिली. मम्मटांनी १४२ कारिकांमध्ये अलंकारशास्त्र किंवा साहित्यशास्त्राच्या क्षेत्राचे विवेचन केले. काव्यशास्त्राची संपूर्ण बांधणी 'तददोषौ शब्दार्थौ' इ. काव्यपरिभाषेशी बांधल्या गेली आहे. काव्यकारण, प्रयोजन, काव्यभेद, शब्दांचे प्रकार, अभिधा, लक्षणा, व्यंजना, रस आणि त्याचे प्रकार, रसानुभूती, दोष, गुण, रीती, शब्दालंकार, अर्थालंकार इ. वर्णन काव्यप्रकाशात येते. काव्यशास्त्राचा असा एकही विषय नाही ज्याचे वर्णन या ग्रंथात येत नाही. सूत्रशैली ह्या अत्यंत प्रभावकारी पद्धतीने सर्व विषयांचे प्रतिपादन केले आहे. मम्मटाने साहित्यशास्त्राच्या ह्या क्षेत्रात अत्यंत उच्च स्तराची रचना केली आहे. म्हणून एखाददोन अपवाद वगळता पश्चादवर्ती सर्वच आलंकारिक त्याच्यापुढे महत्त्वहीन वाटतात. थोड्या शब्दात अधिक अर्थ देण्याचे सामर्थ्य मम्मटाचार्यांमध्ये आहे. मम्मटाने आपल्या रचनेत ह्या रीतीचा सुंदर वापर केला आहे. म्हणूनच त्याच्या रचनेत माधुर्य व ओज या दोन्ही गुणांचे संमिश्रण दिसून येते. आचार्य पां. वा. काणे यांचे असे मत आहे की काव्यप्रकाश ग्रंथ आपल्या पूर्व सर्व विचारांचे सार ग्रहण करतो. तरीसुद्धा हा एक असा प्रवाह आहे ज्यामध्ये सर्व सिद्धांतांच्या नद्या उगम पावून वाहतात.

मम्मट समन्वयवादी आलंकारिक आहेत. त्यांनी काव्याच्या बाह्यरूपाला महत्त्व दिले नाही. काव्याच्या सिद्धांताबाबत त्यांची दृष्टी कोणत्याच प्रकारे एकांगी नाही. त्यांचा हा समन्वयवादी दृष्टिकोन बहुधा सर्वच जागी दिसून येतो. उदाहरण म्हणून त्यांनी केलेली काव्याची परिभाषा देता येईल. ह्यात केवळ शब्द, अर्थ आणि अलंकारांवरच भर दिला नाही तर रसाचे अभिन्न धर्म, गुणांवर सुद्धा भर दिला आहे. दुसऱ्या शब्दांत मम्मटांनी अलंकारासोबतच रसाची अनिवार्यता स्वीकारली आहे. असे करणे मम्मटाच्या काळाची गरज होती. कारण त्या काळी कोणताही सिद्धांत अन्य विद्वांनांकडून अधिक प्रभावशाली होऊन सुद्धा संकीर्णच भासत असे.

मम्मटांनी ही संकीर्णता दूर केली त्यामुळेच ते काळाच्या कसोटीवर खरे ठरतात. आनंदवर्धनांनी वाच्य व प्रतीयमान दोन्ही अर्थांना यथोचित स्थान दिले. मम्मटांनी त्यांच्या विचारांना पुढे नेले. ध्वनीवर घेतल्या जाणाऱ्या सर्व आक्षेपांना व टीकांना युक्तिसंगत उत्तर देऊन मम्मटांनी ध्वनीची अशी स्थापना केली की त्यांच्या नंतर ध्वनिच्या विरोधात कोणीही आवाज केला नाही आणि ध्वनि सर्वमान्य सिद्धांत ठरला. रसानुभूतींच्या संबंधात सुद्धा मम्मट युक्ती आणि भावना दोहोंना स्थान देतात आणि तर्कसंगत विवेचन करूनच कोण्या एकाला महत्त्व देतात.

मम्मटांनी आपल्या पूर्ववर्ती समस्त सिद्धांतांचे परीक्षण केले आणि जो सिद्धांत अत्यंत बहुमूल्य होता त्याचाच आपल्या ग्रंथात प्रयोग केला. मम्मटाची रचना दर्शन आणि व्याकरण दोन्हीवर आधारित होती. कोणत्याही सिद्धांताला आपल्या ग्रंथात स्थान देण्यापूर्वी त्यांनी आवश्यकतेनुसार ह्या दोन्ही दृष्टींनी त्यांचे मूल्यांकन केले. मम्मटाचे पांडित्य परिपक्व होते. ह्या परिपक्वतेची छाप काव्यप्रकाशच्या प्रत्येक पानावर दिसून येते. कदाचित हीच परिपक्वता ग्रंथांच्या दुर्बोधतेचे कारण झाली असावी. परंतु दुर्बोध असून सुद्धा मम्मटाचा सिद्धांत योग्य स्थळी सुगम झाला आहे. कारण विचारांची जटिलता भाषेच्या सरलतेशी जोडल्या गेली आहे. सिद्धांतांच्या बाबतीत मम्मट एक सूक्ष्म अंतर्दृष्टी ठेवतात. प्रत्येक विषयाच्या संबंधात अत्यंत खोलात जाऊन विचार करतात. म्हणूनच भावी विद्वान व काव्यशास्त्राच्या प्रणेत्यांसाठी काव्यप्रकाश प्रकाशस्तंभाचे काम करीत आहे.

* *



## .२१.
# हेमचन्द्र

**जीवनवृत्त**

प्रभावक चरितात हेमचंद्राच्या जीवनासंबंधी विस्तृत माहिती मिळते. हेमचंद्र धंधुका येथे मोड बनिया परिवारात जन्मास आला. त्याच्या पित्याचे नाव चाच किंवा चाचिंग व आईचे नाव पाहिनी होते. हेमचंद्राचे मूळ नाव चंगदेव होते. हेमचंद्राविषयी चार महत्त्वपूर्ण तिथींचा उल्लेख प्रभावक चरितात केला आहे. इ.स. १०८८ कार्तिक पौर्णिमेला त्यांचा जन्म झाला. इ.स. १०९३ मध्ये त्यांनी विद्यारंभ केला. इ.स. ११०९ मध्ये ते सूरि किंवा आचार्य बनले. इ.स. ११७३ मध्ये वयाच्या ८४व्या वर्षी त्यांचा मृत्यू झाला. हेमचंद्राचे गुरूदेव चन्द्र हे होते.

हेमचंद्राने मम्मटाचा उल्लेख केला आहे. तसेच काव्यप्रकाशातील १३वा श्लोक उद्धृत केला आहे.

**काळ**

हेमचंद्राने काव्यानुशासन हा ग्रंथ शब्दानुशासनानंतर लिहिला. काव्यानुशासनात कुमारपालाचा कोणताच उल्लेख नाही. ह्या तथ्यांवरून असे सिद्ध होते की काव्यानुशासन साधारणपणे इ.स. ११४०ची रचना आहे. जयसिंह सिद्धराजाच्या आदेशावरून त्याने शब्दानुशासन लिहिले. जयसिंहाचा शासनकाल इ.स. १०५३ ते ११४३ पर्यंत होता. त्याचा उत्तराधिकारी कुमारपालने इ.स. ११४३ ते ११७२ पर्यंत राज्य केले. त्यामुळे काव्यानुशासनाची रचना इ.स. ११३६ ते ११४३ च्या मध्ये झाली असावी.

त्यांच्या रचनांमध्ये अनेक लेखकांची व रचनांची नावे आली आहेत. त्यातील उल्लेखनीय नावे अशी आहेत– अवन्तिसुन्दरी, उषाहरण, दण्डी, भट्टतोत, भट्टनायक, पञ्चशिखशूद्रकथा, भामह विवरण, भोजराज, मम्मट, मंगल, मायुराज, यायावरीय, रावणविजय, वामन, शाक्याचार्य राहुल, राजशेखराचे हरविलास, हरिप्रबोध, हृदयदर्पण.

कीर्तिकौमुदीमध्ये त्यांची प्रशंसा ह्याप्रमाणे केली आहे.

**सदाहृदि वहेम श्रीहेमसूरेः सरस्वतीम्**

**सुवत्या शब्दरत्नानि ताम्रपर्णी जितायया।**

जैन लेखकांमध्ये हेमचंद्राचे उच्च स्थान आहे. ते महान ग्रंथकार होते आणि त्यांनी ज्ञानाच्या अनेक शाखांवर ग्रंथ रचले.

**ग्रंथविशेष**

हेमचन्द्राचा 'काव्यानुशासन' मौलिकच नाही तर संग्रहात्मक आहे. राजशेखरकृत काव्यमीमांसा, काव्यप्रकाश, ध्वन्यालोक आणि लोचनपासून ह्यात मुख्य आधार घेतले आहेत.

ह्या ग्रंथाचा एक गुण असा की त्यांनी वृत्ति आणि टीकेत जवळपास १५०० उदाहरणे विभिन्न ग्रंथांतून दिली आहेत. ह्या ग्रंथाचा परवर्ती आलंकारिकांवर खूप कमी प्रभाव राहिला आणि त्यांचा उल्लेख पण कमीच केला.

त्यांनी आपला महान व्याकरणिक ग्रंथ 'काव्यानुशासना'ची रचना शब्दानुशासनसिद्ध हेमचन्द्राच्या रचनेनंतर केली.

त्यांनी छन्दोनुशासन, द्रव्याश्रयकाव्य, अभिधानचिन्तामणि, देशीनाममाला, त्रिषष्टिशलाकापुरूषचरित, योगशास्त्र इ. ग्रंथांची सुद्धा रचना केली आहे.

काव्यानुशासन हा ग्रंथ तीन भागात विभक्त आहे. ह्यामध्ये सूत्र (गद्यात), वृत्ति आणि उदाहरण आहेत. सूत्रांना काव्यानुशासन, सूत्रांच्या वृत्तीला अलङ्कार चूडामणि आणि टीकेला विवेक असे नाव दिले आहे. विवेक टीका वृत्तीचे स्पष्टीकरण करून थोडीबहुत उदाहरणे प्रस्तुत करते परंतु अनेक जागी हे स्पष्टीकरण अपूर्ण आहे. उदा. ह्याच्या प्रस्तावनेत सांगितले आहे,

**विवरीतुं क्वचिद् दृब्धं नवं सन्दर्भितुं कवचित।**

**काव्यानुशानसस्यायं विवेकः प्रवितन्यते।**

काव्यानुशासनात आठ अध्याय आहेत.





प्रथम अध्यायात काव्याचा उद्देश, काव्याचा हेतु, प्रतिभा, प्रतिभेचे सहायक अभ्यास आणि व्युत्पत्ति, काव्याची परिभाषा, शब्द आणि अर्थाचे स्वरूप, मुख्यार्थ, गौणार्थ, लक्ष्यार्थ, व्यंगार्थ इ. अर्थांचे निरुपण आहे.

द्वितीय अध्यायात रस, स्थायीभाव, सात्विक भाव, व्यभिचारीभावांचे विवेचन आहे. तृतीय अध्यायात शब्ददोष, वाक्यदोष, रसदोष, अर्थदोष इ. चे विवेचन आहे. चतुर्थ अध्यायात माधुर्य, ओज आणि प्रसाद गुणांचे तसेच सहायक अक्षरांचे निरुपण आहे. पाचव्या अध्यायात अनुप्रास, यमक, चित्र, श्लेष, वक्रोक्ति, पुनरुक्ताभास ह्या ६ शब्दालंकारांचे वर्णन आहे.

सहाव्या अध्यायात २९ अर्थालंकारांची चर्चा आहे. त्यांनी संसृष्टीचा अंतर्भाव संकरमध्ये केला आहे. दीपक अलंकाराचे असे लक्षण दिले आहे की त्याचा तुल्ययोगितेत समावेश होईल. परिवृत्ति नामक अलंकाराचे लक्षण दिले आहे. ह्यात मम्मटाच्या पर्याय आणि परिवृत्ति दोहोंचाही अंतर्भाव होतो. रस, भाव इ. शी सम्बद्ध रसवत्, प्रेय, उर्जस्वी, समाहित इ. अलंकारांचे वर्णन केले नाही. ह्यात अनन्वय आणि उपमेयोपमेला उपमेचे प्रकार मानून त्यांचा उल्लेख केला आहे. प्रतिवस्तूपमा, दृष्टांत तसेच अन्य लेखकांद्वारा निरुपित निदर्शनाचा अंतर्भाव त्यांनी निदर्शनेतच केला आहे. स्वभावोक्ति आणि अप्रस्तुत प्रशंसाला त्यांनी क्रमशः जाति आणि अन्योक्ति नाम दिले आहे. उपर्युक्त अनेक अलंकारांचे लक्षण न देण्याचे कारण सुद्धा त्यांनी दिले आहे.

सातव्या अध्यायात नायक आणि नायिकेचे गुण आणि प्रकारांचा उल्लेख आहे. आठव्यात प्रेक्ष्य आणि श्राव्य हे दोन काव्याचे मुख्य भेद तसेच त्यांच्या अनेक उपभेदांचे व लक्षणांचे विवेचन केले आहे.

* *

.२२.

# विश्वनाथ

विश्वनाथ हे काव्यमीमांसक आणि कवी आहेत. ओडिसा प्रदेशातील एक विद्वान ब्राह्मण घराण्यात त्यांचा जन्म झाला. त्यांच्या पित्याचे नाव चंद्रशेखर होते. ते स्वतः कवी होते. विश्वनाथाने 'मम तात पादानाम्' असे म्हणून त्यांचे अनेक श्लोक उदाहरणांसाठी साहित्यदर्पणात उद्धृत केले आहेत. विश्वनाथ संस्कृत, शौरसेनी, महाराष्ट्री व प्राकृत भाषांचे पंडित वैयाकरणी होते. चंद्रशेखर व विश्वनाथ या दोघांनाही 'सांधिविग्रहिकमहापात्र' अशी पदवी लावलेली आढळते. ह्यावरून ते दोघेही कोण्या राजाच्या दरबारातील महत्त्वाचे अधिकारी असावेत असे वाटते. डॉ.पां.वा.काणे यांच्या मते हा देश बहुधा कलिंग असावा. विश्वनाथ वैष्णवमतानुयायी असावे, असे पंडितांचे मत आहे.

**जीवनवृत्त**

विश्वनाथाने आपला ग्रंथ साहित्यदर्पणात स्वतःचा जो परिचय दिला आहे त्याशिवाय अधिक माहिती त्यांच्याविषयी उपलब्ध नाही. ते एका सुप्रसिद्ध व विद्वान ब्राह्मण परिवारातील होते. त्यांचे वृद्ध प्रपितामह नारायण होते. ते अत्यंत विद्वान होते. त्यांनी अलंकारशास्त्रावर एक ग्रंथ रचला होता.

**तत्प्राणत्वं चास्मद् वृद्धप्रपितामह सहृदयगोष्ठी गरिष्ठ कवि पंडितमुख्य कीमन्नारायणपादैरुक्तम्।** (साहित्यदर्पण ३.२०३)

त्यांचे पिता चंद्रशेखर कवी आणि विद्वान होते. त्यांचे श्लोक विश्वनाथाने उद्धृत केले आहेत. विश्वनाथाने आपल्या पित्याच्या पुष्पमाला आणि भाषार्णव ह्या दोन ग्रंथांचा उल्लेख केला आहे. ह्या ग्रंथांमध्ये संस्कृत, शौरसेनी, महाराष्ट्री व अन्य प्राकृत भाषांच्या विशेषतांचे विवेचन केले आहे. विश्वनाथाने आपल्या काव्यप्रकाश टीकेत काही संस्कृत शब्दांना उडिया पर्यायवाची शब्द देऊन त्यांची व्याख्या केली आहे. त्यावरून ते उडियानिवासी असावे असे वाटते. विश्वनाथ व त्याचे पिता बहुधा कलिंगदेशाच्या राजाचे महत्त्वपूर्ण अधिकारी होते. दोघांनाही सन्धिविग्रहिक महापात्र या पदवीने



विभूषित केले होते. प्रथम परिच्छेदाचे उपसंहारात्मक पद्य व साहित्यदर्पणातील अंतिम श्लोकावरून हे स्पष्ट होते की विश्वनाथ वैष्णव होते. कारण त्यांनी 'श्रीमन्नारायण चरणारविंद धूव्रत' असा उल्लेख केला आहे. ते स्वतः कवी होते. त्यांनी अलंकाराचे उदाहरण म्हणून संस्कृत व प्राकृतात लिहिलेले स्वतःचे पद्य अनेक जागी उद्धृत केले आहे.

**काळ**

विश्वनाथाचा काळ निश्चित करण्यात काही अडचण येत नाही. कारण सुदैवाने असे काही पुरावे उपलब्ध आहेत की ज्यावरून त्यांचा काळ निश्चित करता येतो. साहित्यदर्पणाच्या जम्मू येथे असलेल्या हस्तलिखित प्रतीची तिथी इ.स. १३८४ ची आहे. त्यावरून साहित्यदर्पणची रचना इ.स. १३८४ मध्ये झाली. विश्वनाथाने मुसलमान राजा अलाउद्दीनचा एक श्लोक उद्धृत केला आहे.

**सन्धौसर्वस्वहरणं विग्रहे प्राणनिग्रहः**
**अलावद्दीननृपतै न सान्धेर्न च वग्रिहः।** (४.१४)

अलाउद्दीन खिलजीचा प्रिय सेनानी मलिक काफर हा होता. त्याने दक्षिणेवर आक्रमण केले आणि वरंगलवर अधिकार प्राप्त करून कन्याकुमारीपर्यंत आपली विजयध्वजा फडकवली. असे सांगतात की इ.स. १३१६ मध्ये अलाउद्दीनवर विषप्रयोग करून त्याला ठार केले गेले. अशा स्थितीत हा श्लोक जर अलाउद्दीनच्या जीवनकाळात रचला असे मानले तर साहित्यदर्पणाची रचना इ. १३०० पूर्वी होऊ शकत नाही. ह्या दोन गोष्टींवरून स्पष्ट होते की साहित्यदर्पणाची रचना इ.स. १३०० आणि १३८४ च्या मध्ये झाली. विश्वनाथने १२व्या शतकातील अनेक लेखकांचा नामोल्लेख केला आहे. १५व्या व १६व्या शतकातील लेखकांनी सुद्धा विश्वनाथाचा नामोल्लेख केला आहे. त्यामुळे हे निर्विवाद सिद्ध होते की त्याचा काळ इ.स. १३००–१३८० मध्येच होता.

**रचना**

साहित्यदर्पणाशिवाय त्यांनी अनेक ग्रंथ रचले. त्यातील काहींचा उल्लेख साहित्यदर्पणात मिळतो, ते असे – महाकाव्य राधाविलास संस्कृत

भाषेत, कुवलयाश्व चरितकाव्य प्राकृत भाषेत, प्रभावती परिणय नामक नाटिका, चन्द्रकला नामक नाटिका, प्रशस्तिरत्नावली नामक १६ भाषांचा करंभक.

साहित्यदर्पणाशिवाय त्यांनी 'नरसिंहविजय' नामक काव्य आणि 'काव्यप्रकाशदर्शन' नामक काव्यप्रकाशवर टीका सुद्धा लिहिली आहे. काव्यप्रकाशचे टीकाकार चण्डीदास हे विश्वनाथाच्या प्रपितामहांचे अनुज होते. त्यांचा उल्लेख असा येतो, 'अस्मत् पिता महानुज कवि पंडितमुख्य श्रीचण्डीदासपादानंद खण्डरसनाम्ना।' (७.३१)

**ग्रंथस्वरूप**

साहित्यदर्पण हा ग्रंथ १० परिच्छेदत विभागला आहे. प्रथम परिच्छेदात औपचारिक मंगलाचरणानंतर विश्वनाथाने काव्याचे फळ सांगितले आहे. त्यांनी अन्य ग्रंथकाराद्वारा निरुपित काव्यलक्षणांचे विवेचन केले आहे व शेवटी स्वतःचे 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' हे काव्यलक्षण सांगून त्याचे सोदाहरण विवेचन केले आहे.

द्वितीय परिच्छेदात वाक्य आणि शब्दाचे लक्षण देऊन शब्दाच्या तीन शक्ती अभिधा, लक्षणा आणि व्यंजना यांचे विस्तृत विवेचन केले आहे. तृतीय परिच्छेदात रसभाव, त्यांचे दोष व नायकनायिका भेद तसेच अन्य तत्संबंधी विषयांचे पूर्ण विवेचन आहे. चतुर्थ परिच्छेदात काव्याचे ध्वनि आणि गुणीभूत व्यंङ्ग्य हे दोन प्रमुख भेद व त्यांच्या उपभेदांची सुविस्तृत व्याख्या केली आहे. पाचव्या परिच्छेदात व्यंजनावृत्तीची स्थापना केली आहे व त्याच्या विरोधी मतांचे सतर्क खंडन केले आहे. सहाव्या परिच्छेदात नाट्यशास्त्राची सविस्तर व सांगोपांग चर्चा केली आहे. सातव्या परिच्छेदात त्यांनी काव्यदोषांचे विवेचन केले आहे. आठव्या परिच्छेदात काव्याच्या तीन गुणांचे निरुपण केले आहे. अन्य ग्रंथकारांद्वारा निरुपित अन्य गुण ह्या तीन गुणातच अंतर्भूत होतात किंवा ते गुण असत नाहीत, असे प्रतिपादन केले आहे. नवव्या परिच्छेदात लेखकाने वैदर्भी, गौडी, पांचाली व लाटी ह्या काव्यरचनांच्या शैलीची व्याख्या केली आहे. दहाव्या परिच्छेदात शब्दालंकार व अर्थालंकारांचे विवेचन आहे. संस्कृत अलंकारशास्त्रींच्या पंक्तित विश्वनाथ द्वितीय कोटीचे लेखक आहेत.



संस्कृत साहित्यशास्त्राच्या इतिहासात साहित्यदर्पणाला दुय्यम स्थान असले तरीही त्यात काही चांगले गुण आहेत. सर्वस्पर्शित्व आणि सुबोध विवेचनपद्धती हे या ग्रंथाचे गुण आहेत. या शास्त्रावरील अन्य ग्रंथकारांनी नाटकाविषयी विवेचन केले नाही पण साहित्यदर्पणात ह्या विषयाची सांगोपांग माहिती आहे. विश्वनाथाने हे विवेचन भरत व धनंजय यांची वाट पुशीत केले आहे. तरी त्याचा हा ग्रंथ नाट्यशास्त्रावरील एक प्रमाणभूत ग्रंथ म्हणून मान्यता पावला आहे.

त्याचप्रमाणे त्याने अलंकारविषयक भाग रुय्यकाला आणि उर्वरित भाग मम्मटाला अनुसरून लिहिला आहे. त्यामुळे या ग्रंथात नवा विचार, नवी मांडणी, बारीक निरीक्षण इ. आढळत नाही, असे सर्व अभ्यासक म्हणतात. असे असूनही काव्यशास्त्राच्या जिज्ञासू अभ्यासकांना हा ग्रंथ मार्गदर्शक ठरतो यात शंका नाही.

साहित्यदर्पणाचा प्रसार भारताच्या पूर्व भागात, विशेषतः बंगालमध्ये झाला आहे. या ग्रंथावर आतापर्यंत केवळ चार टीका झाल्या आहेत.

अशाप्रकारे संस्कृत नाट्यशास्त्राच्या क्षेत्रात भरताचे नाट्यशास्त्र, धनंजयाचे दशरुपक आणि विश्वनाथाचे साहित्यदर्पण हे ग्रंथ त्रिमूर्ती मानले जातात.

साहित्यदर्पणाची दुसरी विशेषता म्हणजे त्याची सरळ व प्रवाहमयी भाषाशैली होय. मम्मटाने प्रयत्नपूर्वक संक्षिप्ततेचा स्वीकार केला आहे. त्यामुळे पाठकांना अध्ययन करतांना जागोजागी अडचणी येतात. जगन्नाथ आपल्या अलंकृत भाषेने, सूक्ष्म तर्कशैलीने तसेच पूर्ववर्ती ग्रंथकारांच्या कठोर समीक्षणाने पाठकांना भयभीत करून टाकतो. त्यांचे विवेचन अत्यंत स्पष्ट आहे. साहित्यदर्पणाच्या भाष्यात हे स्पष्ट केले आहे की विश्वनाथ अलंकारसर्वस्वाचे किती ऋणी आहेत.

कधीकधी विश्वनाथ स्वतःच्या चिंतनाचा त्याग करून अन्धानुकरण करतात. त्यांनी उदाहरणे निवडण्यात अधिक वेळ घालविला नाही. प्रथम, द्वितीय आणि दशम परिच्छेदात आलेल्या २५० उद्धरणातील जवळपास ८५ श्लोक ध्वन्यालोक काव्यप्रकाश आणि अलंकारसर्वस्व या ग्रंथातून घेतले

आहेत व त्यांचे स्वतःचे २० श्लोक आहेत. ज्या नवीनतांचे त्यांनी प्रतिपादन केले त्यात ते सफल झाले नाहीत. अनेक ठिकाणी त्यांचे मत पूर्णपणे असंगत आहे. हे दोष असूनसुद्धा त्यांच्या ग्रंथात संस्कृत साहित्यशास्त्राचा सरळ व उपयुक्त परिचय मिळतो.

साहित्यदर्पणावरील टीकांवरून असा तर्क करता येतो की बंगालव्यतिरिक्त अन्यत्र हा ग्रंथ अधिक लोकप्रिय झाला नाही. ह्या ग्रंथावरील केवळ ५ टीका उपलब्ध आहेत. त्यामुळे टीकाकारांमध्ये साहित्यदर्पण विशेष मान्य झाला नाही. कदाचित ग्रंथाची अतिसरलता हे त्याचे कारण असावे. त्यामुळेच साहित्यदर्पण लोकप्रिय झाला आहे.

विश्वनाथाच्या काव्यशास्त्रीय विवेचनाची गुणवत्ता हे त्यांचे खास वैशिष्ट्य आहे. त्यांनी भारतीय काव्यांगांचे प्रामाणिक विवेचन केले असून स्वतःचे महत्त्व रेखांकित केले आहे.

* *



.२३.

# अप्पय्य दीक्षित

**जीवनवृत्त**

अप्पय्य दीक्षित भारद्वाज गोत्रातील तमिळ शैव ब्राह्मण होते. शिवादित्य मणिदीपिकेच्या प्रारंभी आलेल्या खालील श्लोकावरून त्यांच्या अद्वैत शिवभक्तिचा परिचय मिळतो.

श्रीरंगाचार्य द्वितीयचे ताम्रपत्र शके १४९९ नुसार तंजावरचा नायकवंशाचा राजा शिवाप्पनायकाच्या प्रार्थनेवरून विजयनगरचा राजा श्रीरंगदेवरायाने माधवला (विजयेन्द्रतीर्थ) अरमोली मंगल नावाचे गाव दान केले. हे माधव संन्यास घेण्यापूर्वी सुविख्यात अप्पय्य यांचे मित्र होते. अप्पय्याच्या आत्मार्पण स्तुतीच्या विषयी लिहिलेल्या शिवानंदयतिकृत टीकेतून खालील श्लोक उद्धृत केला आहे.

**वीणातत्त्वज्ञ संख्यालसित काले समाभाक् प्रमादी च वर्षे द्वितीय चरणे कन्यामासे तु कृष्ण प्रथम तिथियोतेप्युत्तर प्रोष्ठपादेऽकन्यालग्नेषु द्विकन्यापतिर्मित दयासेनावधि वैंदिकेषु श्रीगौर्येप्राग्यथाहस्मसमजनिवारिश्चीशपुर्यां क्लेशः लग्ने रवीन्दु सुतयोर्मकरे च मान्यौ मीने शशिन्यथवृषे रविजे च राहौ चाषे गुरौ क्षितिसुते मिथुने तुलायां शुक्रे शिखियलिगते शुभलग्न एवम्।**

ही अप्पय्य दीक्षितांची जन्मपत्रिका आहे. ह्यांचा जन्म कलि ४६५४ मध्ये झाला. नीलकण्ठ दीक्षितांच्या शिवलीलार्णवकाव्यानुसार (नीलकण्ठ दीक्षित, अप्पय दीक्षितांचे धाकटे बंधू अच्चनचे पौत्र होते) अप्पय्य दीक्षित ७२ वर्षांपर्यंत जीवित राहिले व त्यांनी १०१ ग्रंथ लिहिले.

अप्पय्यांच्या पूर्वजांचे निवासस्थान 'अद्य पालम' मध्ये कलाकण्ठेश्वर नामक मंदिरात एक शिलालेख आहे. त्याची तिथी इ.स. १५९२ आहे. ह्या शिलालेखानुसार अप्पय्य रंगराजाचे पुत्र होते व चिन्नाबोमा त्यांचे आश्रयदाता होते व त्यांनी १०० ग्रंथ लिहिले. प्रा. एस. एस. सूर्यनारायण शास्त्रीद्वारा

संपादित शिवाद्वैत निर्णयात अप्पय दीक्षितांच्या सर्व ग्रंथांची सूची दिली आहे.

**काळ**

अप्पय्य दीक्षितांनी एकावली प्रतापरूद्रयशोभूषण तसेच अलंकारसर्वस्व संजीवनीला उद्धृत केले आहे. त्यांचा काळ इ. १४व्या शतकानंतरचा असावा. अप्पयांच्या निश्चित काळाविषयी मतभिन्नता आहे. सामान्यतः इ.स. १५५४ ते १६२६ पर्यंतचा काळ स्वीकारला जातो.

**ग्रंथरचना**

अप्पय्य दीक्षित हे बहुआयामी विद्वान आणि अनेक ग्रंथांचे लेखक आहेत. त्यांनी १००पेक्षा अधिक ग्रंथांची रचना केली आहे. त्यातील कमीतकमी तीन ग्रंथ काव्यशास्त्रविषयक आहेत.

त्यांचा पहिला ग्रंथ 'वृत्तिवार्तिक' हा आहे. वृत्तिवार्तिकाचे दोन परिच्छेद आहेत. ह्यात रुढी, योग आणि योगरुढी ह्या तीन प्रकारची अभिधा, चार प्रकारची लक्षणा आणि दोन शब्दशक्तींचे विवरण आहे. लक्षणेचे प्रथम शुद्धा आणि गौणी हे दोन भेद केले आहेत. त्यानंतर त्यांचे पुन्हा प्रभेद, उपभेद केले आहेत.

दुसरा ग्रंथ 'कुवलयानंद' हा विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त अलंकार ग्रंथ आहेत. ह्यामध्ये चंद्रलोकपासून परिभाषा व उदाहरणे घेतली आहेत.

**एषां चंद्रलोके दृश्यन्ते लक्षलक्षणश्लोकाः।**
**प्रायस्त एव च तेषामितरेषांत्वभिनवा विरच्यते।।** (श्लोक ५)

त्यांनी ह्याची रचना राजा वेंकटपतिच्या आदेशावरून केली.

**अमुं कुवलयानंदमकरोद्प्पदीक्षितः।**
**नियोगद्वेंकटपतेर्निरुपाधिकृपानिधेः।।**

कुवलयानंदमध्ये त्यांनी स्वतःचे मत व अन्य उदाहरणे प्रस्तुत केली आहेत.

त्यांचा तिसरा ग्रंथ 'चित्रमीमांसा' अत्यंत महत्त्वपूर्ण आहे.

प्रथम अलंकार लक्षणांच्या कारिका दिल्या आहेत. त्यासंबंधी इतरांच्या मतांची चर्चा गद्यात केली आहे आणि शेवटी आवश्यक असेल तर त्यांचे खंडन पण केले आहे. ह्यात त्यांनी प्रथम ध्वनि, गुणीभूत व्यंग्य आणि





चित्रकाव्य ह्या तीन भेदांचे संक्षिप्त विवेचन केले आहे. शब्दचित्रामध्ये रमणीयता नसल्यामुळे त्यांनी केवळ अर्थचित्रांचेच वर्णन केले आहे. त्यांनी उपमेला २२ अलंकारांचा आधार मानले आहे. दुर्दैवाने चित्रमीमांसेचे मुद्रित संस्करण अतिशयोक्तीपर्यंतच आहे. ह्यात उपमा, उपमेयोजता, अनन्वय, स्मरण, रूपक, ससन्देह, भ्रांतिमान, उल्लेख, अपह्नुति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति ह्या अलंकारांचे विवेचन आहे. चित्रमीमांसेच्या शेवटी आलेल्या एका श्लोकात लिहिले आहे की हा ग्रंथ मध्येच खंडित असला तरी सुद्धा हा ग्रंथ अपूर्ण, अरूप व अर्धचन्द्रासमान आनंददायक आहे.

**अप्पर्ध चित्रमीमांसा न मुदे कस्य मांसला।**
**अनुसरिण धर्मांशोरर्धेन्दुरिण धूर्जटेः।**

* *

.२४.

# पंडितराज जगन्नाथ

**जीवनवृत्त**

संस्कृत साहित्यामध्ये आदराने घेतले जाणारे एक नाव म्हणजे पंडितराज जगन्नाथ हे होय. जगन्नाथ पंडित हे कौण्डिण्यगोत्री देशस्थ ब्राह्मण होते. त्यांनी स्वतःला पेरू किंवा पेरमभट्ट आणि लक्ष्मीचा पुत्र म्हटले आहे. ते तेलंग प्रदेशाचे ब्राह्मण होते. त्यांचा जन्म तेलंगणातील मुंगुज येथे झाला. त्यांचे गोत्र बेंगिनाड, वेगिनाटि किंवा वेगिनाड होते. ह्याचा उल्लेख एका श्लोकात येतो.

**तैलंगान्वय मंगलालय महालक्ष्मी दयालालितः।**
**श्रीमदपैरंभट्ट सुनूरनिशं विद्वल्लार तपः।**
**संतुष्टः कमताधिपस्यकवितामाकर्ण्य तद्वर्णनं**
**श्रीमत्पण्डितराज पंडित जगन्नाथो व्यधासीदिदम्।।**

आणखी एका श्लोकात असाही उल्लेख येतो की त्यांच्या पित्याने ज्ञानेंद्र भिक्षुपासून वेदान्त, महेन्द्र पंडितापासून न्याय, खंडदेव पंडितापासून पूर्णमीमांसा आणि शेष वीरेश्वर पंडितापासून व्याकरण महाभाष्याचा अभ्यास केला होता. ते वेदांचे सुद्धा प्रकांड पंडित होते.

पंडितराजाचे व्यक्तिगत नाव 'त्रिशूली' सुद्धा प्रसिद्ध होते. त्यांच्या व्यक्तिगत जीवनाबद्दल ह्यापेक्षा अधिक माहिती उपलब्ध नाही.

तरुण वयात ते सर्वप्रथम कर्नाटकातील कोणत्यातरी राजाच्या आश्रयार्थ गेले. पण तेथे आश्रय मिळाला नाही. त्यानंतर इ.स. १६२५च्या सुमारास त्यांनी मोगल दरबारात प्रवेश केला. त्यासाठी मुकुंद माथूर हा कारणीभूत झाला. तो कायस्थ असून आसफखानाचा दिवाण होता. आसफखान हा शाहजहाँचा सासरा होता. मुकुंद माथूराची व जगन्नाथाची कोठेतरी भेट झाली. त्याचे पांडित्य आणि कवित्वावर माथूर लुब्ध झाला व त्याला शहाजहानच्या दरबारात प्रवेश मिळवून दिला.



शाहजहाँने जगन्नाथाला 'पंडितराज' उपाधीने विभूषित केले. 'भामिनीविलास'नुसार त्यांनी आपला तारुण्यकाळ दिल्लीच्या शासकाच्या आश्रयाने घालविला.

**दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः।**

त्यांनी 'आसफविलासा'त शाहजहाँचा प्रिय खानसामा असलेल्या आसफच्या मृत्युवर शोक प्रकट केला आहे. त्याचा मृत्यु इ.स. १६४१ मध्ये झाला. जगन्नाथाने 'जगदाभरणा'मध्ये शाहजहाँचा पुत्र दारा शिकोहची स्तुती केली आहे.

अशीही माहिती मिळते की जहांगीरच्या काळातच जगन्नाथ पंडित त्याच्या आश्रयाला होते. जहांगीरच्या मृत्युनंतर ते उदेपूरच्या जगत्सिंहाच्या आश्रयाला गेले. पुढे शाहजहाँच्या निमंत्रणावरून दारा शिकोहला संस्कृत शिकवण्यासाठी दिल्लीला गेले. त्यांच्या पांडित्य व काव्यसामर्थ्याने प्रसन्न होऊन शहाजहानने त्यांना 'पंडितराज' ही पदवी बहाल केली.

दरबारातील एका घमेंडखोर काझीशी जगन्नाथ पंडितांचा वादविवाद झाला. त्यात काझीचा पराभव झाला. तेव्हा त्यांचे फारसी व उर्दूवरील प्रभूत्व पाहून बादशहा खूष झाला.

शाहजहाँच्या मृत्युनंतर पंडितराज कामरुपचा राजा प्राणनारायणाच्या आश्रयाला गेले. पण बंगालचा सुभेदार मीर जुम्ला व प्राणनारायणाचे वैर निर्माण झाले. त्याच्या हातून सुटण्यासाठी प्राणनारायण भूतानमध्ये पळून गेला. त्यामुळे पंडितराजचे कामरुप येथील वास्तव्य अल्पकालीन ठरले. त्यानंतर ते मथुरेला काही काळ राहिले असावे. कारण आपल्या जीवनाचे सिंहावलोकन करताना ते म्हणतात,

**शास्त्राण्याकलितानि नित्यविधयः सर्वेऽपि सम्भाविता।**
**दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः।**
**सम्पत्युज्झितवासनं मधुपुरीमध्ये हरिः सेव्यते।**
**सर्वे पण्डितराजराजितकेनाकारि लोकाधिपम्।।** (शांताविलास)

मी सर्व शास्त्रांचे आकलन केले. सर्व नित्यविधी पार पाडले. मी माझे तरुण वय दिल्लीश्वराच्या करपल्लवाच्या आश्रयाखाली घालवले. सांप्रत

साऱ्या वासना टाकून मी मथुरेत श्रीहरिची सेवा करीत आहे. पंडितराजांच्या पंक्तीत तिलकाप्रमाणे शोभणाऱ्या मी सर्व काही असामान्य आणि सर्व लोकांमध्ये अधिक असे केले आहे.

वयाच्या उत्तरार्धामध्ये त्यांना कृष्णभक्ती जडली होती. याचा सूचक असा एक श्लोक भामिनिविलासात येतो.

**रे चेतः कथयामि ते हितमिदं वृन्दावने चारयन्**
**वृन्दं कोऽपि गवांनवाम्बुदनिभो बन्धुर्न कार्यस्त्वया।**
**सौन्दर्यामृत मुद्गिरद्भिराभितः संमोह्य मन्दस्मितै**
**रेष त्वां तव वल्लभाश्च विषयानाशु क्षयं नेष्यति।** (शांताविलास)

हे चित्ता, मी तुझ्या हिताची गोष्ट सांगतो. कोणी एक मेघश्याम (असा किशोर) वृंदावनात गायींची खिल्लारे चारीत आहे. त्याला तू कधीही आपला आप्त मानू नको. (जवळ करू नको) कारण सर्व बाजूंनी सौंदर्यरुपी अमृत फेकणाऱ्या असा मंद स्मितांनी मोह घालून तो तुझा आणि तुझ्या आवडत्या विषयांचा ताबडतोब क्षय करून टाकील (तुला तद्रूप करील).

पुढे जगन्नाथ पंडित मथुरेतून काशीला गेले. तेथेच उर्वरित आयुष्य समाप्त केले.

**जगन्नाथ पंडितांचा काळ**

इ.स. १६२० ते १६६० हा कालखंड म्हणजे पंडितराजांची साहित्यिक कारकीर्द होय, असे म.म.डॉ. पां. वा. काणे म्हणतात व बहुतेक पंडितांना ते मान्य आहे. चित्रमीमांसा व रसगंगाधर ह्या दोन्ही रचना इ. १६६०च्या आधी आणि इ.स. १६४१ नंतरच्या आहेत. ह्या रचना प्रौढ बुद्धिमत्तेचे देणे आहेत. जगन्नाथाचा साहित्यरचना काळ इ.स. १६६२ ते १६६५ चा मध्य आहे आहे असे सिद्ध होते.

पंडितराज जगन्नाथाच्या रचनांमध्ये उपलब्ध संकेतांच्या आधारे त्यांचा काळ निश्चित करण्यात मदत होते. त्यांचा ग्रंथ 'भामिनीविलास'मध्ये त्यांनी सूचित केले आहे की त्यांनी त्यांचे तारूण्य दिल्लीच्या बादशहाच्या छत्रछायेत घालविले. 'दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः।' असा त्यात उल्लेख येतो. त्यांचा दुसरा ग्रंथ 'आसफविलास'मध्ये ते सांगतात की हा बादशहा





शाहजहाँने त्याच्या विद्वत्तेने प्रसन्न होऊन त्यांना 'पंडितराज' ही उपाधी प्रदान केली. 'सार्वभौमश्री शाहजहां प्रसादादधिगत पंडितराजपदवीकेन।' असा त्यांनी उल्लेख केला आहे.

'जगदाभरण' नामक एका अन्य ग्रंथात ते दारा शुकोहचे वर्णन करतात. कदाचित त्यांच्या तारुण्याचा काही भाग दारा शुकोहच्या छत्रछायेत व्यतीत झाला असावा. जगन्नाथाला नूरजहाँचा बंधू तसेच शाहजहाँचा दरबारी नबाब आसफ खाँ (इ.स. १६४१) चे संरक्षण प्राप्त होते. त्याच्याच बिरुदावलीच्या रुपाने त्यांनी 'आसफविलास' काव्याची रचना केली.

'रसगंगाधरा'त सुद्धा आसफ खाँचा उल्लेख आहे. शाहजहाँने इ. १६२८ मध्ये राज्यारोहण केले तसेच इ.स. १६५८ मध्ये त्याला कारागृहात टाकल्या गेले. जगन्नाथांच्या काळाचे समर्थन त्यांच्या दोन अन्य रचना 'जगदाभरण' व 'प्राणाभरणम्' वरून होते. जगदाभरण ही रचना उदयपूरनरेश जगत्सिंह (इ.स. १६२८–१६५४) ह्याच्या स्तुतीसाठी रचली व प्राणाभरणं ही रचना कामरुपनरेश प्राणनारायणाच्या (इ.स. १६३३–१६६०) स्तुतीसाठी रचली.

डॉ. एस. के. डे यांच्या मते जगन्नाथाने त्यांचे जीवन जहाँगीर, शाहजहाँ, जगत्सिंह तसेच प्राणनारायण अशा भिन्नभिन्न राजांच्या आश्रयाखाली व्यतीत केले. या सर्वांवरून हा स्पष्ट निष्कर्ष निघतो की पंडितराज जगन्नाथ हे १६२० ते १६६० या काळात काव्यरचनेत सक्रिय होते.

**जगन्नाथ आणि लवंगी**

दिल्लीला शाहजहाँच्या दरबारात आश्रयास असताना पंडितराज जगन्नाथाच्या जीवनात एक प्रणयप्रसंग निर्माण झाला. शाहजहाँच्या अंतःपुरातील लवंगी नामक यवनीवर त्याचे प्रेम जडले. ही शाहजहाँची मानसकन्या होती, असे कोणी मानतात तर कोणी ती दासीकन्या होती असे मानतात. तिच्याविषयी त्याने काही श्लोक लिहिले आहेत.

**न याचे गजलिन्न वा वाजिराजिं**
**न वित्तेषु चित्तं मदीयं कदापि।**
**इयं सुस्तनी हस्तविन्यस्तकुम्भा**
**लवङ्गी कुरङ्गीदृशङ्गीकरोतु।**

मी गजपंक्ती किंवा अश्वपंक्ती मागत नाही. धनावरही माझे चित्त जडलेले नाही. तर हातात घडा घेऊन जाणारी पुष्ट स्तनांची आणि हरिणाक्षी अशी ही लवंगी तेवढा माझा अंगीकार करो (म्हणजे मला सर्व काही मिळाले).

**इयं सुस्तनी मस्तकन्यस्त कुम्भा**

**कुसुम्भारुणं चारु वासो दधाना**

**समस्तस्य लोकस्य चेतः प्रवृत्तिं**

**गृहीत्वा घटे न्यस्थ यातीव भाति।**

ही सुस्तनी लवंगी सुंदर कुसुंबी वस्त्र नेसून आणि मस्तकावर घडा घेऊन चालली आहे. असे वाटते की समस्त लोकांची चित्तवृत्ती त्या घड्यात भरून जणू ती निघाली आहे.

अशी ही लवंगी मिळावी म्हणून जगन्नाथाने बादशहाला विनंती केली व बादशहाच्या अनुमतीने तिच्याशी विवाह करून सुखाने काळ घालविला.

ही कथा खरी की खोटी याविषयी विवाद आहेत. काही पंडित या कथेला ऐतिहासिक पुरावा नसल्याचे सांगतात.

सेतुमाधवराव पगडींनी लिहिले आहे, 'पंडितराजावर हा प्रसंग लादून मोठाच अन्याय करण्यात आला आहे. समकालीन कोणत्याही ग्रंथात तसा उल्लेख नाही. ही घटना जगन्नाथाशी संबंधित नाही तर जगन्नाथ नावाचा एक संगीतकार याच काळात होऊन गेला, त्याच्याविषयी असावी. त्यालाही शाहजहाँचा आश्रय होता.'

श्री. गोडे यांनी यासंदर्भात लिहिले आहे की, 'जगन्नाथ आणि यवनी यांचा पहिला उल्लेख जगन्नाथाच्या 'गंगालहरी'वर टीका लिहिणाऱ्या सदाशिवच्या ग्रंथात मिळतो.

सदाशिवने हा ग्रंथ इ.स. १७८८ मध्ये लिहिला असावा. 'अथ एवं श्रूयते।' असे म्हणून तो पुढील वृत्तांत सांगतो.

**पंडितराज जगन्नाथांच्या रचना**

पंडितराज अत्यंत विद्वान, स्वाभिमानी व ऐश्वर्यशाली होते. त्यांच्या नावावर अनेक रचना प्रसिद्ध आहेत.



१) **आसफविलास** – ह्यात नबाब आसफ खाँचे चरित्र वर्णन केले आहे. या रचनेचे थोडेच अंश प्राप्त आहेत.

२) **चित्रमीमांसा खंडन** – अप्पय दीक्षितांच्या चित्रमीमांसेचे खंडन रसगंगाधरात जागोजागी उपलब्ध आहे. त्यांचाच संग्रह ह्यात आहे.

३) **जगदाभरण** – ह्यात दारा शुकोहची स्तुती आहे. काव्यमालेच्या संपादनानुसार ह्यात व प्राणाभरणात इतकाच फरक आहे की प्राणनारायणाच्या जागी दारा शिकोहचे नाव आहे.

४) **प्राणाभरण** – ह्यात राजा प्राणनारायणाची स्तुती आहे.

५) **भामिनीविलास** – हा पंडितराज विरचित पद्यांचा संग्रह आहे. अन्योक्ती, शृंगार, करुण, शान्ती अशी विविधता यात आहे.

६) **मनोरमाकुचमर्दन** – हा सिद्धांतकौमुदीच्या मनोरमा व्याख्येचे खंडन करणारा ग्रंथ आहे.

**लहरीकाव्ये**

पंडितराजांच्या रचनांमध्ये पाच लहरींना प्रमुख स्थान आहे.

१) **करूणालहरी** – यात परमेश्वराच्या दयेची प्रार्थना आहे. यात वियोगिनी व अन्य छंदात ६० श्लोक आहेत.

२) **गंगालहरी किंवा पियूषलहरी** – यात गंगेची स्तुती केली आहे. यात शिखरिणी छंदात ५२ श्लोक आहेत.

३) **अमृतलहरी** – यात यमुनेची स्तुती आहे. यमुनेवर शार्दुल विक्रीडित छंदात १० श्लोक रचले आहेत.

४) **लक्ष्मी लहरी** – यात लक्ष्मीची स्तुती आहे. यात ४१ श्लोक आहेत.

५) **सुधालहरी** – यात सूर्यस्तुती आहे.

**गंगालहरी**

पंडितराज जगन्नाथांच्या रचनांमधील गंगालहरी हे काव्य प्रसिद्ध आहे. गंगेवर रचलेले ५२ श्लोक यामध्ये असून गंगेच्या लोकोत्तर अशा विविध गुणांचे वर्णन केले आहे व स्वतःच्या उद्धाराविषयी कळवळ्याची प्रार्थना आहे. या स्तोत्राला अखिल भारतातील जनमानसात मान्यता मिळाली आहे. याविषयी अशी आख्यायिका आहे.

लवंगी या यवन कन्येशी जगन्नाथाने विवाह केला. दिल्लीच्या मोगल दरबारात त्याने तिच्यासह बराच काळ सांसारिक सुखे अनुभवली. उतारवयात तो तिच्यासह काशीला आला. पण यवन स्त्रीशी त्यांचा संबंध पाहून काशीच्या पंडितांनी त्यांनी बहिष्कृत केले. हा अपमान सहन न होऊन जगन्नाथ पंडित आपल्या प्रिय पत्नीसह गंगेच्या घाटावर बसला व आत्मोद्धारासाठी त्याने गंगेचे स्तोत्र रचण्यास आरंभ केला. ते कवन गंगेला आवडले व ती प्रसन्न होऊन एकेका श्लोकाला एकेक पायरी चढू लागली. ५२ श्लोकांनंतर ती ५२ पायऱ्या वर आली होती. तिने जगन्नाथाला त्याच्या पत्नीसह पोटात घेतले.

ही आख्यायिका खरी असेल तर तिचा अर्थ जगन्नाथाने सपत्नीक आपला देह गंगार्पण केला असेच मानावे लागेल.

गंगालहरी स्तोत्राचा प्रारंभ खालील श्लोकाने होतो.

**समृद्धं सौभाग्यं सकलवसुधायाः किमपि तनू**
**महैश्वर्यं लीलाजनितजगतः खण्डपरशोः।**
**श्रुतीनां सर्वस्वं सकृतमथ मूर्तं सुमनसां**
**सुधासोदर्यं ते सलिलमशिवं नः शमयतु।**

हे गंगे, तुझे हे जल म्हणजे सगळ्या पृथ्वीचे जणू महासौभाग्यच, लीलेने जगाची निर्मिती करणाऱ्या शंकराचे हे महदैश्वर्यच आहे. वेदांचे सर्वस्व, देवांच्या पुण्याचे मूर्त स्वरूप आणि अमृताचे सहोदर असे हे जल आमचे अशुभ नष्ट करो.

गंगालहरीचा शेवटचा श्लोक असा आहे.

**विभूषितानङ्ग रिपूत्तमाङ्गा**
**सद्यः कृतानेकजनार्तिभङ्गा।**
**मनोहरोत्तुङ्गचलत्तरङ्गा**
**गङ्गा ममाङ्गान्यमलीकरोतु।।**

मदनरिपू अशा शिवाचे उत्तमांग (मस्तक) भूषित करणारी, अनेक जनांच्या दुःखांना त्वरित बरी करणारी, जिच्या लाटा मनोहर असून उंच उसळत आहेत, अशी गंगा माझे अंग निर्मल करो.



ज्येष्ठ मासात, 'गंगादशहरा'च्या पर्वकाळात अनेक भाविक गंगालहरीचा नित्यपाठ करतात. पुराणिक लोक देवालयात किंवा गंगेच्या घाटावर गंगालहरींवर प्रवचन करतात.

**रसगंगाधर**

पंडितराज जगन्नाथाचा हा सर्वात प्रौढ व गंभीर ग्रंथ आहे. विद्वान ह्याला जगन्नाथाची अंतिम रचना मानतात. पण दुर्दैवाने हा ग्रंथ अपूर्ण आहे. हा एक बृहद् काव्यग्रंथ आहे. साहित्यशास्त्राचा मर्मप्रकाशक ग्रंथ म्हणजे रसगंगाधर होय. पंडितराज जगन्नाथ जसे प्रतिभाशाली कवी होते तसेच अलौकिक प्रतिभासंपन्न पंडित सुद्धा होते. त्यांनी जे लिहिले ते विचारपूर्वक, पांडित्याच्या कसोटीवर घासून लिहिले आहे. त्यांनी उदाहरणे सुद्धा नवीननवीन दिली आहेत. रसनिरुपणाच्या वेळी त्यांनी नवीन समीक्षा केली आहे.

पंडितराज अनेकानेक युक्तिंनी सिद्ध करतात की काव्यत्व शब्दावरच आधारित असू शकते, शब्द आणि अर्थ अशा दोन्हीवर नाही. म्हणून लक्षणेत त्याचा निवेश उचित होय. मम्मट आणि विश्वनाथ दोघांच्या काव्यलक्षणांची आलोचना केली आहे. ह्यानंतर केवळ 'प्रतिभा'च काव्यकारण आहे. प्रतिभेच्या उत्पत्तीचे कारण देवता, महापुरूष कृपा किंवा व्युत्पत्ती इ. वेगवेगळी कारणे असू शकतात, समन्वित नाहीत.

काव्याचे विभाजन उत्तमोत्तम, उत्तम, मध्यम आणि अधम अशा चार प्रकारांनी केले जाते. रसाची सांगोपांग व्याख्या केली आहे. रसानुभूती तसेच अभिव्यक्तीच्या संबंधात विविध अकरा-मतांची प्रस्तुती, परीक्षण तसेच उपयुक्ततेची विवेचना आहे. रसांच्या संख्येवर सुद्धा कवीने मौलिक युक्तिवाद केला आहे. अभिनवगुप्ताचे मत अधिक अभिप्रेत आहे. भाव, भावाभास इ. चे सुद्धा सविस्तर वर्णन उपलब्ध आहे. गुणांच्या संबंधात दशगुणवाद आणि गुणास्यवाद दोन्हींचा उल्लेख करून परीक्षण केले आहे.

**ग्रंथस्वरूप**

रसगंगाधर ग्रंथाचे पाच आनन रचण्याचा कवीचा मानस असावा. परंतु ग्रंथाचे दोनच आनन आहेत. त्यातही द्वितीय आनन अपूर्ण वाटतो. रसगंगाधर ग्रंथाची विशेषता म्हणजे लक्षणे सूत्रशैलीनुसार गद्यात आहेत. परंतु

त्या गद्यावर लेखकाने मृदू तसेच ओजपूर्ण गद्यामध्ये विस्तृत वृत्ती रचली आहे. स्व-रचित उदाहरणे दिली आहेत. ती उदाहरणे प्रसाद गुणाने संपन्न व धारावाही शैलीत रचली आहेत.

पंडितराज जगन्नाथाने पूर्ववर्ती आचार्यांच्या परंपरेत अलंकारांची समीक्षात्मक विवेचना केली आहे. तसेच अप्पय दीक्षितांच्या मतांचे व्यापक खंडन केले आहे. अन्य सुप्रसिद्ध आचार्य जसे मम्मट, रुय्यक, जयरथ, विद्यानाथ, रत्नाकर, विश्वनाथ यांच्या मतांची सुद्धा समीक्षा केली आहे. इतकेच नाही तर त्यांचे श्रद्धास्थान असलेल्या आनन्दवर्धनांवर सुद्धा टीका करून त्यांनी ह्या ग्रंथाच्या आननामध्ये पंडितराजाचे प्रसिद्ध काव्यलक्षण येते, **रमणीयार्थप्रतपादक शब्दः काव्यम्।**

त्यानंतर कुन्तक, मम्मट, विश्वानाथ यांच्या काव्यलक्षणांची समीक्षा केली आहे. त्यानंतर काव्याचे चार भेद केले आहेत. ध्वनि, गुणीभूत व्यङ्ग्य, अर्थालंकार आणि शब्दालंकार.

प्रथम आननाच्या शेवटी रसप्रकरण आले आहे. शब्द आणि अर्थाचे गुण, वैदर्भी रीति, भावध्वनि, रसाभास इ. चे निरूपण त्यात केले आहे.

द्वितीय आननामध्ये ध्वनिभेद, अभिधा लक्षणा, लक्षणेचा विषय ह्यांचे विवेचन आहे. तसेच उपमा अलंकारापासून उत्तर अलंकारापर्यंत ७० अर्थालंकारांचा क्रम रुय्यकांच्या 'अलंकारसर्वस्वा'नुसारच आहे. काही अलंकार जयदेवाच्या 'चन्द्रालोक' मधून घेतले आहेत. 'तिरस्कार' नामक नवीन अलंकाराची कल्पना केली आहे. 'अलंकार रत्नाकर' मधून 'असम' आणि 'उदाहरण' हे अलंकार घेतले आहेत.

उत्तर अलंकाराला पूर्ण न करताच अचानक ग्रंथ पूर्ण होतो. तरीसुद्धा जगन्नाथाने स्वतःला स्वतंत्र विचारांचा समीक्षक म्हणून सिद्ध केले आहे. पंडितराजांच्या संबंधात त्यांची स्वतःची गर्वोक्ती प्रसिद्ध आहे-

**कवयति पण्डितराजे कवयन्त्यन्येऽपि विद्वांसः।**
**नृत्यति पिनाकपाणौ नृत्यन्त्येऽपि भूतवेतालाः।।**

पंडितराज काव्यरचना करतात, अन्य विद्वान सुद्धा रचना करतात. भगवान शिव नृत्य करतात, अन्य भूतवेताळ सुद्धा नृत्य करतात.



रसगंगाधर हा ग्रंथ अपूर्ण असला तरी साहित्यशास्त्रावरील हा विवेचन ग्रंथ आहे. त्यांच्या अलौकिक पांडित्याचा प्रत्यय ठायीठायी येतो. यात रसनिरुपण करताना नवी समीक्षापद्धती स्वीकारली आहे.

काव्यप्रकाशकार मम्मटाच्या अनेक सिद्धांताचे त्याने यात खंडन केले आहे. उदाहरणादाखल जे श्लोक घेतले आहेत ते ही त्याचे स्वतःचेच आहेत. ग्रंथाची शैली प्रौढ असून विचार मूलग्राही आहेत.

**कविविशेषता**

जगन्नाथ रचनात्मक, प्रतिभायुक्त कवी होते आणि त्यांच्यात सौंदर्य आस्वादाची शक्ती होती. ते कवी होते आणि सहृदय सुद्धा होते. जगन्नाथांचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते व त्याचा त्यांना गर्व होता. आपल्या मानसिक स्थितीनुसार ते दुःखमय व आनंददायक श्लोकांची रचना करू शकत होते. ते आपल्या श्लोकात शब्दध्वनिद्वारा भाव व्यक्त करीत. भामिनीविलासाच्या शेवटी त्यांनी म्हटलं आहे,

**धुर्यैरपि माधुर्यै द्राक्षाक्षीक्षुमक्षिक सुधानाम्**
**वन्दैव माधुरीयं पंडितराजस्य कवितायाः।।**

रसगंगाधर हा अत्यंत विशाल ग्रंथ आहे, तेव्हा केवळ रुपरेखेवरूनच त्याच्या संपूर्ण विषयांचा अनुभव करणे कठीण आहे. नागेशभट्टाच्या 'मर्मप्रकाश' नामक टिकेसहित संपादित झालेला हा काव्यप्रकाशावरील एक प्रामाणिक ग्रंथ आहे. काव्यशास्त्राच्या क्षेत्रात ध्वन्यालोक व काव्यप्रकाशानंतर रसगंगाधराचे नाव येते.

जरी जगन्नाथ आधुनिक ग्रंथकार आहेत तरी पण प्राचीन संस्कृतवर त्यांचे अधिपत्य आहे. रसगंगाधरात त्यांनी स्वतः गर्वाने म्हटले आहे की त्यांची अनेक उदाहरणे स्वतःची आहेत.

**निर्माय नूतनमुदाहरणानुरुपं काव्यं**
**मयात्र निहितं न परस्याकिञ्चित्।**
**किं सेव्यते सुमनसां मनसापि**
**गन्धः कस्तुरिका जननशक्तिभृता मृगेण।।**

त्यांचे श्लोक सरळ, प्रवाही व प्रासादिक शैलीत रचले आहेत व त्यांच्या कवित्वप्रतिभेचे परिचायक आहेत. त्यांच्या निरुपणाच्या शैलीत प्रथम विषयाची परिभाषा दिली जाते, नंतर त्याचे विवेचन केले जाते, स्वतःचे उदाहरण देऊन त्याचे स्पष्टीकरण केले जाते आणि आपल्या पूर्ववर्तींच्या मतांची समीक्षा केली जाते.

त्यांच्या गद्याची विशेषता अशी की त्यात स्पष्टता, शैलीची सशक्तता आणि उच्च समीक्षात्मक गुण आढळतात. ते आपले स्वतंत्र विचार राखतात आणि प्राचीन प्रतिष्ठित लेखकांच्या मतांची संधी मिळताच कठोर आलोचना करतात. उदा. ध्वन्यालोक 'प्राप्तश्री' श्लोकाला रुपकध्वनिचे उदाहरण मानतात. ह्यावर जगन्नाथाने टीका केली आहे. त्यांच्या समालोचनेत संतुलित निर्णय मिळतात. त्यांच्या समीक्षेत उच्च कोटीची व्यंग्यात्मकता आणि सूक्ष्मतेसह भाषागत सुसभ्यता आढळते. त्यांच्या समीक्षेची उपयुक्तता अधिकांश जागी स्वीकारावीच लागते.

त्यांच्यासारखा कवी गेल्या ३०० वर्षात कोणी झाला नाही, हे म्हणणे योग्य आहे. त्याची शैली प्रासादिक व प्रतिभा अलौकिक आहे. भाषाप्रभुत्व आश्चर्यकारक आहे. कल्पनांची झेप उत्तुंग आहे. कवित्वासोबत पांडित्याची इतकी मधुर जोड मिळणे असंभवच नाही तर दुःसंभव निश्चितच आहे.

कविता लिहिण्याचे त्यांचे सामर्थ्य इतके अफाट होते की त्यांनी रसगंगाधरामध्ये रस व अलंकारांसाठी स्वतः नवीन श्लोक रचले. कोणत्याही प्राचीन उदाहरणांना उच्छिष्ट मानून स्पर्श करणे त्यांनी अयोग्य मानले.

पंडितराज हा जेवढा प्रकांड पंडित होता तितकाच गर्विष्ठही होता. स्वतःच्या काव्याबद्दल त्याला अत्यंत दर्प होता. कालिदास, भवभूतीची कुचाळी करायलाही त्याने कमी केले नाही. आपल्या कवितेची प्रशंसा करताना तो म्हणतो,

**गिरां देवी वीणागुणरणनहीनादरकरा**
**यदीयानां वाचामसृमयमाचामति रसम्।**
**वचस्तस्थाकर्ण्य श्रवणसुभगं पण्डितपते**
**रघुन्वन् मूर्धानं नृपशुरथवायं पशुपतिः।।** (शांताविलास)





साक्षात सरस्वती वीणावादनाकडे दुर्लक्ष करून ज्याच्या वाणीतला अमृतमय रस चाखीत राहते, त्या पंडितराज जगन्नाथाचे श्रवणसुभग काव्य ऐकून जो कोणी मनुष्य संतोषाने मान डोलावणार नाही तो एक तर नरपशू असेल किंवा पशुपति असेल.

अशी अफाट काव्यरचना करणारे पंडितराज संस्कृत साहित्यासाठी 'राज'च होय.

* *